फ्रेंच भाषांत चिनी कोश झालेले आहेत. या भाषेवर जितके पाश्चात्त्य कोश आहेत तितके इतर भाषेवर क्वचित आढळतील. लोब्स-चीडच्या चिनी–इंग्रजी कोशांत मूळ शब्दांच्या क्रमानें मांडणी केली आहे.

**जपानी**—स्थानिक कोश फार थोडे आहेत. बहुतेक पाश्चात्त्य भाषांतून युरोपियनांनीं केलेले आढळतील. जपानी–इंग्रजी कोश हेप्बर्नचा आहे.

**फिलिप्पाइन्स**—बिकोल, बिसय, इबनाक, इलोकन, पंपंग, तगल इ. भाषांचे कोश आहेत.

**उत्तर आणि मध्य आशिया**—बुरिअत, कालमुक, चुवश, जगताई, मांचू, मोंगोल, ओस्टिअक, समोयेद, तार्तर, तिबेटी, तुंगुसियन, उइगुर इ. भाषांचे कोश आढळतात. पैकीं मांचू व तिबेटी कोश फार महत्त्वाचे आहेत. बहुतेक कोश जर्मन व रशियन आहेत. एच्. ए. जस्चकी यानें केलेला तिबेटी–इंग्रजी कोश आहे. यांत तिबेटी उपभाषांचाहि उल्लेख आहे. नुकताच डॉ. टर्नरनें एक मोठा तिबेटी–इंग्रजी कोश रचिला आहे. तो व्युत्पत्तिदृष्ट्या महत्त्वाचा आहे.

**कोरिया**—या भाषेचे कोश कोरिया, चिनी, जपानी व रशियन भाषांतून आहेत.

**आफ्रिका**—इजिप्शियन्, कॉप्टिक, एथिओपिक, आम्हारिक, पूर्व किनाऱ्यावरील, मालागासी, दक्षिण आफ्रिका, पश्चिम आफ्रिका, मध्य आफ्रिका व बबर या भाषांतले कोश फ्रेंच, जर्मन आणि इंग्लिश लोकांनीं केलेले आहेत.

**ऑस्ट्रेलिया, पॉलिनेशिया**—यांतील भाषांचे कोश इंग्रजांनीं केलेले आहेत.

**अमेरिका**—यांतील अनेक स्थानिक भाषांचे (युरोपीय भाषांखेरीज) कोश उपलब्ध आहेत. उदा. एस्किमो, ओटोमी, मय, ग्वारनी, आयमारा इ. भाषांचे कोश. इतर कोशांप्रमाणेंच हे सर्व युरोपियन प्रयत्नांनीं झालेले आहेत हें सांगावयास नकोच.

मागें वर्णन केलेल्या कोशांसुध्दां ऑफ्रेटच्या सूचींत आढळणाऱ्या सर्व संस्कृत कोशांची यादी पुढें दिली आहे. यांत उ. =उल्लेख असें समजावें.

१ अकारादि निघण्टु. २ अगस्त्यनिघण्टु. ३ अनादिकोश. ४ अनेकाक्षरकोश. ५ अनेकार्थ. ६ अनेकार्थकोश–हेमचंद्र. ७ अनेकार्थतिलक, नानार्थरत्नतिलक–महिप. ८ अनेकार्थदीपिका–उ. मल्लीनाथ, (किरातार्जुनीय) ११.५९. ९ अनेकार्थ–ध्वनिमंजरी–गदसिंह, तसेंच–महाक्षपणक. १० अनेकार्थनाममाला. ११ अनेकार्थशेष–हेमचंद्र. १२ अनेकार्थसंग्रह–हेमचंद्र (टीका –अनेकार्थकैरवाकरकौमुदी–महेंद्रसूरि). १३ अनेकार्थसंग्रह–अर्वाचीन. १४ अनेकार्थसमुच्चय–शाश्वत. १५ अभिधानचिंतामणि अथवा अभिधानचिंतामणिनाममाला–हेमचंद्र (टीका–अवचूरी, नामसारोध्दार, व्युत्पत्तिरत्नाकर-देवसागरगणि, महेंद्रसूरि, वादिश्रीवल्लभ, नाम्नाम् सारोद्धार–वल्लभगणि–अभिधानचिंतामणौ शेषसंग्रह, शेषनाममाला, शेषसंग्रहसारोध्दार, बृहदभिधान-चिंतामणि). १६ अभिधानतंत्र अथवा नामलिंगानुशासन–जटाधर. १७ अभिधानमंजरी. १८ अभिधानमाला उ.–रायमुकुट व भट्टोजी. १९ अभिधानरत्नमाला–हलायुध (टीका–आजड). २० अमरकोश अथवा नामलिंगानुशासन अथवा त्रिकांड–अमरसिंह. २१ अमर-दत्त (कोशकार)–उ. हलायुध, मेदिनीकर, रायमुकुट, भानुजी. २२अमरमंगल–उ. महेश्वर, केशव. २३ अमरमाला–उ. क्षीरस्वामी, वर्धमान, रायमुकुट, भरतसेन, भानुजी. २४ अमरशेष–उ. देवण्ण (स्मृतिचंद्रिका), त्रिकाण्डशेष–पुरुषोत्तम. २५ अर्धनारीश्वर (कोशकार)–उ. चारित्रवर्धन (रघुवंश). २६ असालतिप्रकाश (काश्मीरचा राजा असालति याच्या आज्ञेनें झालेला कोश). २७ उग्र–(कोशकार), हेमचंद्रावर टीका. २८ उत्पलमाला अथवा उत्पलिनी–उत्पल. उ.–पुरुषोत्तमदेव (हारावली), मेदिनीकोश, मल्लिनाथ, रायमुकुट, शिवराम (वासवदत्ता), भानुजी. २९ एकवर्णार्थसंग्रह–भरतसेन. ३० एकाक्षरकोश –पुरुषोत्तमदेव, महाक्षपणक, महीधर, वररुचि. ३१ एकाक्षरनाममाला (अमरकृत ?) –अमरकांत, वररुचि, सुधाकलश, हिरण्यनाभ, विश्वशंभु. ३२ एकाक्षरनाममालिका–विश्वशंभु. ३३ एकाक्षरनिघण्टु –इरुगप दण्डाधिनाथ, वररुचि, शांतवीर, देशिकेंद्र, सदाचार्य. ३४ एका-क्षरमाला. ३५ एकाक्षरनिघण्टुमाला–उ. –हेमाद्रि (रघुवंश). ३६ एकाक्षरमाधवनिघण्टु. ३७ एकाक्षरमातृकाकोश. ३८ एका-क्षरमालिका–अमरसिंह (?), विश्वशंभुमुनि. ३९ एकाक्षररत्नमाला. ४० एकाक्षराभिधान–(वररुचिकृत). ४१ एकाक्षरा-भिधानमाला–उ. पद्मनाभदत्त. ४२ एकाक्षरीकोश–माधव. ४३ एकार्थनाममाला व द्व्यर्थनाममाला–सौभरि. ४४ ऐंद्रनिघण्टु–वररुचि. ४५ औणादिकपदार्णव–पेद्दभट्ट.

४६ कल्पद्रु (नाममाला)–केशव. ४७ कविजनशेवधि–आदिनाथ कवि. ४८ कविजीवन–धर्मराज. ४९ कविदीपिका निघण्टु–विक्रमादित्यराज. ५० कविसेवादिनिघण्टु. ५१ कात्य–उ. क्षीरस्वामी, हेमचंद्र, केशव, महेश्वर, रायमुकुट, भानुजी. ५२ कात्य (कोशकार)–उ. मंख. ५३ कोशकल्पतरु–विश्वनाथ. ५४ कोशसंग्रह–राधाकृष्ण. ५५ कोशसार–उ. शिवराम (वासव–दत्ता). ५६ क्रियानिघण्टु–भट्टमल्ल. ५७ गणनिघण्टु. ५८ गणमंजरी–निहैक कविवल्लभ. ५९ गाथाकोशवल्ली. ६० गीर्वाणभाषाभू–षण–त्रिविक्रमाचार्य. ६१ गोवर्धनकोश–उ. मेदिनीकर. ६२ चंद्रकोश–उ. भट्टोजी. ६३ चन्द्रनंदन (कोशकार)–उ. क्षीरस्वामी (अमरकोश). ६४ जैमिनीनिघण्टु. ६५ तारपाल (कोशकार)–उ. मेदिनीकर, रायमुकुट, भानुजी. ६६ त्रिकांडशेष अथवा अमर–शेष–पुरुषोत्तमदेव–उ. मेदिनीकर, रघुनंदन, उज्ज्वलदत्त, मल्लिनाथ, शिवदत्त इ. ६७ त्रिरूपकोश–कचणबिल्हणकवि. ६८ त्रिलिंगनि–र्णयोदाहरण अथवा रत्नकोश. ६९ त्रिविक्रम (कोशकार)–उ. हेमाद्रि, दिनकर ('रघुवंश'). ७० दामोदर (कोशकार)–उ. राय-मुकुट. ७१ द्रव्यगुणविचार (कोश ?)–रत्नाकर (सुचीपत्र). ७२ द्वंद्वादिकोश. ७३ द्विरूपकोश–(उ. रायमुकुट) पुरुषोत्तमदेव, हर्ष,

महेश्वर. ७४ द्विरूपध्वनिसंग्रह–भरतसेन. ७५ द्व्यक्षरनाममाला–सौभरि. ७६ द्व्यर्थकोश–पुरुषोत्तमदेव. ७७ धन्वंतरिनिघण्टु–वैद्यक. ७८ धरणिकोश–धरणीदास–उ. मेदिनीकर, रायमुकुट, उज्ज्वलदत्त, गदसिंह व आणखी. ७९ धातुकोश (कविकल्पद्रुम)–वोपदेव. ८० धातुपारायण–जूमरनन्दिन्, पूर्णचंद्र, हेमचंद्र. ८१ नक्षत्रकोश. ८२ नक्षत्रनिघण्टु. ८३ नक्षत्राभिधान. ८४ नानार्थकोश –शाश्वत, हेमचंद्र. ८५ नानार्थध्वनिमंजरी–गदसिंह अथवा दुर्गसिंह. ८६ नानार्थपदपेटिका–सर्वज्ञसुजन. ८७ नानार्थमंजरी. ८८ नानार्थरत्नतिलक (अनेकार्थतिलक पहा). ८९ नानार्थरत्नमाला–इरुगप दंडाधिनाथ अथवा दंडिनाथ, दंडेश अथवा (भास्कर-हरिहर-कालीन). टीका–वंद्यभट्ट. ९० नानार्थरत्नाकर. ९१ नानार्थशब्दकोश–मथुरेश (शब्दरत्नावली पहा). ९२ नानार्थशब्दरत्न–कालिदास, टीका–तरला –निचुल कवि योगिचंद्र. ९३ नानार्थशब्दानुशासन–मंडनमिश्र. ९४ नानार्थसंग्रह–अजयपाल उ.–गणरत्नमहोदधि, मेदिनीकर, उज्ज्वलदत्त, रायमुकुट, शिवदास. ९५ नानार्थसंग्रह–हरिश्चंद्र. ९६ नामनिघण्टु (वैदिक)–माधव–उ. देवराज. ९७ नामनिधान–सर्वज्ञनारायण–उ. रायमुकुट, भानुजी. ९८ नामप्रपंच– उ. रायमुकुट. ९९ नाममातृकानिघण्टु–वरदराजाचार्य. १०० नाममाला–दंडिन्. १०१ नाममाला–उ. क्षीरस्वामी (अमरकोश) वामन, हेमचंद्र, मेदिनीकर. १०२ नाममाला (वर्णानुक्रमरचितकोश). १०३ नाममाला–धनंजय (धनजंयनिघण्टु), धनंजयकोश, प्रमाणनाममालानिघण्टुसमय (दोन भाग–एकार्थ व नानार्थ), धनंजयनाममाला. १०४ नाममाला–साधु. १०५ नाममाला–हर्षकीर्ति (शारदीयाख्यानाममाला). १०६ नाममालाकोश. १०७ नाममालिका–भोज महिप. १०८ नामलिंगाख्या कौमुदी–रामकृष्ण, सूचीपत्र. १०९ नामलिंगानुशासन–अमरसिंह. ११० नामसंग्रह–भानुचंद्र. १११ नामसंग्रहनिघण्टु–भार्गवाचार्य. ११२ नामसंग्रहमाला–अप्पय्यदीक्षित. ११३ नामसारोद्धार–हेमचंद्र (अभिनवचिंतामणीवर टीका). ११४ नामावली–गोवर्धन (?) –धनंजय. ११५ निघण्टुशेष–हेमचंद्र. ११६ निर्हिक कविवल्लभ–गणमंजरी. ११७ निजविनोद–महादेव वेदान्ती. ११८ नीलकंठकोश–(अमरकोश टीका पहा). ११९ नैघण्टुकैकाध्याय–बाल्हिकेयमिश्र. १२० न्यायकोश.

१२१ पंचतत्त्वप्रकाश–वेणीदत्त. १२२ पंचरूपकोश. १२३ पदचंद्रिका–मयूर. १२४ पदमंजरी–कविवल्लभ, भल्लटकवि, १२५ पदार्थकौमुदीकोश. १२६ पदार्थकौमुदीसारकोश. १२७ पदार्थभास्कर. १२८ पद्मकोश–प्रयागदास. १२९ पर्यायपदमंजरी–हम्मीरमिश्र. १३० पर्यायरत्नमाला-महेश्वरमिश्र. १३१ पर्यायार्णव–नीलकंठमिश्र. १३२ प्रयुक्तपदमंजरी–ईश्वरकृष्णकालिदास. १३३ बालप्रबोधिका–नन्दिरकवि. १३४ बीजकोश. १३५ बीजनिघण्टु. १३६ बृहद्रत्नाकर–वामनभट्ट. १३७ भागुरि–उ. क्षीरस्वामी, हलायुध, महेश्वर, हेमचंद्र, केशव. महिप, मेदिनीकर, रायमुकुट, मल्लिनाथ. १३८ भारतमाला. १३९ भावप्रकाशनिघण्टु. १४० भुवनप्रदीपिका–सार्वभौममिश्र. १४१ भूरिप्रयोग–पद्मनाभदत्त–उ. नारायणशर्मन, रामनाथ, भट्टोजी. १४२ मातृकाकोश–चतुर्भुजशिष्य. १४३ मातृकानिघण्टु–मातृकाक्षरनिघण्टु–महीधर. १४४ मात्राकोशभारविका. १४५ माधवकोश.–उ. मेदिनीकर. १४६ मानमंजरी (संकृत व भाषाकोश)–नंदकवि. १४७ मालतीमाला–उ. मल्लिनाथ, रामानंद (काशीखंड). १४८ मुक्तावली–उ. रंगनाथ. १४९ मुग्धबोध (इ. स. १३९४). १५० मुनि–व्याडि? किंवा कात्यायन?. १५१ मेदिनीकोश अथवा नानार्थकोश–मेदिनीकर–उ. शिवकोश, असालतिकोश, भूरिप्रयोग. १५२ यादवकोश–यादवप्रकाश (वैजयंती पहा). १५३ रघुनंदनकोश–(स्मृतितत्त्वावरील कोश). १५४ रत्नकोश–उ. मल्लिनाथ, रायमुकुट, गदसिंह, शिवराम (वासवदत्ता), भानुजी; रत्नकोश–कालिदास. १५५ रत्नप्रकाश. –उ. मल्लिनाथ (शिशुपाल वध १२,१६). १५६ रत्नमाला–माधव–उ. रायमुकुट. १५७ राजकोशनिघण्टु–राजव्यवहारकोश–रघुनाथपंडित. १५८ राधाकृष्ण कोश–राधाकृष्ण. १५९ रुद्रकोश–रुद्र–उ. मल्लिनाथ, मेदिनीकर. १६० रूपभेदप्रकाश (शब्दभेदप्रकाश पहा). १६१ रूपरत्नाकर –उ. रायमुकुट, भानुजी. १६२ लघुनिघण्टुसार–केशव. १६३ लघ्वमर. १६४ लिंगभट्टीय–भानुदीक्षित. १६५ लिंगानुशासन. १६६ वररुचिकोश–उ. हलायुध, मेदिनीकर (एकाक्षरकोश, एकाक्षर निघण्टु, एकाक्षरनाममाला, एकाक्षराभिधान, ऐन्द्रनिघण्टु). १६७ वर्णनिघण्टु (प्रश्नशास्त्र). १६८ वर्णप्रकाश–कविकर्णपूर. १६९ वस्तुकोश. १७० वाचस्पति (कोशकार)–उ. हेमचंद्र, महेश्वर, केशव, रायमुकुट, भट्टोजी, भानुजी, पुरुषोत्तमदेव, मेदिनीकर, सुंदरगणि. १७१ वामननिघण्टु–वामन. १७२ विक्रमादित्यकोश (हारावली)–उ. मेदिनीकर, सुंदरगणि, भानुजी. १७३ विचित्रनाममाला. १७४ विबुधोपदेश. १७५ विश्वनिघण्टु–विश्वकवि, परमेश्वरभट्ट (?). १७६ विश्वकोश–विश्वप्रकाश–महेश्वर, रत्नाकर, वाचस्पति. १७७ विश्वमेदिनी–वाचस्पतिमिश्र, सारस्वतमिश्र. १७८ विश्वप्रकाश–वाचस्पति, महेश्वर. १७९ विश्वरूप (कोशकार)–उ. महेश्वर, मेदिनीकर, भट्टोजी. १८० विश्वलोचन–उ. विश्वप्रकाश. (?). १८१ वेदनिघण्टु–पिंगलाचार्य (?). १८२ वैजयन्ती–यादवकोश–यादवभट्ट–उ. हेमचंद्र, मल्लिनाथ, देवण्ण.

१८३ शब्दकल्पद्रु–केशव. १८४ शब्दकल्पद्रुम–राधाकांतदेव. १८५ शब्दकल्पद्रुम –व्यासकेशव. १८६ शब्दकौस्तुभ–भट्टोजी. १८७ शब्दचंद्रिका–बाणकवि. १८८ शब्दचिंतामणि–व्यास विठ्ठलाचार्य. १८९ शब्दतरंगिणी–उ. उज्ज्वलदत्त,

१९० शब्दप्रभेद–शिवदीन. १९१ शब्दभेद–उ. जयमंगल ( भट्टिकाव्य ). १९२ शब्दभेदनिर्देश. १९३ शब्दभेदप्रकाश अथवा शब्दभेदनाममाला–महेश्वर, ( टीका–ज्ञानविमलगणि )–पुरुषोत्तमदेव. १९४ शब्दमाला–रामेश्वरशर्मन्. १९५ शब्दमुक्तामहार्णव –रामचंद्रपुत्र तारामणि ( कोलब्रुक करितां केलेला, अर्वाचीन ). १९६ शब्दरत्न. १९७ शब्दरत्नप्रदीप–काशीराम ( मथुरादासाचा मुलगा ). १९८ शब्दरत्नसमन्वय–शाहाजी राजे, तंजावर. १९९ शब्दरत्नाकर–महिप, वामनभट्ट, अथवा शब्दप्रभेदनाममाला– सुंदरगणि. २०० शब्दरत्नावली. २०१ शब्दरत्नावली–मथुरेश. २०२ शब्दलिंगार्थचंद्रिका–उ. वेंकट, सुजन. (टीका–चकोरभट्टाचार्य, विद्वत्काल्लोलभट्टाचार्य ). २०३ शब्दशब्दार्थमंजूषा–उ. वेंकट. २०४ शब्दसंदर्भसिंधु ( शब्दार्णवाभिधान )–काशीनाथ भट्टाचार्य. २०५ शब्दसारनिघण्टु. २०६ शब्दस्तोममहानिधि. २०७ शब्दार्णव–प्राणकृष्णाच्या आज्ञेनुसार केलेली. २०८ शब्दाब्धितरि–रामगोविंद. २०९ शब्दार्णव–उ. पुरुषोत्तमदेव ( हारावलीमध्यें ), मेदिनीकर, उज्ज्वलदत्त, रायमुकुट, मल्लिनाथ, भानुजी, शिवकोश, सुन्दरगणि. २१० शब्दार्थकल्पतरु–वेंकट. २११ शब्दार्थचंद्रिका. २१२ शब्दार्थचिंतामणि. २१३ शब्दार्थमंजरी. २१४ शब्दार्थमंजूषा ( टीका–मुरारिमिश्र ). २१५ शब्दार्थरत्नाकर–सुंदरगणि. २१६ शाश्वत–अनेकार्थसमुच्चय–उ. क्षीरस्वामी, वररुचि, गणरत्नमहोदधि, मेदिनीकर, उज्ज्वलदत्त, मल्लिनाथ. २१७ शिवकोश–शिवदत्त (टीका–शिवप्रकाश). २१८ शीघ्रबोधिनी नाममाला–पुंडरीक विठ्ठल २१९ शेष–उ. क्षीरस्वामी. २२० श्रीधर–उ. सुंदरगणि. २२१ श्रुतशब्दार्थ–समुच्चय–सोमेश्वर. २२२ श्लेषार्थपदसंग्रह–श्रीहर्षकवि. २२३ षडर्थनिर्णय–कवि राक्षस. २२४ सज्जन ( कोशकार )–उ. मल्लिनाथ. संजीवनी. २२५ सरस्वतीविलास–विद्वच्चकोरभट्ट, सरिद्विल्लभमिश्र. २२६ सारस्वताभिधान–भावपाद. २२७ सुप्रसिद्ध पदमंजरी–मुरारि श्रीपति सार्वभौम. २२८ हारावली–पुरुषोत्तमदेव–उ. मेदिनीकर, भूरिप्रयोग, असालतिप्रकाश, शिवकोश ( टीका–मथुरानाथ शुक्ल ), बृहद्धारावली–उ. रायमुकुट, भानुजी.

प्राकृत व फारसी कोश–१ अर्धमागधी कोष–जैनमुनि श्री रत्नचंद्रजी. २ गाथासप्तशती अथवा गाथाकोश–हाल. (टीका)– कुलनाथ, गंगाधर, पीतांबर, प्रेमराज, भुवनपाल; मुक्तावली–साधारणदेव. ३ नाममाला–हेमचंद्र ( अभिधानचिंतामणि देशीनाममाला ). ४ पाइअलच्छिनाममाला–धनपाल. ५ पाइअसद्द महण्णवो–हरगोविंददास. ६ पारसीप्रकाश किंवा पारसी कोश–विहारि कृष्णदास (अकबरकालीन). ७ पारसी विनोद–व्रजभूषण. ८ पारशीप्रकाश–वेदांगराय ( ज्योतिषविषयक ).

ही प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं कचेरींतील संपादकवर्गाखेरीज ज्यांचें साहाय्य झालें आहे त्यांचे आभार मानिले पाहिजेत. या कामांत फर्ग्युसन कॉलेजमधील प्रो. डॉ. व्ही. व्ही. गोखले, एम्. ए. पी.एच्. डी. यांनीं प्रो. झकारिया यांच्या संस्कृत कोशवाङ्मयावरील जर्मन निबंधावरून मराठी टिपणें तयार करून दिलीं व गुजराथी कोशसाहित्यावरील टिपण रा. एम्. आर्. मजमुदार, एम्. ए. एलएल्. बी. यांनीं करून दिलें याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

या निबंधाकरितां खालील ग्रंथांचा उपयोग करण्यांत आला आहे व त्या ग्रंथकारांचे आम्ही आभारी आहों.

निरुक्तः—Dr. Laxman Sarup. ( Oxford, 1920 ); जीवानंद विद्यासागर भट्टाचार्य ( कलकत्ता, १८९१ ); व्यंकटेश्वर प्रेस; Introduction to the Nirukta by Rudolph Roth. translated by Rev. D. Mackichan M. A. D. D. LL. D. Bombay, 1919.

षट्कोशसंग्रह—( हेमचंद्र, उणादि, पंचतत्त्वप्रकाश, शारदीनाममाला, विश्व, हलायुध ) बाबू वाराणसीप्रसाद, बनारस, संवत् १९३०.

द्वादशकोशसंग्रह—( मेदिनी, एकाक्षरी, द्विरूप, द्विरूप, त्रिकांडशेष, अनेकार्थध्वनिमंजरी, हारावली, धनंजय, वररुचि, गणितनाममाला, मातृकाकोश ) बाबू वाराणसीप्रसाद, बनारस संवत् १९२९.

संस्कृत कोश ( चतुष्टय )—( त्रिकांडशेष, मेदिनी, हारावली, एकाक्षरी. यांपैकीं उपलब्ध प्रतींत हारावलीकोश नाहीं ) सदाशिव बजाबा शास्त्री अमरापूरकर, मुंबई १८५४.

अमरकोश ( क्षीरस्वामीकृत ' अमरकोशोद्घाटन ' टीकेसह )—कृष्णाजी गोविंद ओक, पुणें १९१३.

Catalogus Catalogorum—Theodor Aufrecht, Leipzig 1891.

Die Indischen Worterbucher–Theodor Zachariae ( Grundriss ). Strassburg 1897.

Encyclopædia Britanica 11th and 14th Edition.

Evolution of English Lexicography by J. A. H. Murray.

The Periodical, 15 February 1928. Oxford University Press.

शास्त्री, मोल्स्वर्थ, केनेडी, H. H. Wilson, इत्यादिकांचे विविध कोश व त्यांच्या प्रस्तावना.

राजवाडे लेखसंग्रह भाग २ रा–संपा. शं. ना. जोशी. शक १८५४, चित्रशाळा प्रेस, पुणें.

॥ श्री ॥

# महाराष्ट्र शब्दकोश

## विभाग पहिला

### अ

**अ**—१ वर्णमालेंतील पहिला स्वर. या वर्णाचें सर्वांत जुनें स्वरूप अशोकाच्या गिरनार शिलालेखांत सांपडतें–ओझा ज्ञाको. २५. ब्रह्मा: विष्णु; महेश; सूर्य; अग्नि; वायु; ब्रह्मः मोर. ३ उपसर्ग नकारार्थी प्रकार सातः (अ) त्यासारखें पण तें नव्हे. 'अब्राह्मण' (ब्राह्मणासारखा पण ब्राह्मण नव्हे); 'अचक्षुर्दर्शन'. (आ) अप्राशस्त्य: अयोग्यता; अनुचितपणा. 'अकाल' (अयोग्य काल); 'अवेळ' ( अयोग्य वेळ ); 'अपथ्य'. (इ) निषेध; प्रतिषेध. 'अदर्शन'. (ई) अभाव. 'अज्ञान'; 'अक्रोध'. (उ) त्याहून इतर, किंवा भेद. 'अमनुष्य' ( मनुष्येतर, जनावर वगैरे ). (ऊ) अल्पत्व: कमीपणा. 'अबोल्या'. 'अनुदरा' (कृशोदरी); 'अशिजा(अर्धवट शिजेलला). (ऋ) विरोध: उलटेपणा. 'अधर्म'; 'अनीति'. ४ निरर्थक. 'अघोर' ( घोर );' अपरोक्ष' ( पाठीमागें ). ५ क्रिवि. मूळ स्थितीला जाणें. 'असुजणें' ( सूज उतरणें ).

**अ**—वर्गीकरणामध्यें उत्तम, प्रथम या अर्थी.'अवर्ग' 'बवर्ग' इ०.

**अइ**—स्त्री. १ आई. २ उद्गा. दुःख आश्चर्यादिवाचक उद्गार. [ ध्व. आई पहा. ]

**अइ, अई**—हे व यांनीं प्रारंभ होणारे शब्द ए मध्यें पहा.

**अइलिया**—पु. शेतांतीलमजूर–भादिसंवृ ६८. [ द्रा अलिआ= मद्रासी शेतकरी जात ? ]

**अइनी**—आयणी पहा.

**अइसा**—असा पहा.

**अई**—स्त्री. १ (कों.) आजी. २ आई. ३ उद्गा. दुःख–शोकदर्शक उद्गार.

**अईन**—स्त्री. १ चांगली कुळी–चाल–वर्तणूक. 'हा अ० चा गृहस्थ'; 'हा अ० नें चालतो'; 'याची मोठी अ० आहे'. म्ह. १ अ०ला मरावें, खरवडीला झुरावें ( जेवणाचें आमंत्रण ऐटीनें नाकारावयाचे परंतु त्यांतील शिळ्या तुकड्यांसाठीं हपापावयाचें). २ अ० रावणाची व आस खेंडुकाची (रावणाप्रमाणें ऐट पण आकांक्षा भिकाऱ्याची ). [ फा. आयीन=सार; सत्त्व. ]. २ ऐन पहा.

**अईन**—पु. एक मोठें, लांब पानांचें झाड: याचें लांकूड गलबतें व इमारती यांच्या उपयोगीं पडतें व मजबूत असतें; काळा आणि पांढरा अशा दोन जाती. काळ्याची साल कोळी लोकांस जाळें रंगविण्यास लागते, तिला सादडा म्हणतात. –वगु. २ ऐन पहा. [!]

**अईसभईस**—वि. ( व. ) अद्भुत ( गोष्ट ). [ ऐसपैस ? ]

**अउटकी, अउटी**—अवटकी, अवटी पहा.

**अउट ( ड ), अउट( ड )कें**—औट, औटकें पहा.

**अउडबारा**—बारा × ३॥ हात ( १ पुरुष ); बारा पुरुष. 'कृष्णें बाण सोडिला तिधारां । रुक्मियासी लागला पिसारा। मागें सारिला अउडबारा । शक्ति अंबरां उडविली ॥'–एरुस्व १२. १२१. [ अउड=औट+बारा ]

**अउणापाउणा**—वि. सुमारें एक किंवा थोडें ( पाव ) कमी अधिक. 'अउणेपाउणे ५ रुपये द्या.' [ सं. अर्धोन + पादोन ]

**अउल्या**—पु. औत पहा.

**अउर**—और पहा.

**अऊ**—पुढील खेरीज अऊनें आरंभ होणारे शब्द औमध्यें पहा.

**अऊत—करी–काठी–पटी–बंदी–भरणा**—औत पहा.

**अऊर**—पु. ( कों. ) नदीचा पूर: ओर. और पहा. [ आ+पूर ! ]

**अऊस**—अवस पहा.

**अऋण(णी)**—वि. कर्ज नसलेला. 'अऋणी, अप्रवासी तोच सुखी'. [ सं. अ+ऋण ]

**अक**—न. दुःख; पाप. [ सं. अ=नाहीं+क=सुख ]

**अकच्छ**—वि. कासोट्याविरहित: ( ल. ) मुसलमान. [ सं. अ+कच्छ=कासोटा ]

**अकंटक**—वि. निष्कंटक; ( ल. ) शत्रु–संकटरहित. [ सं. अ+ कंटक=कांटा ]

**अकटविकट**—वि. १ विशेष चिकित्सा करणारा. २ चिकाटी धरणारा; हट्टी; आग्रही. ३ फार बारकाईनें शोध घेणारा. ४ चिवट; विशेष चिकित्सा करून बसविलेला ( बेत, योजना वगैरे ). [ चिकट द्वि. ]. **०सोळा**–वि. सोंवळयासंबंधीं अतिशय चिकित्सा करणारा. सोंवळा पहा.

**अकट (टो) विकट**—वि. अतिशय मोठा व ओबडधोबड; भवाढव्य; बेढब; अक्राळविक्राळ; अगडबंब; भव्य; भयंकर; (उप.) अत्यल्प; अकटोपासून विकटोपर्यंत ( ज्ञान ). [ विकट द्वि. ]

**अकटी**—स्त्री. लहान शेगडी; आगटी [ सं. अग्निस्थिति ]

**अकटेंदुकटें**—न. ठिकऱ्यांच्या खेळांतील घराचें नांव. ठिकऱ्या पहा.

**अकड, अकडू**—स्त्री. १ ऐट; आव; डौल; दिमाख; नखरा; डांक. २ एखाद्या गोष्टीचा दिमाख दाखविणें, मिरविणें, करणें. **०बाळगणें–धरणें–दाखविणें.** [ सं. वक्र–अकर; आकृति;? हि अकड ] **०णें**–अक्रि. ऐट करणें; डौल मिरविणें; नखरा करणें. **०खोर ०बाज**–वि. ऐट, छानछोकी करणारा; फांकडा; नटवा. **०खोरी ०बाजी–अकडाई**–स्त्री. ऐट करण्याची संवय.

**अकडकडवें**—न. पालुपद; आंकणकडवें पहा.

**अकडंतिकडं**—न. १ ताळतंत्र नाहीं असें बोलणें; वायफळ बडबड, भाषण. २ टाळाटाळ; चुकवाचुकवी. –क्रिवि. वायफळपणें; मुद्दयाला सोडून; विसंगतपणें ( भाषण–क्रिया करणें, बोलणें ). [ इकडे तेकडे अप. सं. अकडमं=अ, क, ड इ० अक्षरांकित एक गूढ चक्र ? ]

**अकढा**—वि. १ न कढलेला; अर्धवट कढलेला ( पदार्थ ). २ बेतळेपर्यंत न तापविलेला ( धातु ). [ अ+कढणें ]

**अकण**—वि. १ कणी नसलेला ( तांदूळ वगैरे ). २ कणसांत दाणे नसलेलें (पीक); पोल. ३ खावयास धान्य नाहीं असा; दरिद्री; निर्धन. 'अकणा कण होय, अधना धन होय'. [ सं. अ+कण ] **०कडवें**–आकण कडवें पहा.

**अकत्यार**—अख्त्यार पहा.

**अकथित**—वि. न सांगितलेलें; न बोललेलें. [ सं. ]

**अकथ्य**—वि. अकथनीय; न सांगण्यासारखें; अवर्ण्य. [ सं. ]

**अकद**—वि. ज्यास आकार नाहीं असा. [ अर. कद = ठेवण; बांधा ]

**अकदस**—वि. पुण्यवान; पुण्यशील; धर्मात्मा. –रा १५, १६४. [ अर. अक्दस्=फार पुण्यशील, अत्यंत पवित्र ]

**अकपट**—वि. १ निष्कपट; सरळ. २ खरा; वास्तविक. –न. मोकळेपणा; निर्व्याजता; खुलें दिल; शुद्ध भाव. [ सं. अ + कपट ]

**अकब**—क्रिवि. मागून; नंतर. 'अकब अंदाज आशूरा' –पया ३८५. 'अकबन् अज़् आशूरा' = आशूऱ्यानंतर. [ फा. ]

**अकबर**—वि. श्रेष्ठ; थोर; मोठा. –पु. एक मोंगल बादशहा. [ अर. अक्बर ]

**अकबरनवीस–नीस**—अखबार पहा.

**अकबरशाही**—वि. अकबरानें चालू केलेलें ( रुपया, मोहोर वगैरे नाणें. ). –स्त्री. अकबराची कारकीर्द; अकबराच्या कारकीर्दी-संबंधीं माहिती. –पया ३८५. [ फा. ]

**अकबराबाद**—न. आग्रा शहर. –रा ६.५८४; पया ४४६ [ अर. अक्बर+फा. आबाद=वसविलेलें गांव ]

**अकबरी**—स्त्री. १ अकबराची मोहोर. २ तांदुळाच्या पिठाचा केलेला एक पदार्थ (लुप्त). –वि. अकबरासंबंधीं(कायदे, नाणीं, प्रघात.) **०मोहर–मोहोर**–स्त्री. १ अकबराचें उत्तम सोन्याचें नाणें, १५ रु. किंमतीचें. २ या नाण्यांची केलेली माळ. ३ ( ल. )–चांगल्या प्रतीचा किंवा इभ्रतदार (व्यापारी, फायदेशीर धंदा, सुपीक जमीन इ० ). [ अर. अक्बर=श्रेष्ठ + ई ]

**अकबार**—वि. पूर्ण बहारयुक्त. 'केतकी कर्दळी अकबार। बहु टवटवती' –पला ३.६. [ अखा+बहार ]

**अकबार**—अखबार पहा. [ फा. ]. पु. **०नवीस–नीस**–अखबार खालीं पहा.

**अकमान**—पु. ( गो. ) अपमान. [सं. अप+मान ]

**अकरकीं**—न. अव. अकरापासून वीस पर्यंत अंकांचा परस्पर गुणाकार करून बसविलेले पाढे. 'अकरें अकरें एकविसारें'. [अकरा]

**अकरकीं**—क्रिवि. अकरीं; सोंगटयांमध्यें अकराव्या घरांत. [ अकरा ]

**अकरण**—न. कर्मराहित्य; निष्क्रियत्व; कर्मापासून मुक्तता. 'तरी अकरणाचेनि खेदें।' ज्ञा १८.५९२. [ सं. ]

**अकरणरूप**—न. ( व्या. ) कोणताहि धातु निषेध किंवा नाहीं या अर्थानें चालविला असतां त्याचें होणारें रूपांतर. 'मी नाहीं'; 'तो करणार नाहीं'. [ सं. ]

**अकरणीय**—वि. करण्यास अयोग्य; निषिद्ध; त्याज्य. 'परि-करणीया अकरणीया न देखा' –ऋ ४५. [ सं. ]

**अकरताळ–ळ्या**—वि. हट्टी; माथेफिरू; कजाग; खोडकर; दांडगा (विशेषतः मुलें व स्त्रिया यांच्या बाबतींत). [ सं. अक्त+लु=आळ; प्रा. दे. अक्कसाला=उन्मत्त स्त्री ]

**अकरनकर**—वि. सांगितलेलें काम न करतां न सांगितलेलें काम करणारा; हट्टी; दुराग्रही. [ सं. अक्र+नक्र ]

**अकरम**—वि. कृपावंत; दयाळु. [ अर. अक्राम् ]

**अकरमाशा–शी**—वि. १ (क्वचित्) अकरा मासे वजनाचा (तोळा, रुपया इ०). २ अनौरस; जारज; हीन बीजाचा; कमजात;

दासीपुत्र. ( बारा मासे नाहींत म्हणून कमी असा ). [ अकरा+मासे ] ३ ( ल. ) कृतघ्न. ४ अकरा महिने पोटांत गर्भ बाळगणारा प्राणी ( म्हैस ). [ अकरा+मास ]. ०**खरबूज**—खरबुजाची एक जात.

**अकरमास**—पु. (व.) वर्षश्राद्ध; अब्दपूरित? [ अकरा+मास ]

**अकरमाही**—स्त्री. बारा महिने चाकरी घेऊन अकरा महिन्यांचा पगार देण्याची रीत. ही इंग्रजी अंमलापूर्वी सरकारी व खाजगी नोकरींत बहुतेक हिंदुस्थानांत प्रचलित होती. ' साल अखेर २९ दिवस वजा करून देणे ' ( ११ महिने १ दिवस धरून )—समारो. २. ४९. [ अकरा+फा. माह्=महिना ]

**अकरस**—आकरस पहा.

**अकरा**—वि. ११ संख्या. ०**इंद्रियें**—५ कर्मेंद्रियें, ५ ज्ञानेंद्रियें व मन.—एभा १४.१०४. ०**नरक**—तामिस्र, अंधतामिस्र, रौरव, महारौरव, सांडस, कुंभीपाक, काळसूत्र, तप्तसूर्मि, वेतरणी, वज्रकंटक व असिपत्र. नांवांबद्दल एकवाक्यता नाहीं.—कथा. ६.४.१२७. ०**रुद्र**—रैवत, अज, भीम, भव, वाम, वृषाकपि, अजेकपाद, उग्र, अहिर्बुध्न्य, बहुरूप व महान. —हंको. वीरभद्र, शंभु, गिरीश, अजेकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, भुवनाधीश्वर, कपाली, स्थाणु व भव —सप्राको. नांवांविषयीं मतभेद आहे. [ सं. एकादश; प्रा. एग्गारह, एआरह; पा. एकादस, एकारस; अमा. एक्कारस; सिंह. एकोळोस, एकोळह; काश्मी, काह; बं. उरि. एगार; हिं. इगारह, ग्यारह; पं. ग्याराम; सिं. इकारहम, यारहम; गु. अग्यार. ]

**अकरावा**—वि. १ क्रमानें १० नंतरचा. पु. १ मृताच्या ११ व्या दिवशींचा वृषोत्सर्गादि विधि. २ दाट मैत्री, (अकराव्या राशीला गुरु आला असतां तो शुभ असतो म्हणून). ०**गुरु**—दाट मैत्री (बारावा बृहस्पति=शत्रुत्व). ०**रुद्र**—शिवाचा एक अवतार; मारुती. (ल.) अतिरागीट माणूस ( सर्व रुद्रांत ११ वा जास्त क्रूर ). [ अकरा ]

**अकराळ विकराळ**—वि. भयंकर; भीतिदायक. [ सं. कराल द्वि. ]

**अकरीं**—सोंगट्यांच्या पटांत विवक्षित घरापासून अकराव्या घरीं. 'सोंगटी अकरीं—वारीं—तेरीं आहे.' [ अकराची सप्तमी ]

**अकरीत**—अक्रीत पहा.

**अकरुण**—वि. निर्दय; निष्ठुर. [ सं. अ+करुणा ]

**अकरें**—न. १ ( देवापुढें लावण्याच्या ) ११ वातींचा समूह. २ आज १, उद्यां २, परवां ३ असे चढत्या क्रमानें ११ पर्यंत व पुन्हां उतरत्या क्रमानें १ पर्यंत देवापुढें लावण्याचे पिठाचे दिवे. ३ अकरकीं पहा.

**अकरोट (ड)**—अक्रोट पहा.

**अकर्तव्य**—वि. करण्यास अयोग्य. [ सं. अ+कृ ]

**अकर्ता**—वि. १ करण्यास अपात्र, अयोग्य. २ कांहींच कर्तव्य न उरलेला; सिद्ध. ' जे अकर्त्याच्या ठायीं बैसों येती। ' ज्ञा १३. २८०. ३ कांहीं न करणारा ( आळशी ); स्वस्थ. [ सं. अ+कृ ]

**अकर्तृक**—वि. ( व्या ) १ ज्यास कर्ता नाहीं तो प्रयोग; ज्याचा कर्ता क्रियापदापासून निराळा असत नाहीं असा; ' फावणें, सांजावणें ' इ० धातू. २ कर्त्यावांचून असलेलें. [ सं. अ+कृ ]

**अकर्तृत्व**—न. नालायकी; असामर्थ्य; करण्यास अपात्रता. [ सं. अ+कृ ]

**अकर्म**—न. १ वाईट काम; पाप कृत्य; निषिद्ध कर्म. 'तंव तंव होतीं थोराडें। अकर्माचीं तळवुडें ॥ ' ज्ञा १५. १६८. २ ज्यास कर्म नाहीं असें; कर्मातीत; ब्रह्म. 'जें कर्माविगळें सर्वांगें। जेथ लाविताहि न लगे। जे नव्हे कर्मठाजोगें। ते जाण सवेगें अकर्म ॥ ' —एभा ७. ६६. [ सं. अ+कर्म ]

**अकर्मक**—वि. (व्या.) ज्यास कर्म नाहीं तें (क्रियापद).[सं.]

**अकर्मकर्तरी**—वि. ( व्या. ) जेथें अकर्मक क्रियापदाचा योग असून कर्त्याच्या अनुरोधानें क्रियापद असतें, तो प्रयोग. उ० ' तो चालतो ' ' तो निजतो.' [ सं. अकर्म+कर्तृ ]

**अकर्मा**—वि. १ कर्महीन; रिकामा; कर्मातीत; कर्मरहित. ' मी अकर्मा। न करोनि करीं कर्मं ॥ '—एभा. २. ३९८. २ साहसकर्म करणारा. ०**कार**—वि. वाईट, पाप, साहस करणारा. ' अंबालयीं यादव वीर । उतरले आहेती अकर्माकार ॥ ' एरुस्व ६.४१. [ सं. अ+कर्म ]

**अकर्मी**—वि. १ अकर्म करणारा. २ दुर्दैवी; अभागी; कमनशिबाचा.

**अकल—करा—कऱ्हा—काडा—काढा—कारा**—अक्कल पहा.

**अकल**—वि. कलारहित. ' जयजय अकलकलाशून्य। ' —यो १.९. [ सं. ]

**अकलं (ळं) क**—वि. निष्पाप; निर्दोष; कलंकरहित. [ सं. अ+कलंक ]

**अकलदमा, हकलदमा**—न. (ख्रि.) रक्ताचें शेत. हें यरुशलेमाबाहेर सियोन डोंगराच्या दक्षिणेस आहे. यहुदा इस्कारयोत यास गुरुद्रोहाचा मोबदला म्हणून जो पैसा मिळाला त्याचें हें शेत विकत घेण्यांत आलें होतें; म्हणून त्यास अकलदमा म्हणजे रक्ताचें शेत हें नांव पडलें. हल्लीं त्या ठिकाणास हक्—एद्—दम असें म्हणतात. ' त्यांच्या भाषेंत त्या शेताला अकलदमा म्हणजे रक्ताचें शेत असें नांव पडलें आहे.' प्रेक्र. १.१९. मत्त. २७.३.१०. [ ॲरे. हखल+दमा ]

**अकला**—पु. घोड्याचा एक रोग; यापासून घोडा लंगडतो. —अश्वप. २.३१९. [ फा. ]

**अकलाद**—वि. ( कर. ) अल्लाद पहा.

**अकल्पन**—वि. कल्पनारहित; निरिच्छ. ' अकल्पनाख्य कल्पतरो । ' ज्ञा. १८. १०. ०**अकल्पनीय**—वि. कल्पना करतां येणार नाहीं असें; अतर्क्य; न सुचणारें. [ सं. क्लृप् ]

**अकल्पित**—वि. १ ज्याची कल्पना होणार नाही असे. ' कि अकल्पित द्रव्य अपार । दुर्बळ ब्राह्मणां दिधलें ॥ ' २ ज्याविषयीं पूर्वी कांहीं योजना, तयारी, बेत, विचार केलेला नाहीं असें. ३ अकृत्रिम. ४ अनुद्दिष्ट. –क्रिवि. अकस्मात्. [ सं. ]

**अकलमन्द**—वि. १ शहाणा: चतुर: हुषार· बुद्धिमान. विद्वान २ ( चुकीनें ) बेअकली; मूर्ख. [ अर. अक्ल+फा. मन्द ]

**अकल्मष**—वि. निष्पाप; निर्दोष. [ सं. अ+कल्मष ]

**अकल्याण**—वि. अशुभ· वाईट. –न. असंगल. [ सं. अ+कल्याण ]

**अकलवंत**—वि. अकलमंद: बुद्धिमान्. ' हरिपंत फडके बहुत अकलवंत होते. ' पया २. [ अर. अक्ल+सं वंत ]

**अकवि**—वि. मूर्ख; अज्ञानी. –हंको. [ सं. अ+कवि ]

**अकस**—पु.स्त्री. द्वेष. मत्सर: हेवादावा: चुरस: अदावत द्रोह; वैर. ' सर्व सराफ अकसीने फिरोन कजिया करितात. '–रा ११.६९. [अर.]. ०**खोर, अकसी**–वि. खुनशी. दुष्ट. हेवखोर: द्वेष्टा; मत्सरी.

**अकसणें**—अक्रि. आंखूड होणें; अक्रमणें [ सं. आ+क्रुश् ]

**अकसारणें**—अक्रि. प्रसिद्ध होणें. [अस्करा. फा. आश्कारा]

**अकसाळी**—स्त्री. कर्नाटकी सोनारांची जात. [ सं. अर्क. प्रा. अक्क=सुवर्ण+शाला=दुकान ]

**अकसीर**—वि. रामबाण: गुणकारक: परिणामकारी. [ अर. इक्सीर=अमृत ]

**अकस्मात्**—वि. १ एकाएकीं. अकल्पित २ विचार केल्याशिवाय. ' दृष्टि न पहातां अवघा ग्रंथ । उगाच दोष ठेविजे अकस्मात ॥ तो शतमूर्ख जाण निश्चित । नव्हे पंडित विवेकी.' [ सं अ+कस्मात ]. ०**अकस्मात्**–अकस्मात्. अप.

**अकळ**—वि. अगम्य; न समजणारें. 'अकळ देख लीला त्यांनी॥ –ह ८.१२०: ' सकळांसि आश्चर्य वाटलें तेव्हां । अकळ माया देखोनिया ॥ ' –मक ३६.९०; ' येरु म्हणे जी चक्रपाणी । तुझी तों अकळ दिसे करणी ॥ ' –जै. ९२. ८०. [ सं. अ+कल्=समजणे, जाणणें ]

**अकळणें**—अक्रि. आकळी, जांभई, उचकी, अखेरचा श्वास येणें–देणें. [ सं. आ+कल्ल्=अस्पष्ट ध्वनि करणें ] २ आकळणें पहा.

**अकळत अकळून, नकळत नकळून**—क्रिवि. न समजतां; अर्धवट समजून. ' मी बुद्ध्यां अपराध करणार नाहीं, अकळत नकळत झाला तर क्षमा करावी. ' [ सं. अ+कल्=जाणणें ]

**अकळवणी**—न. भलत्याच वेळीं पडणारा पाऊस; अकालवृष्टि. [ सं. अकाल+वन–( प्रा. ) वण=पाणी ]

**अकळी**—स्त्री. १ अखेरचा श्वास; उचकी; आंचका. २ जांभई. ०**देणें–येणें**. [ ध्व. सं अ+कल्ल्=अस्पष्ट ध्वनि करणें ]

**अका**—अक्का पहा.

**अकाउंट**—पु. १ हिशेब: जमाखर्च. २ हकीकत. ०**बुक**–जमाखर्चाची वही, चोपडी. **अकाउंटंट**–हिशेबनीस: फडणीस. [ इं ]

**अकांचन**—वि निष्कांचन: निर्धन द्रव्य नसलेला; गरीब; दरिद्री. [ सं. अ+कांचन ]

**अकांड–डी**—वि अकाली· अनपेक्षित ' अकांड प्रळयीं रक्षणकारी । ' –सप्र ६.२१: 'रामदेवरावाच्या पश्चात्......एकाएकीं अकांडीं पहिला उत्कर्षकाळ आटोपला ' –दभा ४. [सं. अ+कांड=उचितकाळ ]. ०**तांडव**–न १ व्यर्थ. भलत्याच वेळीं, अकालीं बडबड. मोठ्याने व रागाने केलेली बडबड. ' युक्ति वाढवुनि उदंड । नाना मते अकांडतांड (व) । ग्राह्य संचरोनि पाखांड । गर्जत तोंड महावादे॥' –एभा १०२ १९. २ रागाच्या भरांत दुसऱ्यावर झाडलेला तागेरा. ३ मोठे गजवजून मोडणारें कार्य [ सं. अकांड+तांडव=नृत्य ]

**अकांत**—पु.प्र आकांत १ कोलाहल आरडाओरड; आक्रोश; अतिशय शोक २ मोठा अनर्थ [सं. आक्रंदन ] ०**णें–होणें–करणें–मांडणें**–मोठ्यानें शोक करणें. ' अकांतले पृथ्वीचे जन.' ०**वर्पणें**–अनर्थ ओढवणें.

**अकांत लोकांत**—पु ? मोठमोठ्यानें लोकांसमोर आक्रोश. ०**करणें–मांडणें** २ ( गो ) घाबरणें.

**अकाबर**—पु मोठे लोक: श्रीमंत. [ अर. अक्बरचें अव. ]

**अकाबाई**—अक्काबाई पहा

**अकामी**—वि. निरुपयोगी. निकामी: व्यर्थ [ अ+काम ]

**अकाम्य**—वि. निर्हेतुक निर्लोभी. [ सं. ]. ०**कर्म–धर्म–भक्ति–सेवा**

**अकार**—पु अ हा स्वर [ सं ] ०**मात्रा**–स्त्री. प्रणवांतील पहिली अची मात्रा. 'अकार उकार मकार । तिन्ही मिळुनि ओंकार॥'

**अकारण**—क्रिवि. १ निमित्तावांचून; विनाकारण; निष्कारण. २ निरुपयोगी; बेफायदा: ज्याची गरज नाहीं असें; व्यर्थ; मिथ्या. ' म्हणवुनि मज एकेविण । हे त्रयीधर्म अकारण ॥ ' –ज्ञा ९.३३४; 'आत्मदर्शीचे लक्षण । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । तिन्ही होउनि अकारण । परिपूर्ण श्रीकृष्ण ॥ ' –एरुस्व १३.८१. ०**बंधु**–पु. निरपेक्ष सहाय्यक; निमित्त नसतांना होणारा मित्र. 'सरकारचे अकारणबंधूहि त्याजविरुद्ध आहेत. ' –टि. २. २. २७५. [ सं. ] **अकारणिक ( णी )**–वि. निरुपयोगी.

**अकारत (थ)**—वि. व्यर्थ; विनाकारण. [ सं. अ+ कार्य ]

**अकारादि वर्ण**—पु. अव. अकारापासून सुरू होणारी वर्णमाला. [ सं. अकार+आदि+वर्ण=अ आहे आरंभीं ज्यांच्या अशीं मूळाक्षरें ]

**अकारान्त**—वि. अ आहे शेवटीं ज्याच्या असें. [ सं अकार +अन्त ]

**अकारीब**—पु. १ नातलग; जवळचे लोक २ माहीतगार; भूम्या; जाणता. ' तुम्ही सर्व त्या प्रांताचे अकारीब, जाणे न जाणे ' —ग १.२८१; 'हुजूरचे अकारीब ' —रा. १५.२५ [अर. कर्बिचें अव]

**अकार्पण्य**—न. कृपणतेचा अभाव; समृद्धि. [सं. अ+कार्पण्य]

**अकार्य**—न. अयोग्य कृत्य; गुन्हा; अपराध; दोष —वि. करण्याची गरज नाहीं असें; अयोग्य [ सं ]

**अकाल**—पु. १ अयोग्य वेळ. २ दुष्काळ. दुर्भिक्ष ३ शीखांचा ईश्वर. 'सत श्री अकाल' [सं अ+काल]. ०**गमन**—न अवेळीं जाणें ०**ज**—वि. अवेळीं जन्मलेला. ०**जन्म**—पु अवेळी जन्म ०**मरण**—**मृत्यु**—न. पु. अवेळीं मरण ०**वृष्टि**—स्त्री. अवेळीं पडलेला पाऊस

**अकालिक**—वि अवेळीं, भलत्यावेळीं, अयोग्य वेळीं केलेलें—घडलेलें. [ सं. ]

**अकालिफा**—न. (कुण० खलिफा) तांबडसर रंगीबेरंगी पानांचें बागेंतील एक शोभेचें झाड. [ इं. ]

**अकाली**—पु. शीखांचा एक पंथ. [ सं. अ+काल ]

**अकालीन**—वि. अवेळचा; अप्रासंगिक, अयोग्यवेळीं आणलेला, केलेला. [ सं. अ+काल ]

**अकालोत्पन्न**—वि. पूर्ण दिवस भरण्यापूर्वी जन्मलेला [ सं. अ+काल+उत्पन्न ]

**अकाल्पनिक**—वि अकृत्रिम; वास्तविक; सत्य बनावट नसलेला; मूळासं धरून. [ सं. अ+क्लृप् ]

**अकाशिया**—स्त्री. (गु.) पावसाच्या पाण्यावर अवलंबून असणारी ( भात ) जमीन. [ सं. आकाश ]

**अकाळ**—पु. अयोग्य वेळ. अकाल पहा ' जैसे कां अभ्रपटळ। अकाळीचें ॥ ' ज्ञा. २.१८१ ०**वणी**—अकळवणी पहा ०**वृष्टि**—अकाल पहा

**अकाळ्या**—वि. अप्रासंगिक; अवेळीं पडलेला (पाऊस). [ सं. अकाल ]

**अकांक्षा**—आकांक्षा पहा.

**अकि**—स्त्री. सडीक तांदूळ. [ का. अक्कि ]

**अकिंचन**—वि. अतिशय गरीब; जवळ कांहीं एक नाही असा; दरिद्री; कंगाल. ' हा सारा जन्मभर अकिंचन राहिला '. नि ७१. [ सं. अ+किम्+चन ]

**अकिंचित्**—वि. किंचितहि नाहीं; मुळींच नाहीं. [सं. अ+किम् +चित्]. ०**कर**—वि. क्षुल्लक; क्षुद्र. ०**ज्ञान**—अगदीं थोडें ज्ञान. ०**प्रद**-**बोध-वद.**

**अकीक**—पु. एक तांबूस, कठिण, चांगली जिल्हई बसणारें रत्न —कॉर्नेलियन. हें मुद्रा करण्यास योग्य असून अगेट ( गोमेद ), रेती किंवा सिलिका ( गार ) यांचे बनलेलें असतें. [ अर. ]

**अकीदत**—स्त्री निष्ठा; विश्वास. [ अर. ]

**अकीन**—पु. खात्री. सत्य. २ मन्याचा वाली [अर **यकीन्**]

**अकीर्तनीय**—वि. स्तुति करण्यास अपात्र अवर्ण्य. [ सं. अ+कृत ]

**अकीर्ति**—स्त्री. दुष्कीर्ति; कुप्रसिद्धि; बदनामी दुर्लौकिक. [सं.]

**अकुटेंदुकुटें**—ठिकऱ्या पहा.

**अकुंठ-ठित**—वि १ अबाधित २ दृढ ३ अप्रतिबद्ध; अप्रतिहत (भाषण, कार्य) ' तो दशकंठ अकुंठ विसां भुजि ते विषकंठ धनू उचलीं ॥ —सीस्व. ४ असंड (वाचा गति कृति, इ०). [ सं अ+कुंठ् ]

**अकुतोभय**—वि अपभ्रष्टरूप अक (कु) तोभय १ जो कशासहि भीत नाहीं ज्यास कोणतीहि भीति नाहीं असा (पुरुष, वस्तु). २ निर्भय धीट संकटें सहन करण्यास समर्थ; बेडर. मजबूत (इमारतीसंबंधी ) ' मातीची भिंत घालितां त्यापेक्षां चिऱ्यांची घातली म्हणजे अकुतोभय होईल.' [ सं. अ+कुत +भयं ]

**अकुलज**—वि. हीनकुलोत्पन्न; क्षुद्र नीच; ग्राम्य. [ सं. अ+कुल+ज ]

**अकुलीन**—अकुलज पहा

**अकुशल**—वि. १ अडाणी, अतज्ज्ञ २ अशुभ ३ ( तत्त्व. ) असुखवेदनीय; दुःखकारक. [ सं. अ+कुशल ]

**अकुळी**—वि कुलरहित; कुळाचा पत्ता नाहीं असा. ' एक म्हणती नंदाचा । एक म्हणती वसुदेवाचा । ठाव नाहीं बापाचा । अकुळी साचा श्रीकृष्ण ॥ ' —एरुस्व २. ३. [ सं. अ+कुल ]

**अकूट**—न विष न पाजलेलें ( शस्त्र ) [ सं. अ+कूट=विष ]

**अकूपार**—पु समुद्र २ खडक ३ कांसव. कूर्मावतार. ४ सूर्य. [ सं. ]

**अकूर**—पु घोड्याचा एक रोग—घोड्याने उडी मारली असतां नरगडी मोडते तो —अश्वप ३०१ [ सं अक+उरस्? ]

**अकृत**—वि न केलेलें; न संपविलेलें. [ सं. अ+कृत ]. —न. वाईट कृत्य. पातक [सं. अ+कृत्य]. ०**काल**—वि अनिश्चित कालाचें; ज्यास कालाची मर्यादा घातली नाहीं असें; बिनमुदतीचें ( कर्ज, व्याज इ० ). [ सं ] ०**घ्न**—वि कृतज्ञ; उपकार स्मरणारा. [सं. अ+कृतघ्न ] ०**ज्ञ**—वि. कृतघ्न; उपकार न स्मरणारा. [ सं. अ+कृतज्ञ ]. ०**अकृत**—( अकृताकृत ) अक्रीतार्थी चुकीने. अक्रीत पहा

**अकृताश्रम**—वि. आश्रमातीत; वर्णाश्रमधर्मापलीकडे गेलेला. ' आत्माभ्यासीं परिश्रम । करूनि निरसिलें कर्माकर्म । यालागीं तें अकृताश्रम । निजनिश्रम स्वयें जाहले ॥ ' —एभा २. १६६ [ सं. अकृत+आश्रम ]

**अकुतोभय**—(अप.) अकुतोभय पहा.

**अकृत्य**—न. निषिद्ध कर्म; वाईट काम; पाप. ' अकृत्य कुडें तें लोकीं। वाळावें गा । ' –ज्ञा १६.४६६. [ सं. ]

**अकृत्रिम**—वि. १ कृत्रिम नव्हे तें; सहज; स्वाभाविक. ' कां चंदनाची वुती जैसी । चंदनीं भजे अैसी । कां अकृत्रिम शशी । चंद्रिका ते ॥ ' –ज्ञा १८. ११५०. २ स्वयंभू; मनुष्यानें न केलेली (देवता इ०). ३ वास्तविक; खरें. ' तंव शब्दविता प्रगट पोटीं। तेणें अकृत्रिम भजन उठी। ब्रह्मार्पण मिटी । श्रवणें पडे । ' –एभा२.३६४. ४ निष्कपट, प्रामाणिक, मोकळ्या मनाचा. –न. मोकळेपणा, निष्कपटता; निर्व्याजता. [ सं. ]

**अक्लप्त**—वि. ज्याबद्दल पूर्वी कांहीं योजना केली नाहीं असें. [ सं. अ+क्लृप्त ]

**अकेंद्र**—(पाश ) केन्द्रीभूत न झालेलें ' नॉन न्युक्लीएटेड ' [ सं. अ+केंद्र ]

**अकेला**—वि (हिं.) एकटा, एकला, एकाकी. [ सं. एकल. ]

**अकोचणें**—अक्रि. संकोचणें; अंग लपविणें. ' मूळ तो लपाला अकोचुनी । ' –दावि ३.२८. [ सं आ+कुच् ]

**अकोटा**—न (कों.) एकाचें मालकीचें गलबत दुसऱ्यास वापरण्यास दिल्याबद्दलचें भाडें ( नोर नव्हे ). ०**पत्र**–न. वरील बद्दलचें करारपत्र; भाडेपत्र. [ ? ]

**अकोनाईट**—न. एक होमिओपाथींचें हिवताप, संधिवात, गोंवर, यांवरील विषारी वनस्पतीपासून तयार केलेलें औषध; बचनाग. २ अतिविष. [ फ्री. इं ]

**अकोल(ळ)**—न. कण्हेरीच्या पानाप्रमाणें लांबट, रुंद, वर रेषा असलेल्या पानांचें एक झाड. हें वातिकारक असून विष, कफ, कटिशूल, कृमी, सूज, यांवर व कुत्रें, मांजर, उंदीर यांच्या विषावर गुणकारक आहे. याचें बींहि औषधी असून त्याचें तेल त्वग्दोषावर व मंत्रतंत्रामध्यें उपयोगी आहे. –वगु. [ सं.]

**अक्कड**—अकड पहा.

**अक्कण**—वि. ( कों. ) चिकट. ' अक्कण माती चिक्कण माती ' –मसाप २.१. [ चिक्कण द्वि. ]

**अक्करताळा**—अकरताळ पहा.

**अक्कल**—स्त्री. शहाणपण; चातुर्य; बुध्दि. [ अर. अक्ल ]. ०**गुंग होणें**–बुद्धि कुंठित होणें. ०**जाणें**–शहाणपण नाहींसें होणें. **म्ह.** ' आधीं जाते अक्कल, मग जातें भांडवल. ' ०**विकत घेणें**–धडा शिकणें; पुष्कळ किंमत देऊन शहाणपण शिकणें; फार महाग पडलेल्या अनुभवानें शहाणें होणें. ०**सांगणें**–सल्ला देणें; युक्ति सांगणें. ०**से खुदा पछानना**–शहाणपणानें देवासहि जाणतां येतें; ही म्हण एखाद्याला आपल्या बुद्धीचा उपयोग करावयास सांगण्याकरितां वापरतात. –**लेचा कांदा–खंदक–गड्डा**—अति शहाणा; दीडशहाणा; मूर्ख. –**लेचा गधडा**–मूर्ख; ढ, मतिमंद; बावळट. –**लेचे तारे तोडणें**–अविचारानें बोलणें. ' लतिके ! ज्या तोंडानें हे अकलेचे तारे तोडीत होतीस, त्याच तोंडाला असे खडे चारतांना मला कल्पांतापर्यंत सुद्धां दया येणार नाहीं. ' –भा १६५. –**लेचा बंद**–दूरदर्शित्व; शहाणपण; चातुर्य. ' अकलेचा बंद नाहीं घातला । ' –दा १९. ८. १५.

**अक्कलक(का)डा–ढा–रा–ऱ्हा**—पु. एक हात भर उंचीचें झाड. हें बंगाल, अरबस्तान, इजिप्त इकडे फार होतें; झेंडूसारखीं पिवळीं फुलें येतात, तीं खोकल्यावर घेतात व जिव्हेसंबंधीं व्यंग असल्यास झाडाची कांडी तोंडांत धरतात, याचा काढा संधिवातावर घेतात. –वगु. [ अर. अक्ल+कऱ्हा ]

**अक्कलखाद**—वि. संपूर्ण; समूळ; अगदीं साफ ( सर्वनाश दाखविणारें विशेषण ). ' यंदां शेतें अक्कलखाद बुडालीं. ' [ अर. अक्ल+ सं. खाद् = खाणें ]

**अक्कलदाढ**—स्त्री. अगदीं शेवटच्या खालच्या व वरच्या दोन दाढांपैकीं प्रत्येक. या सगळ्यांच्या शेवटीं येतात.

**अक्कलबाज–मंद–मान–वंत–वान**—वि शहाणा; चतुर; धूर्त; युक्तिबाज; (उप ) मूर्ख.

**अक्कलबुद्धीनें**–क्रिवि. विचारपूर्वक; शहाणपणानें.–रा ८.२२४.

**अक्कलहुशारी**—स्त्री. पूर्ण खुषी व संमति; सावधानचित्त; राजीखुषी ( दुसऱ्यानें सक्ति न करतां अगर न फसवितां ) ( कागदपत्र, दस्तऐवज वगैरेमध्यें वापरतात ).

**अक्का**—स्त्री. वडील बहीण. [ सं. अक्का=आई; का. अक्का= वडील बहीण. मूळ द्राविड ].

**अक्काबाई**—स्त्री. लक्ष्मीची वडील बहीण; ( ल. ) दारिद्र्य; दुर्दशा; दुर्दैव; दुर्बुद्धि; दुष्ट, भांडखुदळ स्त्री. ' अक्काबाई दोहीं दारीं फुगडया घालिती. ' [का. अक्का]. ०**चा पाया**–दुर्दैवाचीं पूर्व चिन्हें. ०**चें पोर**–दुर्दैव. ' हें अक्काबाईचें पोर (१९०१ चें शेतकी बिल) सर्व इलाखा भिकारी करील '.– टि २.२.२६७. ०**चा फेरा**–वाईट दशा; दारिद्र्य, दुर्दैवाचें आगमन. ०**ची दया**–दारिद्र्य. ०**चें बाळ**–दुर्दैवी मूल.

**अक्खा**—अखा पहा.

**ॲक्चुअरी**—पु. विम्याच्या हिशेबी कारभारांतला तज्ज्ञ. [ इं ]

**ॲक्ट**—पु. १ कायदा; शासन. २ नाटकांतील अंक. [ इं. ]

**ॲक्टर**—पु. नट. [ इं. ]

**ॲक्टिंग**—पु. सोंगाची संपादणी; अभिनय; हावभाव. ' बालगंधर्वाला मेनकेचें ॲक्टिंग साधणार नाहीं ही गोष्ट साधारण नव्हे. ' नाकु–१७. –वि. दुसऱ्याकरितां तात्पुरतें काम करणारा; बदली; अमानी. [ इं. ]

**अक्टोबर**—पु. इंग्रजी १० वा महिना–दिवस ३१. मराठी आश्विन–कार्तिकाचा सुमार. [ इं. ]

**अक्दस**—अकदस पहा.

**अक्बर**—अकबर पहा.

**अक्ताळा-ळी, अक्रस्ताळा-ळी**—अकरताळ पहा

**अक्तोभय**—( अप ) अकुतोभय पहा.

**अक्बपेनी**—वि. पानासारखा टिळा कपाळावर असणारा (घोडा ).-अश्वप १०४. [ उर्दु ]

**अक्रम**—वि. अव्यवस्थित; क्रमरहित. 'वाचेचें विलुळणें । सावरोनि प्राणें । अक्रमाचें क्रमणें । ठेवोनि ठायीं ॥' -ज्ञा १८. १५५७ -पु एक पत्त्यांचा खेळ; यांत सर्व पत्त्यांची किंमत ठरविलेली असते, त्यावरून हातांत असलेल्या पानांचे गुण २१ अगर जवळ जवळ २१ होतील असा प्रयत्न खेळाडूनें केला पाहिजे; २१ पेक्षां जास्त गुण झाल्यास नुकसान होतें. [ सं. अ+क्रम ]

**अक्रय्य-अक्रेय**—वि. विकत घेतां न येण्यासारखा, विकतां न येण्यासारखा. [ सं. अ+क्री ]

**अक्रस**—वि. रुक्ष; नीरस; तूपदूध नसलेले; अगात्विक (अन्न) [ सं. अक्=जाणे+रस ? ]. ०**नक्रस** -रुक्ष [ अक्रस द्वि. ]

**अक्रस्ताळा**—अकरताळ पहा.

**अक्रा-अक्रावा**—अकरा पहा.

**अक्राळविक्राळ**—अकराळविकराळ पहा.

**अक्रिय**—वि. न करणारा; कोणतीहि क्रिया न करणारा; निष्कर्म (ईश्वरासंबंधीं, जसें-निर्गुण, निराकार ); निष्क्रिय; क्रियारहित 'मज अक्रियासी कर्म । '-ज्ञा ९ १५६. [ सं अ+क्रिया ]

**अक्री**—अखरी पहा

**अक्रीं**—अकरी पहा.

**अक्रीत**—वि. ( हा शब्द व्युत्पत्तिदृष्ट्या बरोबर असून याचा उपयोग मात्र अनियमितपणें होतो. ) १ बेसुमार; अतिशय. ०**घेणें -देणें**-एखादी वस्तु प्रमाणाबाहेर अतिशय किंमत देऊन विकत घेणें, अथवा विकणें, अतिशय जबर व्याज घेऊन रक्कम देणें. २ भलत्याच दरानें; बाजारभावाच्या मानानें अतिशय जास्त भावानें. ३ मोफत; फुकट; मोबदला न घेतां. 'मी अक्रीत खात नाहीं.' 'मी कोणाचें अक्रीत घेणार नाहीं'= मी दुसऱ्याचें कांहीं चुकीनें घेणार नाहीं. अक्रीताचा व्यवहार=अप्रामाणिकव्यवहार. 'अक्रीत मिळविलेला पैसा जयास जात नाहीं.' [ सं. अ+क्री ] ०**विक्या**-वि. भलतीच किंमत घेऊन विकणारा.

**अक्रीत**-वि. असंभवनीय; न करण्यासारखी (कृति). [ अ+कृ ]

**अक्रुसणें-अकसणें**—अक्रि. संकुचित होणें; आंखडणें; एकत्र होणें; घट्ट होणें. [ सं. आ+कृश् ]

**अक्रे**—अकरे पहा.

**अक्रोट(ड)**—पु. हें झाड हिमालयाच्या आसमंतात व चीन. उत्तर हिंदुस्थान, इराण इकडे होतें; याला ३०।४० वर्षांनीं फळ येतें; हें परूपवर्ग असून कच्च्या फळांचें लोणचें घालतात. याचें तेल खातात व जाळतात; फळ मधुर, पौष्टिक, पित्त, क्षय व रक्तदोषावर उपयोगी; याचें टरफल व पान स्तंभक; लांकूड सुरेख व मजबूत असल्यानें नक्षीकामास चांगलें. [ सं. अक्षोट-ड ]

**अक्रोध**—पु रागाचा अभाव, रागाचें दमन; यतिधर्मांपैकीं एक लक्षण ( योगधर्म पहा ). -वि. रागरहित. [ सं. अ+क्रोध ]

**अक्लिष्ट**—वि. गुंतागुंत नसलेलें; सोपें, सहज होण्याजोगें. ०**पणें** -क्रिवि अनायासें, त्रासाशिवाय; मोकळेपणानें [ सं अ+क्लिष्ट ]

**अक्लेश**—क्रिवि. त्रास न पडतां, श्रम, काळजी यांशिवाय. [ सं. अ+क्लेश ]

**अक्लेश-शी**—क्रिवि पूर्णपणें, सर्वथा, अगदी, जितका लाभ व्हावयाचा त्यांत कांहीं कमी न होतां; कांहीं बाकी न रहातां ( नाश होणें, संपणें, वागणें, नासणें, मरणें, जाणें इ० क्रियापदांबरोबर उपयोग करतात ). [ सं. अक्=जाणें+क्लेश, किंवा अलेश ]

**अक्वायर**—सक्रि १ सरकारी किंवा सार्वजनिक कामाकरितां कायद्याच्या सहाय्यानें ( जमीन वगैरे ) विकत घेणें २ संपादणें; कमाविणें. [ इं. ]

**ॲक्शन**—पु १ खटला; दावा २ कार्य, क्रिया; पार्ट; प्रत्यक्ष हालचाल; चळवळ. 'या पुढील आपल्या पहिल्या प्रवेशापासून ॲक्शनला सुरवात करावयाची.'- भा १५०.

**अक्शा**—न नाश. [ का. ]

**अक्शा (क्सा) बोक्शी-क्सी**-ओकसाबोकशी पहा.

**अक्शी**—( कुण. ) समूळ; सर्वांशीं; अगदीं; पूर्णपणें. 'अक्षि जिभ्या धरूनश्यानीं समद्या गांवांत धिंड काढीन' -बाय ३. २. [ सं. अ+क्षय ]

**ॲक्सिडेंट**—पु. अपघात. [ इं. ]

**अखई**—क्रिवि. अखंड; अक्षयीं. 'करी लागपाठ चित्तवित्त नको पाहो । अखई तो चुडा तुज भोगईल नाहो ॥ '-तुगा २८८. [ सं. अ+क्षय ]

**अखंगळ**—वि. (व.) खोडकर. [ सं. अ+खञ्ज ]

**अखजा-जी-ज्जी, अखीर्ता-ज**—स्त्री. वैशाख शुद्ध तृतीया. अक्षय्य तृतीया पहा. [ सं. अक्षय+तृतीया; प्रा. अक्खय+तइया; गु. अखात्रीज; हि. अखेतिज, अखतीज; काश्मि. अच्छित्रय ]

**अखटा**—वि. वाईट; तिरस्करणीय. 'जेथें अशा स्नेहाची जात, तेथें उभयतांतें द्वैत अखटा ' -होला ७२. १०५. [ सं. उच्छिष्ट; प्रा. ओखट; तुल. का. अक्कट=दु:खोद्गार ]

**अखटाई(य)**—स्त्री. (गो. ) १ लबाडीचा अभाव. २ (ल.) शहाणपण. [ सं. अ+शठ; म. अ+खट ]

**अखडणें**—आखडणें पहा.

**अखंड(डी)**—वि. १ संपूर्ण; सगळा; अत्रुटित. २ तुकडे नसलेला; एकसंधी; सलग; तुकडे जोडून न केलेला. —क्रिवि. सतत; अप्रतिबद्ध; न थांबतां, निरंतर. ' अखंड बोलो आवडे ।' —ज्ञा १५. ४४८. [ सं. अ+खंड ]. **०क्रम**—पु पत्त्याच्या बिझिक (पाट) च्या खेळांत हुकमाच्या एक्क्यापासून दहिल्यापर्यंतची एकसारखी रांग ( सीक्वेन्स ); याचे २५० मार्क असतात. —पाट १६. **०चोळी**—स्त्री. बाह्याविना सर्व सलग अवयवांची—लाग, पखे, ठुशा ( कोरा ) व पाठ—जोड नसलेली चोळी. **०दंड**—वि. एकसारखा चालणारा, असणारा. ' शत वर्षे अखंड दंड । पर्जन्य वितंड पैं वर्षे ॥ —एभा. ३.१६८. **०दंडायमान**—वि. अमर्याद; अनंत; घटका, पळें, दिवस, वर्षे इ० कालविभागविरहित **०द्वादशी**—स्त्री. मार्गशीर्ष शुद्ध द्वादशी. **०पद**—( ग ) बीजगणितांतील मूळ प्रकाशक नसलेलें अकरणी पद. **०श्रेढी**—स्त्री. ( ग ) गणितांतील एक श्रेढीप्रकार; यांतील पदें क्रमानें खंड न पडतां एकसारखीं असतात. **०सौभाग्य**—न. १ अव्याहत, एकसारखी, सतत भरभराट—ऐश्वर्य—कल्याण २ केव्हांहि वैधव्य प्राप्त न होणें, नवऱ्याच्या आधीं मरणें [ सं. ] **०सौभाग्यवती**—स्त्री. जिला सतत सौभाग्यसुख लाधलें किंवा लाधणार आहे अशी स्त्री; अविधवा. २ (ल.) वेश्या. **०स्वारी**—स्त्री. सर्व लवाजम्यासहित. ' अखंड स्वारी रायाची निघाली चौथीच्या अमलामधीं ' —प्रला. ३०९ **०ज्ञान**—न १ सतत ज्ञानमय स्थिति; स्थिर शुद्धि. २ संयोजीकरणानें होणारें ज्ञान खंडज्ञान पहा [ सं. ]

**अखंडनीय**—अखंड्य पहा

**अखंडाकार**—क्रिवि. ( कवि. ) अखंडितपणे अव्याहत रीतीनें. 'परमार्थ प्रपंचीं साचार। अखंडाकार चाले वेर।' [ सं अखंड+आकार ]

**अखंडित**—वि. १ अत्रुटित, अविभक्त, बिनतुकड्याचा २ (ल.) पुष्कळ; अपरंपार; अगाध; अतिशय; अमर्याद. २ अपराजित; खोडून न टाकलेला; खोटा न ठरलेला; रद्द न केलेला. —क्रिवि. अप्रतिबद्ध; निरंतर; सतत. [ सं. अ+खंडित ] **०आचार—धर्म पराक्रम—बुद्धि—लक्ष्मी—संपत्ति—ज्ञान** इ० ४ **०लक्ष्मी आलंकृत**—मोठमोठ्या सत्ताधीश, धनिक लोकांना लिहावयाचा जुन्या पत्रांतील आरंभींचा मायना. [ सं. अखंडित+लक्ष्मी+अलंकृत= अपार संपत्तीनें युक्त ]

**अखंडैकरस**—पु. पूर्णब्रह्म; परब्रह्म. [ सं. अखंड+एक+रस ]

**अखंड्य**—वि. खोडून काढण्यास अशक्य; प्रत्युत्तर देण्यास कठीण. [ सं. अ+खंड्य ]

**अ (आ) खण**—न. बैलांच्या पायाखालीं एकदां मळणी झालेलीं कणसें. आकन—मदन पहा. [ सं. आ=ईषत्+क्षुण्ण=किंचित मळलेलें ]

**अखणी, अखणें**— अंकणी, अंकणें पहा.

**अखत(ता)**—अक्षत—ता पहा

**अखत्यार**—अख्त्यार पहा.

**अखबार**—अख्बार पहा.

**अखम**—वि. पंगु; निर्बल; अशक्त; रोगी; दुबळा. ' दाते हो दान करा, जाते पंढरपुरा । न्या मज तेथवरी अखमाचा सोयरा ॥ ' —तुगा ३४९. [ सं. अ+क्षम ]

**अखय**—वि. नित्य; अक्षय; सदैव, अखंड; नाशरहित. ' दिलें अखय अभयदान गा । ' —तुगा. ३४३ [ सं. अ+क्षय ]

**अखयें**—वि. ( गो. ) विक्षिप्त.

**अखर—री**—पु. स्त्री. १ गांवाच्या कडेची किंवा सभोंवतालची जागा; यावरून गुरें एकत्र करण्याची किंवा विसांव्यास बसण्याची जागा; ' चुकलें गुरूं अखरास पहावें.' —क्रिवि. शेवट; शेवटीं; अखेरीस. अखेर पहा. [ अर. आखिर=शेवटचा; शेवट ] **०नखर, अखीर नखीर**—क्रिवि. अखेरीस, सरतेशेवटीं. ' अखरनखर मरायचाच ' [ अर. अखीरनखीर ]. **०पख**—(व.) भाद्रपद वद्य ( सर्वपित्री ) अमावास्या; पक्ष (श्राद्ध) करावयाचा शेवटचा दिवस [ अर. आखीर+सं. पक्ष ]

**अखर**—वि. अविनाशी; अक्षय. [ सं. अ+क्षर ]

**अखरकणें**—सक्रि. ओढून आणणें; ताब्यांत ठेवणें. ' मंत्रें देव प्रगटती। मंत्रें भुतें अखरकिती ॥ ' —दा. ९.८.३३. [ सं. आ+कृष् ]

**अखरा**—१ अखाडा; शस्त्रागार. —क्रिवि. ( व. ) अखेरीस; शेवटीं अखर पहा.

**अखरी**—स्त्री. १ गाडीचा आंस व साटी यामधलें लांकूड; बुटें [ सं. अक्ष; प्रा. अक्ख; आंख ]. २ धान्य संपणें; अखेरी पहा.

**अखरीत**—अक्रीत पहा.

**अखरें**—वि. खरें नव्हे तें; खोटें ( नाणें ). ' पारखिया अखरें पडे— ज्ञा १७.३९५. [ अ+खरें ]

**अखवानजी**—पु. पंतोजी; शिक्षक; अखुनजी; अखुंजी; ' आमच्या अखवानजीला व्याकरण येत होतें असें नाहीं. ' —अरु २.१०-११ [ फा. आखून = शिक्षक; हिं. आखुनजी. ]

**अखसा**—वि. अख्खा; सर्व. [सं. अ+क्षतः+सन् म. अख+सा]

**अखळ**—वि. अक्षर; शब्द; नांव. ' तुम्हीं अखळिचिया राजकुमरी । जाणतुसों तुमची थोरी । ' —शिशु. ६७९. [ सं. अक्षर ]

**अखा—खा—खें**—वि. १ अखंड; अविभक्त; धड; शाबूत; अत्रुटित; न दुखविलेलें. २ एकूण; सर्व; एकंदर ( संख्या, रास वगैरे ). [ सं. अ+क्षत; प्रा. अक्खय; गु. आख्खो, आखुं; सा. अख्ख ]

**अखाड**—पु. आषाढ महिना. [ सं. आषाढ ]

**अखाडा**—पु. ( मूळ अर्थ जुगार खेळण्याची जागा, त्यानंतर पुढील अर्थ). १ जमातः एखाद्या विशिष्ट कार्याकरितां किंवा अभ्यासाकरितां एकत्र जमणाऱ्या लोकांची राहण्याची किंवा जमण्याची जागा; विद्यालय; चर्चास्थल. २ तालीमखाना किंवा त्यांतील हौदा. 'देवेसीं कोलकाटी धरूं। अखाडा झोंबीलोंबी करूं ॥' —ज्ञा ११. ५४८. ३ रंगस्थल; सर्कस, क्लब किंवा त्यांची जागा; रिकामटेकडे लोक बसण्याची जागा; अड्डा; गप्पा वगैरे मारणारे कुटाळ लोक जमण्याची जागा. ४ संप्रदाय; गोसाव्यांचे पुढील १८ अखाडे किंवा मठ आहेतः अघोरी, अरण्य अवधूत, आनंद, आश्रम, इंद्र, उदासी, कानफाटया, कालवेला, गोदंड, गोरखपंथी अथवा गोरखनाथी, डवरा, नंगागिरि, निरंजनी, निर्वाणी, पुरी, भराडी, भारती, राऊळ, वन, सरभंगी, पर्वत, सागर, तीर्थ, सरस्वती. यांची संख्या व नांवें यांहून निरनिराळीं सांपडतात. ५ अड्डा; गाड्या वगैरे उभ्या राहण्याची जागा. ६ गुरें येऊं नयेत म्हणून तात्पुरतें उभें केलेलें कुंपण, फाटक. [सं. अक्षवाटक; प्रा. अक्खाडग—अक्खाडय=खेळण्याची जागा, —अक्खाड. म अखाडा ]

**अखाडा**—पु पालखीचा दांडा [ सं. अक्ष—आंस+आड ? ]

**अखाडी**—वि आषाढी. —स्त्री दुष्काळ; आखाडी पहा. [ सं. आषाढ ]

**अखात**—न. १ स्वाभाविक बनलेलें तळें, सरोवर. ' असती बहुत अखातहि त्यांमाजीं पूर्ण जीं जलें असलें । '— कुअक ७७. २ जमीनींत घुसलेला समुद्राचा भाग. [ सं. अ+खात=खणलेलें ]

**अखाद्य**—वि. खाण्यास अयोग्य; निषिद्ध; अभक्ष्य; अभोज्य ' अखाद्याचेनि भोजनें । '—ज्ञा १८ ८०६. [ सं. अ+खाद्य ]

**अखिल ( ळ )**—वि. १ सर्व; संपूर्ण. ' तूंचि अवघें अखिल जन । ' —एरुस्व १.२ २ अनंत; न संपणारें. ' माया पाहतां अभंग । अखिळ वाटे ॥ ' —दा ७.१.५८. —**लार्थ**—पु. मुख्य मुद्दाः सारांशः तात्पर्य. [ सं. अ+खिल = अवशिष्ट ]

**अखुंजी**—शिक्षक; अखवानजी पहा.

**अखुटणें**—आंखटणें पहा.

**अखुड**—वि. तोटकें; आकुंचन पावलेलें; लहान. अपुरें. [ सं. आकृष्ट; प्रा. आकड्ढ ]. ०**णें**—उक्रि. १ लहान होणें, करणें. ऱ्हस्व होणें; संकोच पावणें, खुरटणें; आक्रसणें; आंखडणें. अक्रि. २ थांबणें, ओढणें; हात धरणें. ३ ओढून धरणें (पाऊस). ०**शिंगी—शृंगी**—लहान शिंगाची. ' अखुड शिंगी बहुदुधी ' ( गाय ).

**अखुनजी**—अखवानजी पहा.

**अखूड**—अखुड पहा.

**अखें**—न. कैठाळी, पडशी, गोणी, पखाल, माकण, इ. कांची एक बाजू; तसेंच बैलांच्या पाठीवरील तूप, तेल इ. कांचा एका बाजूचा बुदला; अटकें. [ सं. अर्द्धक ]

**अखेतय, अखेती—ज**—अखजा पहा.

**अखेर**—स्त्री. १ शेवट; समाप्ति; अंत, परिणाम. —वि. शेवटील; शेवटचा—ला; पूर्ण झालेला; संपलेला; मृत. ' मशारनिल्हे अखेर झाले '. —क्रिवि शेवटीं; अंती शेवटास; सालअखेर. [ अर. आखिर्; फा ]. ०**आढावा**—पु साल अखेर येणें—देणें समजण्याकरितां मांडलेला जमाखर्च. ०**नौबत(द)**—स्त्री. चौघड्याच्या शेवटी जलद वाजविण्याची एक गतः ( ल ) शेवटचें यश. ०**साल**—न. १ वर्षाचा शेवट; मृगारंभः उन्हाळ्याचा शेवट व पावसाळ्याचा प्रारंभ म्हणजे ज्येष्ठ महिना ' शेवटीं अखेर साल जहालें ' —रा १९, ७६, —ख १२३१. —पया ६७ २ विशिष्ट वर्षचक्रांतील शेवटचे वर्ष ३ हिशेबाच्या वर्षाचा शेवट ०**चा हुकुमनामा**—पु. ज्या हुकुमावरून दाव्याचा निकाल होतो तो

**अखेरी**—स्त्री समाप्ति. अंत; शेवट ( कामाचा ). संपणें; खलास होणें; आटोपणें ( सामुग्री, धान्य ) [ अर. आखिर् ] ०**मारणें—साधणें—सांभाळणें**—१ प्रथम फारसा प्रयत्न न करतां शेवटी एकदम जोराचा प्रयत्न करून यश मिळविणें; शेवटचा तडाखा लगावणें. २ दशावतारी गंजिफांत शेवटचा हात मिळविणें किंवा डाव साधणें. —क्रिवि अखेरीस. ( कों. अखेरीक ). ०**चे दिवस**—शेतकामांत हंगामाचे शेवटचे दिवस, वैशाख महिन्याचा शेवटचा पंधरवडा. अखेरसाल पहा.

**अखोट**—अक्रोट पहा

**अखोट**—वि. खोड ( दोष ) नसलेलें; निर्दोष; शुद्ध; निर्मळ. [ अ+खोड ].

**अखोटा**—पु. १ ( एखाद्या काठीचे किंवा खुंटीचे भोंवतीं ) दोरी बांधण्याकरितां पाडलेली वाटोळी खांच. खोबण; कंगोरा. २ खराडी किंवा कणी ( पुली ) मधील वाटोळी खाच ३ पुढे आलेलें टोंक; घस. मुळका. ०**लागणें**—आंखटणें [ सं आ+खन्—खात ]

**अखोर**—वि ( खा. ) आणिक; अधिक [ सं. अधिकतर. अक्षुर ? ]

**अख्खा(ख्खें)**—अखा पहा.

**अख्तर**—पु. १ तारा. नक्षत्र २ दैव शकुन [ फा ]

**अख्त्यार**—पु १ सोंपविलेला अधिकार. दिलेला हक्क. मुखत्यारी; सत्ता. २ निवड. पसंती. —वि. अखत्यारी [अर. इख्तियार] ०**पत्र**—न. प्रतिनिधित्वाचा अधिकार देणारें पत्र —**री**—स्त्री १ अख्त्यार; अधिकार. सत्ता. २ पु. अधिकार दिलेला प्रतिनिधि; व्यवस्थापक, चालक; अधिकारी; मुखत्यार.

**अख्बार**—स्त्री. १ बातमी, वर्तमान; वार्ता २ वर्तमानपत्र. बातमीपत्र. ३ परराष्ट्राच्या दरबारी ठेवलेल्या आपल्या वकिलाकडून आलेलें बातमीपत्र. ' त्याणीं तिकडील अखबार आणिली आहे '

–रा १०. २७३. [अर. खबर अव.]. ०नवीस–पु. १ बातमीपत्र पाठविणारा. २ आपला खास बातमीदार. ३ मंत्री. [फा.]

**अख्येत**–अक्षत पहा. 'ते अख्येतीं व्हाटितां' –उषा ३४.

**अख्री**—(धान्य संपणें याअर्थी) अखरी पहा.

**अग**—उद्गा. १ लक्ष्य वेधण्यासाठीं काढलेला संबोधनार्थी उद्गार. २ स्त्रीस उद्देशून वापरावयाचें संबोधन. **म्ह.** –अग अग म्हशी मला कां नेशी! [सं. अग; का. अक]

**अग**–पु. पर्वत; वृक्ष. [सं. अ+गम्=जाणें]

**अगइ(ई)**—उद्गा. आश्चर्य, आनंद किंवा भय दाखविणारा उद्गार; अगबाई; अगाई; अगग. 'म्हणे अगइ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप गा!' –केका १०; 'त्यावरि न देखिले ते दाखविले म्यां कशास अगई! तें' –मोवन ५.८३. [अग+आई]

**अगग**—उद्गा. अगई पहा. [सं. अंगक=अकच्क अंग? –भाअ १८३४; म. अग+अग]

**अगगाई**—उद्गा. अगई पहा. [अगग+आई]

**अगजाळी**—आगजाळी पहा.

**अगट**—न. (बे.) कोडें. [सं. अघटित?]

**अगटचिगट**—वि. मंद; चेंगट; आळशी; दिरंगाई लावणारा. अकटचिकट पहा. [चिक्कट–चिगट द्वि.]

**अगटी**—आगटी पहा.

**अगड**—पु. १ आड; बांधीव विहीर. २ खंदक; खांच; लवण. 'कृष्ण समुद्राचिया अगडा–। माजीं दुर्गी वसतसे॥' –एरुस्व २.८. ३ तट. 'हा लोकालोक महागड। त्रैलोक्याशीं अगड। रचिला असे॥' –कथा ६.४ १०. ४ पशूंचे (विशेषतः हत्तींचे) खेळ खेळण्यासाठीं उंच तट असलेलें आवार. (असें आवार बडोदें येथें असून त्यांत पशूंचे खेळ होतात). ५ वि. (गो.) अगाध. [सं. आगर्त; प्रा. अगड=कूप, हौद; का. अगळ = खणणें, खंदक; अगडु = खेळ.]

**अगडत(द)(ध)(ब)गड**—न. १ क्षुल्लक वस्तु; अडगळ; सटरफटर. २ अमर्याद, शुष्क, निरर्थक बडबड; वांकडेंतिकडें बोलणें–करणें–वागणें, वगैरे. ३ शिळेंपाकें जाडेंभरडें अन्न; गरीबीचें खाणें; भिकार खाणें. –क्रिवि. कसेंतरी; वेडेंवांकडें; ओबडधोबडपणें. [विचित्र प्रयोग. सं. अ+घट्; म. घाट]. **अगडीं दगडीं जीव घालणें–पाडणें**–एखाद्यास अडचणींत घालणें. **अगडीं दगडीं पडणें**–अडचणींत सांपडणें.

**अगडधू–व**—वि. लठ्ठंभारती; लठ्ठनिरंजन; अगडबंब; हत्तीचें पिल्लूं; धिप्पाड (स्त्री, पुरुष). [सं. अवधूत?]

**अगडधूत**—पु. गोसावी; बैरागी; लठ्ठंभारती माणूस. 'देवापुढें नृत्य करीत। अगडधूत मिळवूनियां॥' [सं. अवधूत]

**अगडबंब**—वि. लठ्ठेश्वर; फार लठ्ठ; अवजड; धिप्पाड. [सं. अगदःच असौ बंबःच=निरोगी व लठ्ठ. –भाअ १८३४. किंवा अघट+का. बंबल = ढीग?]

**अगडा**—पु. गाडीचें जूं व दांडी यांनां बांधणारी दोरी; कसणी; धुरेकट. [सं. अग्रगता?]

**अगडु**–अगड पहा. 'तो जीतां अगडु देखीनिला। समुद्राचा॥' –शिशु ३१३.

**अगणनिगण**–आकणनिकण पहा.

**अगणनीय–अगणित**—वि. १ अमोज; अमाप; मोजतां येण्यास अशक्य; असंख्य. २ (ल.) क्षुल्लक. खिसगणतींत नसलेलें. [सं. अ+गण् = मोजणें]

**अगणित**—वि. (गो.) अतिरेक; अतिशयोक्ति. 'अगणितच करणें=अतिरेक–अतिशयोक्ति करणें.

**अगणेय–अगण्य**—अगणनीय पहा. अनादि जे 'अगण्य परमतत्त्व।' –ज्ञा ६.३२०.

**अगत**—न. अगत्य; काळजी; आस्था. –क्रिवि. (गो.) अगतून; अगत्यपूर्वक; खचित. 'त्येकां अगत यौंक सांग=त्याला अगत्य यायला सांग' [म. अगत्य अप.]

**अगतिक**—वि. १ निरुपाय; अनन्योपाय; निराधार; असहाय्य. २ कुंठितगति; मार्ग अडला गेला आहे असा; अवरोधित (कार्य, संस्था वगैरे). ३ गत्यंतर नाहीं असें; अवश्यक; अनिवार्य. 'प्राटेस्टंटांचा व इंग्लंड देशाचा द्वेष करणें अगतिक बनून राहिलें होतें.' –इंमू ३०७. **०गति**–स्त्री. १ संकटावस्थेंतून किंवा अनेक अडचणींतून पुढें जाणें; संकटांतून निभावून नेणें. २ संकटसमयींचा उपाय; अखेरचा उपाय; आणीबाणीच्या वेळची हिकमत. –पु. असहाय्याला मदत करणारा; अनाथनाथ; वाली; आसरा (देवता, परमेश्वर वगैरे). –वि. अनन्यगति. [सं]

**अगत्य**—न. १ आस्था; कळकळ; पोटाग; आदर. 'या सुभेदारास सर्वांपेक्षां शास्त्रीबोवाचें अगत्य फार आहे.' २ अत्यंत अवश्यकता; फार जरूरी; टाळतां न येण्यासारखी स्थिति. 'मला तंबाकूचें अगत्य नाहीं.' 'जें अगत्य होतें तैसें जालें.' –दावि ३५. –क्रिवि. निश्चयें करून; अवश्यमेव; खात्रीनें; कसेंहि करून. 'तो तिमाजीपंतास अगत्य जालें कीं'–भाद्रिसंवृ ५४. [सं. अगति]. **०पूर्वक**–क्रिवि. १ निश्चयानें; खात्रीनें; अवश्यमेव. २ बुद्धिपुरस्सर; मुद्दाम. **०रूप**—क्रिवि. मुद्दाम; बुद्धिपुरस्सर; अगत्यपूर्वक. 'सद्विद्या... विरक्त पुरुषें अभ्यासावी। अगत्यरूप॥' –दा २.८.३२. **०बुद्धि**–स्त्री. **०वाद**–पु. महत्त्व; जरूरी; काळजी; आवश्यकता वाटणें; भीड; मुर्वत. **०वादी**–वि. एखाद्या गोष्टीबद्दल विशेष तत्पर किंवा उत्सुक असलेला; अमुक जरूरीचे वाटणारा; त्याची तरफदारी करणारा. यांखेरीज अगत्यमेव, अगत्याचा, अगत्यानें, अगत्यास (निकरास) असे प्रयोग होतात. 'आतां अगत्यास आलें.' –यथादी १.२५७.

**अगद**—न. औषध. 'मद्वाक्य तुला न रुचे मरणारा अगदसें अगा! बापा!' –मोसभा ४.१३. –वि. निरोगी. [सं. अ+गद=रोग]

**अगदी**—वि. १ सर्व; एकूणएक; तमाम; पूर्ण; निःशेष; समूळ; अपवादरहित. 'घरांतील माणसें अगदीं मेलीं'; 'पाऊस अगदीं गेला;' 'तुम्हांस पोथी अगदीं दिली'. २ शेवटच्या पायरीवरचा; पहिल्या नंबरचा; पक्का; खरोखर; आत्यंतिक; पूर्ण. 'अगदीं, अंधळा–वेडा–मूर्ख'. ३ पराकाष्ठेचा; अतिशय. 'हें काम मला अगदीं नेहटलें, केलेंच पाहिजे'. –क्रिवि (नकारार्थी) मुळींच, कोठेंच किंवा कधींच. 'यांत गूळ अगदीं नाहीं'; 'असला पदार्थ अगदीं ब्रह्मांडांत नाहीं'; 'ही गोष्ट अगदीं होत नाहीं.' [सं. अगति ?]

**अगन**—पु. (कुण.) अग्नि; विस्तव. [सं. अग्नि अप.]

**अगननगन, अगाननगान, अगानीनगानी**—क्रिवि. चुकून, चुकीनें; अन्यायानें; विनाकारण. [फा. ना गहानी=अवेळीं, अस्थानीं–द्वि.]

**अगनबंद**—पु. भिलावा; बिब्बा. –अश्वप२३५. [सं. अग्नि+बंध]

**अगप**—वि. आगप; हळवें; लवकर तयार होणारें (पीक); मागप याच्या उलट. [सं. अग्र+पत्]

**अगबाई**—उद्गा. (बायकी) भीति, आनंद, आश्चर्य इत्यादि विकार दाखविणारा उद्गार. 'अगबाई! कसायाचाच बाजार किंग सारा!' –पृच. [अग+बाई]

**अगम**—पु. १ वृक्ष; झाड. 'झालों कृतकृत्य तवीं बहु शक्ति न पारिजातकीं अगमीं।' –मोसभा १. ३६. [सं. अ+गम्=जाणें]. २ वि. गुप्त; जाणतां न येणारें. 'आदीं तेआचा जल्मु कवणें जाणितला। कि होता अगमु'– (खिपु १.१६३) [सं अगम्य]

**अगमनीय**—अगम्य पहा.

**अगम्य**—वि. १ न जातां येण्यासारखें; दुर्गम; प्रवेश होणार नाहीं असें. २ जेथें जाऊं नये असें; गमनास अयोग्य; (ल.) क्षेत्रें, पवित्र शास्त्रें; (संभोगास अयोग्य) नात्याच्या पायऱ्या. ३ बुद्धीला आकलन करतां येणार नाहीं असें; अतींद्रिय; अतर्क्य. 'अगम्य तेज हृदयींच्या पदका।' –एभा ११.१४८१. ४ जेथें पोंचतां येणार नाहीं असें; अप्राप्य; असाध्य; अशक्य; जें करतां येणार नाहीं असें. उ० इंद्रियागम्य, दृष्ट्यागम्य, बुद्ध्यागम्य, इ०. **०पण**–न समजण्यासारखी स्थिति; अज्ञेयता. 'बैसलीं सहजासनीं। अगम्यपणीं अगोचरु॥' –एभा १.२२. [सं. अ+गम्]

**अगम्या**—स्त्री. विवाहास अयोग्य; जवळच्या नात्याची, सकुल, सगोत्र, भिन्नवर्णीय, किंवा आपणाहून वडील अशी स्त्री. [सं. अ+गम्]. **०गमन**–न. शास्त्रानें संभोगास अयोग्य मानलेल्या –अगम्या स्त्रीशीं संभोग; व्यभिचार.

**अगर**—आगर पहा.

**अगर–रु**—पु. न. आसाम–भूतानकडील एक मोठें व सदोदित हिरवें झाड. पानें अडुळशासारखीं, लांकूड नरम सच्छिद्र व राळेसारख्या पदार्थानें भरलेलें; या लांकडाच्या माळा करण्याची पूर्वी चाल होती; हा पदार्थ झाडास चोंचे मारून काढतात; लांकडाचे तुकडे पाण्यांत कुजवितात तेव्हां त्यास सुगंध येतो; झाड २० वर्षांचें झाल्यावर त्यापासून ऊद (अगरु) काढतात; याचे कृष्णागरु काष्ठागरु, दाहगरु, स्वादगरु व मांगल्यागरु असे पांच प्रकार आहेत; हा पित्तनाशक, पौष्टिक व केशवर्धक आहे. 'कर्पूर चंदन अगरु ऐसेया सुगंधाचा महामेरु।' –ज्ञा ९.३९१. २ चंदन. [सं. अगरु; हिं. बं. गु. का. ता. अगर; अर. उदगरकी]. **०चंदन**–सुगंधी धूप; अगरबत्ती किंवा ऊदबत्ती, उटी–वगु.

**अगर–चे**—उअ. अथवा; किंवा; जर; जरीः यद्यपि; जेव्हां. 'हे मुलकाची आब–हवा आम्हास रास्त नाहींः अगर हुकूम होईल तर विलायतेस येऊं.'– पदमव १०९. [फा. अगर, अगर्चेह]

**अगरगंड**—वि. (व.) हट्टीः निष्काळजी; बेफिकीरः आळशी; बेगुमान; सुस्त. 'सून मोठी अगरगंड मिळाली.' [सं. अग्र+गंड= वीर ? का. गंडु=बलशाली, नवरा]

**अगरडा–अगारडा–आगरडा**—पु. शिखर; टोंक; शेवट; अग्र; शेंडा. 'दिवसें दिवस गर्भ वाढे। फुटती हातपायांचे आगरडे।' –स्वानुदिन २. ३. ४. [सं. अग्र+ट (ड)]

**अगरताळ–ळा–ळी–ळ्या**—अकरताळ पहा.

**अगरबत्ती**—स्त्री. कापूर, ऊद वगैरे सुगंधी द्रव्यें घालून तयार केलेली उदबत्ती; धूपकाडी. [सं. अगरु+वर्ति=वात]

**अगरवादी**—पु. फिर्यादी; वादी. [सं. अग्रवादी]

**अगरसाळ**—स्त्री. (गो.) देवालयाजवळ बांधलेली धर्मशाळा; देवळासभोंवार मुख्यतः उत्सव प्रसंगींच्या जेवणावळीसाठीं बांधलेली इमारत. 'अगरसाळेंत लोक जेंवूक लागले.' [सं. अग्र+शाला]

**अगरी**—आगरी पहा.

**अगरी**—स्त्री. डिरी; कोंब; मोड. **०फुटणें–येणें.** [सं. अग्र]

**अगरू**—अगर (झाड) पहा.

**अगरूं**—न. १ गुदद्वारांतून बाहेर आलेलें अंग, आंतडें; हगरूं २ (गुजराथी) अन्ननलिकेस रोग झाल्यामुळें जिभेवर आलेले खरे. [सं. अग्नि किंवा अंग+रुह्=वाढणें]

**अगर्ह्य**—वि. अनिंद्य, निंदा करण्यास अयोग्य. [सं. अ+गर्ह्]

**अगल–ला–ली–ल्या**—वि. १ पुढचा; पुढील; अग्रभागीं असलेला; श्रेष्ठ; प्रमुख; पहिला. 'अगला पडला तर मागला हुशार'. २ नांगराच्या एकापेक्षां अधिक बैलांच्या जोडींतील पुढील (जोडी); ती हांकणारा (मुलगा); सदर जोडी हांकण्यासाठीं असलेली बैठक. ३ [कुण.] बाप. [सं. अग्र+ल; प्रा. अग्गलौ; गु. आगलुं, आगळ; सिं. आगरो; व. अगेल; हिं. आगला; बं. उ. आगलि; जि. अग्ले] **०मागला**–पुढील व मागील. आगल पहा

**अगल्याबगल्या**—वि. आश्रित; पदरीं किंवा एखाद्यावर अवलंबून असलेला; बगलबच्चा; कनिष्ठप्रतीचा. [ बगल द्वि. ]

**अगवड** स्त्री. ( गु. ) अडचण; गैरसोय [ सं. अव+घट्; म. अवघड ]

**अगवळ–अगूळ**—पु. स्त्री. न. वेणी घातल्यानंतर केसांचीं जीं टोंकें शेवटीं राहतात तीं मोकळीं राहून वेणी सुटूं नये म्हणून शेवटास, लोंकर, सोंपट वगैरे दोरा लावतात तो; अंगवळ. [सं. अग्र+वलय]

**अगवाडा**—पु. ( हि. ) घराच्या पुढला भाग; अघाडी. [ सं. अग्र+वाट ]

**अगस–णें**—आगम–णें पहा.

**अगसाळी**–अकसाळी पहा.

**अगस्ता–स्त्या**—पु. हदगा; ( व. ) हेटा फुलें व शेंगा यांची भाजी होते; फुलांवरून तांबडा व पांढरा असे दोन प्रकार; आंवळीच्या पानांसारखी पानें; हा शीतळ, वातुळ, व त्रिदोषनाशक आहे. [ सं. अगस्त्य. हि. अगथिया–हाथिया; ता. अगीति; लॅ. इं. एगाटी ]

**अगस्ताळ**—अकरताळ पहा.

**अगस्ति**—पु. १ एक ऋषि. २ एक दक्षिणेकडील तारा (कॅनोपस). ३ एक वृक्ष. अगस्ता पहा. ४ (ल.) खादाड माणूस (अगस्तीनें समुद्र प्राशन केल्यावरून ). [ सं. ]

**अंगळ**—पु. स्त्री. दाराला लावण्याचा अडसर; निर्बंध; कडी; सांखळी; अडणा. [ सं. अर्गला, प्रा. अग्गल; गु. अगळी, आगळो; हिं. अग्गल. आगल; का. अगळी; पं अग्गळ; बं. अगड; सिंह. अगुल ] ०**घालणें**–अडविणें. ०**पडणें**–प्रतिबंध होणें.

**अगळ**—स्त्री. गोट्या खेळण्याकरितां केलेली खळगी; गल; बदा; विटी कोलण्याची गली. [का अगळु=खड्डा. खांच ]. ०**गोटी–डाव**–स्त्री. ज्या गोट्यांच्या डावांत बदे असतात तो; कोंडडाव याच्यापासून निराळा.

**अगळ**—न. ( गो. ) १ कोकंबाचा रस ' आज भिंडा–अगळाची कडी करची '. २ ( ल. ) लालभडक पातळ पदार्थ. ' रोस सामकों अगळ कसों जाला ! '

**अगळ**—आगवळ पहा.

**अगळा**—आगळा पहा.

**अगळावणें**—सक्रि. ( गो. ) ( कोकंबाचीं सोलें ज्यास्त आंबट होण्यासाठीं त्यांनां ) कोकंबाच्या रसाचीं पुटें देणें. अगळ पहा.

**अगळीक–त**—आगळीक पहा.

**अगा**—उद्गा. १ पुल्लिंगी संबोधन. हें नामाच्या पूर्वी लावितात किंवा ' अ ' गाळून पुढें जोडतात. अरे !. अहो !; ' राज्ञी म्हणे तरि अगा ! जा, पूस सभेंत तूं असें आर्या। ' –मोसभा ४.९५ २ ' अगे ' याचें अव. ३ ( गों. ) अगे, अगो. अग पहा.

**अगा–(इ)(ही)**—स्त्री. १ अंदाज; धोरण; अनुसंधान; आशा; अगाऊ कल्पना. ' वाघ पाठीवर येईल ही अगा नव्हती '.–ख ६६३५. ' या महिन्यांत पाऊस पडेल याची मला अगा नव्हती '. २ शुद्धि; स्मृति. ' मी चकलों खरा, मला त्या वेळेस अगा राहिली नाहीं. ' ( या शब्दाचा गतकालीन गोष्टींशीं संबंध असून पुढें नास्तिरूप येतें.) [फा. आगाह्=जाणीव असलेला ]. ०**अगा घेणें**–एखाद्या गोष्टीची व्यवस्था, किंवा जबाबदारी अंगावर घेणें; पुढाकार घेणें. ०**अगा बांधणें**–पुढील अंदाज, तजवीज, तदतूद करणें.

**अगाइ(ई)**—अगई पहा. ' अगाई ! हा बाई ! त्वरित वरि जाईल पळुनी। '. –नल ९१.

**अगाऊ**—वि. आधींचा; अगोदरचा. –क्रिवि. आधीं; प्रथम; पहिल्यानें; पूर्वी; अगोदर. [ सं. अग्र; हि. अगाव; सिं. अग्याउं. ]

**अ(अं)गाकडा**—पु. पानगा; गेंट; गेडगा. [ सं. अंगार+कट ? ]

**अगाजणें**—अक्रि. १ गाजावाजा होणें; चोहोंकडे प्रसिद्ध होणें; टिमकी वाजणें. २ कीर्ति, लौकिक होणें, प्रसिद्धी होणें. 'हे भीमकी ही नवरी अगाजे। ' –रुह २.६०. [ सं. आ+गर्ज; फा. आगाजाह् ]

**अगाजा**—पु. १ ओरड; गलबला; गोंगाट; कल्ला. २ गाजावाजा; बोभाटा; गवगवा. 'त्या गोष्टीचा अगाजा झाला. ३ कीर्ति; लौकिक; नांव. ' कौरवेंद्र दुर्योधन राजा। ज्याचा महिवरि थोर अगाजा ॥ –वत्स. ०**चा**–प्रसिद्ध; विश्रुत; लौकिकवान्. [ सं. आ+गर्जना; फा. आगाजाह् ]

**अगा(गां)त**—न. १ लवकर पिकणारें, हळवें, हंगामाच्या आधींचें पीक–धान्य. मागातच्या उलट. २ वि. अगोदरचें ( हंगामा ) पूर्वीचें–पेरलेलें, पिकलेलें. [ सं. अग्र+जात ]

**अगांतु(तू)क**—आगंतुक पहा.

**अगाध**—वि. १ अमर्याद; गंभीर; खोल, गहन; ज्याचा अंत लागत नाहीं असें ( पाणी, ज्ञान, संपत्ति इ० ); गूढ. ' ऐसें जें अगाध। जेथ वेडावती वेद ' –ज्ञा १.७३. २ अगम्य; अतर्क्य. ३ कठीण; असंभाव्य; अशक्य. ' त्याच्याहि पारिपत्यास अगाध आहे असें नाहीं. ' –शारो ३३; –पया १३८. [ सं. अ + गाध=खोल; ग्री. अगथॉस; गॉ. गॉथ्स ]. –न. समुद्र; गंभीर सागर; खोल पाणी. ' अगाधें हीं उचंबळती। ते चंद्रींचि ना शक्ती।'–अमृ १०.५. ०**पण** गूढपणा; ( ल ) महत्त्व. ' तें अगाधपण जाईल। मग हिणावो अंगा येईल। ' –ज्ञा २.२१७.

**अगाननगान**—अगननगन पहा.

**अगाप**—अगप पहा.

**अगापिछा–च्छा**—पु. १ पुढील व मागील भाग; दर्शनी बाजू व मागील बाजू; अघाडी व पिछाडी. २ जवळचें आप्तसंबंधी;

नातेवाईक ( आई, बाप, मुलें इ० ). [सं. अग्र+(पि) पुच्छ=शेंपूट]. ०पहाणें-सर्व बाजूंनीं विचार करणें; मागचा पुढचा विचार करणें; युक्तायुक्त पाहणें.

**अगाब**—वि. मजबूत; श्रेष्ठ. [ तु. आघा=श्रेष्ठ; अर. अघलब ]

**अगाबानी**—स्त्रि. अंगरख्याची मलमल, कापड; याचे अंग पांढरें व विणकरींत किंवा कशिद्यांत बुटी असते. [ तु. आघा + श्रेष्ठ + सं. वर्ण=वाण ]

**अगार**—न. घर; स्थान; मंदिर ( समासामध्यें ) क्रीडागार ( खेळण्याची जागा ), धनागार, धान्यागार, भांडागार, देवागार, शयनागार, शस्त्रागार इ०. ' कां श्रमलासि स्वकरें अग्नि कसा लाविसी अगारा या । ' –मोसभा ४.१२. [ सं. ]

**अगार**—स्त्री. ( बे. ) ग्रीष्मर्तूत वळिवाचे पाऊस पडल्यानंतर तळ्याविहिरींतील पाणी आटण्याची क्रिया.

**अगारडा**—अगरडा पहा

**अगारणें**—सक्रि. वाढणें; ओगरणें. [ सं. उद्+गॄ ]

**अगारी**—स्त्री. १ कोंब; डिरी. [ सं. अग्र ]. ०फुटणें०येणें

**अगारी**–( व. ) तूप वाढावयाचें भांडें. [ सं उद्+गॄ ]

**अगाव**—अगाऊ पहा. [ हि. ]

**अगावित**—क्रिवि. (गो.) अभावित, एकाएकीं. [ सं. अभाविन् ]

**अगाशी-सी**—स्त्री. १ खुली असलेली गच्ची; अटाली. ' दुसऱ्या मजल्यावर टोंकावर । अगाशी गच्ची चौफेर ॥ ' –गापो ३६. २ पडवी; सोपा. [ सं. आकाशिका; तु०—का. अगशी=वेस. हिं. ]

**अगास**—न. (कुण.) आकाश. ' घार फिरती अगासी । तिचें चित्त पिल्लापासीं ॥ ' [ सं. आकाश ]. ०दिवा–पु. आकाशदिवा.

**अगिटी**—आगटी पहा. 'क्रोध लोभाची धुपे अगिटी।'–एभा १८.२९६.

**अगिद्वणा**—पु. एक प्रकारचा दवणा–वनस्पति. [ सं. अग्निदमन ]

**अगि(गी)न**—पु. (कुण.) आग; ( वि.प्र. काव्यांत ). [ सं. अग्नि]. ०गाडा–पु., ०गाडी–स्त्री. आगगाडी. ' टोपीवाल्यांचा मूलख । आगीन गाडीला कूलूप। ' ०बंद–वि. न जळणारें; अग्नीनें नाश न पावणारें; अदाह्य. ' अगिनबंद रशीम '.

**अगियाळें**—आगियाळें पहा.

**अगी**—स्त्री. ( कुण. ) आग; [ सं. अग्नि ]

**अगीडगा**—पु. ( बे. ) भाताचा एक प्रकार. याला पाणी फार लागत नाहीं; या भाताचा रंग तांबडा असतो.

**अगीदुगी**—आगीदुगी पहा.

**अगुण**—वि. १ निर्गुण; सगुण याच्या उलट. ' सर्वे तुकया मेला । त्याणें अगुणा आणिला ॥ ' –तुगा २१६. २ गुणरहित; थोडे किंवा मुळींच गुण नसलेला; अवगुणी. ' कृष्ण अगुणाचा अरूप । कन्या सगुण आणि स्वरूप ॥ ' –एरुस्व १.९६. [ सं. अ+गुण ]

**अगुणी-अगुण्या**—गुणरहित. अगुण पहा.

**अगुदर**—(कुण.) अगोदर पहा ' भिळ० –मरनाच्या अगुदर हिला सावरूनश्यानी धरावी '. –बाय २.२.

**अगू, अगेरू**—अगरू पहा.

**अगूळ**—अगवळ पहा.

**अगे**—उद्गा सामान्यतः स्त्रियांना संबोधून बोलतांना किंवा हांक मारतांना योजावयाचें संबोधन. अग पहा रह.—( १ ) अगे मुने महापाप, सासुबाई तुमनेच माप; ( २ ) अगे माझे बाइले, सर्व तुला वाहिलें. [ अग; कों. आगे ]

**अगेरी**—स्त्री. १ पारशांची अग्निशाळा; देऊळ. अग्यारी. २ शूद्रांमध्यें श्राद्धाच्या दिवशीं अग्नींत तुपाची आहुति देतात ती. ०घालणें-करणें. [ सं. अग्नि+अगार ]

**अगेल**—वि. ( व. ) पहिला. अगल पहा. ' या डावांत मी अगेल, तूं दुगेल. '

**अगो**—उद्गा.(कों.) अग; अगे पहा. 'सदाशिवः–अगो, समजलीस कां? '–कफा. १. स्त्री. ( व्यक्तिवाचक ) स्वतःची बायको; गो असाहि प्रचार आहे. [ तु०–बं. अगो ]

**अगोचर**—वि. १ ज्ञानेंद्रियांना न जाणतां येणारा, न भासणारा;अज्ञात; अगम्य. ' ध्यानासिही जें नागवें । तें अगोचर फावें ॥' –ज्ञा १५.१६. २ चमत्कारिक, नवीन, पूर्वी ऐकण्यांत न आलेला. [ सं अ+गोचर ]

**अगोचर**—वि. १ अडदांड; अविचारी; अघोचर, वात्य; खट्याळ. ' काय मेलीं अगोचर पोरं हीं ! ' –सुशिलेचा देव २७; ' धाकटी नार निघाली अगोचर ' –ममाप १.१.२ २ अफाट; अवघड. ' नाहीं कवणाचे कटाव दखनेला पडले अगोचर –ऐतिपो ३८७. [ सं अघोर + चर ]

**अगोचरी**—स्त्री. योगशास्त्रांतील चौथी मुद्रा. या मुद्रेंत दृष्टि आकाशाकडे असते. ' अगोचरी मुद्रा यांची जानकी । ' –सप्र ८. १३.८०. [ सं. अ+गोचर ]

**अगोट-ठ**—स्त्री. १ शेतीच्या हंगामाची सुरुवात, पावसाळ्याचा आरंभकाल; मृगारंभ; ( ल. ) चातुर्मास; सबंध पावसाळा. [ सं. अग्रवृष्टि–अगोटी–अगोट ]. ०साधणें-दाखविणें–(मा.) मारणें ' कुत्र्याला अगोट दाखीव. '

**अगोतली**—आगोतली पहा.

**अगोद( ध )र**—क्रिवि. विवक्षित क्रियेच्या किंवा कालापूर्वी; आधी; पहिल्यांदा. ०**चा,-रील**-वि. पूर्वीचा; पहिला; प्रथमचा; मागचा. [सं. अग्रतर किंवा आदौकर–आदोगार–अगोदर; सि. अगभरो]

**अगोस्ती**—स्त्री. (विप्र.) अंगुस्ती पहा. (अंगावरील) शहारे; कांटा. ०**येणें-वाटणें**-'तिच्या ( घोडीच्या ) अगास अगोस्ती येऊन ती अंग झाडते.' –अश्वप १५७. [सं. अंग+उत्+स्था]

**अग्गड**—अगड पहा.

**अग्गत(द)**—(गो.) अगत्य पहा. ठाम. मुद्दाम. 'हो कागद तेणि माका अग्गत दिलोसा.'

**अग्न**—पु. स्त्री. अग्नि; आग; विस्तव. 'अग्न गृहासी लागला। आणि सावकाश निजला॥' –दा ११.३ ७; 'बाच्छायजादी क्रोधा आली। जैशी अग्न परजळली।' –ऐपो १०. [सं. अग्नि]

**अग्नि**—पु. १ विस्तव; आग; अनल. २ पंचमहाभूतांतील एक देवता. ३ जठराग्नि; (ल.) भूक. ४ आग्नेयी दिशा व तिचा अधिपति. ५ यज्ञीय देवता; गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नि असे तीन त्रेताग्नि व सभ्य आणि आवसथ्य मिळून पंचाग्नि. ६ तीन संख्येचा वाचक. ७ चित्रकादि जठराग्नि प्रदीप्त करणाऱ्या वनस्पती. [सं.]. ०**घेणें**–दारूगोळ्याचा मार सहन करणें. ०**देणें**–प्रेत जाळणें; उत्तरक्रिया करणें. ०**चा पाऊस पडणें**–अग्निवर्षाव होणें; एकदम अनेक संकटें-जुलूम कोसळणें, गुदरणें. ०**आराधना**–शत्रूंचीं गांवखेडीं, शेतें-भातें जाळणें. –ख २०९९. ०**कण**–पु विस्तवाची ठिणगी; स्फुल्लिंग. फुणगी. ०**कमळ**–न. योगशास्त्रांतील एक संज्ञा. भुवयांच्यामध्यें अग्निनामक कमळ आहे तें विद्युद्रूप असून त्याला दोन पाकळ्या आहेत तेथें 'ह' 'क्षं' हीं बीजचिन्हें आहेत. –विउ १.५३. ०**कार्य**–न. उपनयनानंतर बटूनें ब्रह्मचारी धर्माप्रमाणें करावयाचा होम, अग्नि–उपासना ०**काष्ठ**–न. निखारा. पेटलेलें लांकूड; विस्तव. ०**काष्ठ भक्षणें**–१ अग्निप्रवेश करणें; अग्नींत उडी टाकून मरणें. 'अर्जुन म्हणे हेचि शपथ। जरी मोडोनि पडेल मत। तरी मी अग्निकाष्ठें भक्षीन सत्य।' –ह ३२ १६९. २ सती जाणें. 'आपला पति मृत झाल्याची खबर कानीं पडतांच तिनें अग्निकाष्ठें भक्षण करण्याचा निश्चय केला'. ०**काष्ठ ॲसिड**–( पायरोलिग्निअस ॲसिड ) हें लांकडांतून कच्च्या स्वरूपांत निघतें. –सेंपू २.४२. ०**कुंड**–न. होमाच्या वेळीं अग्नि ठेवण्याकरितां केलेला खड्डा, पात्र; वेदी. ०**कुमार**–पु. अजीर्ण, कॉलरा, वातजन्य रोग यांवरील पारा, गंधक, बचनाग टांकणखार वगैरेंचें केलेलें औषध, रसायन. –योर १.५०२. ०**क्रीडा**–स्त्री. दारुकाम; आतषबाजी; दारूगोळ्याचा भडिमार; फटाके, दारू उडविणें. ०**खांब**–पु. तप्तलोहस्तंभ; शिक्षेचा एक प्राचीन प्रकार; नरकयातनांपैकीं एक; यम लोकींची एक शिक्षा. 'तप्तभूमीवरी चालविती। अग्निखांबासहि कवळविती॥'. ०**चक्र**–न. १ षट्चक्रांपैकीं एक; अग्निकमळ पहा. –एभा १२.३३५. २ शकुन, फलज्योतिष यांतील एक संज्ञा; शांतिकर्मासाठीं अग्नि कोठें आहे हें पहावयाचें चक्र. शुक्र प्रतिपदेपासून चालू तिथीपर्यंत मोजून त्या संख्येंत एक मिळवावा व रविवारापासून चालू वारापर्यंतची संख्या मिळवावी व त्या संख्येस ४ नीं भागावें. बाकी शून्य किंवा तीन उरल्यास अग्नि पृथ्वीवर असून शुभ होय; २ उरल्यास अग्नि पाताळीं व १ उरल्यास अग्नि स्वर्गलोकीं होय; हे दोन्ही अग्नि शांतिकर्मास अशुभ होत –धसिं २८४. [सं.]. ०**ज खडक**–पृथ्वीच्या पोटांतील अग्नीनें आंतील पदार्थांचा रस होऊन त्यापासून बनणारा खडक; लाव्हा. –भू ७८. ०**ज्वाला**–स्त्री. अग्निशिखा; ज्योत; जाळ. ०**तीर्थ**–न. तीर्थ पहा. ०**दिव्य**–न. दिव्य पहा. ०**नाश**–पु. श्रौत स्मार्त अग्नि विझून जाणें; अग्निहोत्रांतील अग्नि नष्ट होणें; ( याबद्दल प्रायश्चित्त घ्यावें लागतें ). ०**नौका**–स्त्री. आगबोट; वाफर; स्टीमर. ०**पंचक**–न. फलज्योतिषांतील एक योग; हा घातक असून त्यांत अग्नीपासून भय असतें. यासारखेंच चौरपं०, मृत्युपं०, राजपं० वगैरे योग आहेत. शुक्र प्रतिपदेपासून चालू तिथीपर्यंत मोजून त्यामध्यें चालू लग्न मिळवून त्या संख्येस नवानीं भागून बाकी दोन राहिल्यास तें अग्निपंचक होय. हें सर्व गृहकर्मास वर्ज्य मानितात. –मुमा. [सं.]. ०**परीक्षा**–स्त्री. अग्निदिव्य पहा. ०**पात्र**–न. (शिंपी.) इस्त्री यंत्र; कपडा कडकडीत करण्याचें यंत्र; इस्तरी पहा. ०**पुट**–न रसायन, औषधें, मात्रा वगैरे करण्यास त्यांना अग्नीची आंच देऊन जो संस्कार करितात तें. ०**प्रद**–वि. पाचक; अग्निवर्धक; अग्निदीपक. ०**प्रवेश**–पु. १ स्वतःस जाळून घेणें. २ सती जाणें; अग्निकाष्ठ भक्षणें पहा. 'पुत्रवंत्या स्त्रिया विशेष। तिहिं न करावा अग्निप्रवेश॥' ०**बाण**–पु, दारूनें वर उडवावयाचा बाण; दारूचा बाण; अग्न्यस्त्र. ०**मणी**–पु. एक काल्पनिक रत्न; सूर्यमणि; रविकांत. सूर्यकांत मणी पहा. ०**मांद्य**–न. अपचनाचा रोग; जठराग्नि प्रदीप्त नसणें; भूक न लागणें. ०**मापक**–पु. न. अत्युष्णतामान मोजण्याचें यंत्र; पायरॉमीटर. ०**मुख**–न. १ हिंग एक भाग, वेखंड २ भाग, पिंपळी ३ भाग, सुंठ ४ भाग, ओवा ५ भाग, हिरडेदळ ६ भाग, चित्रकमूळ ७ भाग व कोष्ठ ८ भाग यांचें चूर्ण. हें अग्निमांद्यावर देतात. –योर १.४९३. २ देव. ३ ब्राह्मण. ०**यंत्र**–न. १ बंदूक; तोफ. 'यांच्या अग्नियंत्रशौंडत्वाची तारीफ व्हायला वेळेनुसार चुकायची नाहीं.' –नि ८०८. २ दारूकाम; आतषबाजी. 'भरूनी रजतमाचें औषध। करूनी अग्नियंत्र सन्नद्ध। कृष्णापुढें अतिविनोद। एक प्रबुद्ध दाविती॥'–एरुस्व १५.११७. ०**रथ**–पु. आगगाडी. ०**रोहिणी**–स्त्री. काळपुळी पहा. ०**वर्ण**–वि. अग्नीसाररखा तांबडा लाल (रंग); रक्तकांति. ०**वर्धक**–वि. पाचक. ०**वर्धन**–न. पचन; जठराग्नीचें

उद्दीपन. ०**विच्छेद**–पु. अग्निनाश; पत्नी मृत झाली असतां अथवा इतर कारणांनीं अग्निहोत्र बंद पडणें. (याबद्दल प्रायश्चित्त सांगितलें आहे ). ०**वृद्धि**–स्त्री. अग्निवर्धन; पचनशक्तीची वाढ; जठराग्नि प्रदीप्त होणें; आहाराचें प्रमाण वाढविणें. ०**शस्त्र**–न. बंदूक, तोफ वगैरे दारूनें उडणारें हत्यार. ०**शाला**–स्त्री. अग्न्यागार; अग्निगृह; अग्नि ठेवण्याची जागा; यज्ञशाळा; होमशाळा. ०**शिखा**–स्त्री अग्नीची ज्वाळा; अग्निज्वाळा. ०**ष्टुत्**–पु (खि) 'एंबर डेज'या इंग्रजी शब्दाचा पर्याय; राखेचे दिवस; ज्यांची दीक्षा होणार आहे त्यांच्यासाठीं प्रार्थना करण्याचे दिवस. 'उपोषणमंडळाशिवाय या चर्चच्या प्रार्थनासंग्रहांत अग्निष्टुत्, अनुनय व कित्येक विशिष्ट दिवसांच्या पूर्वी करावयाचीं प्रदोषोपोषणें...सांगितलीं आहेत'. –ना वा. टिळक. उ. मं. ३. [सं. अग्नि+स्तु ]. ०**ष्टोम**–पु सप्तसोमसंस्थां ( यज्ञा ) पैकीं एक; सोमयाग; यज्ञ. ०**ष्वात्त**–पु अव. पितृदेवता, ज्यांस मंत्राग्नि मिळालेला आहे असे; ज्यांनीं जिवंतपणीं अग्निहोत्र पाळलें नाहीं असे; मरीचीपुत्रांपैकीं पितर. जिवंतपणीं श्रौताग्नि ज्यांनीं ठेवला नाहीं ( अग्निष्टोमादि याग केले नाहींत ) असे पितर ( सायण ). ०**सेवा**–स्त्री. अग्नीची उपासना, पूजा. ०**स्थान**–न. अग्निकमळ-चक्र पहा. 'आकळलेनी योगें । मध्यमा मध्यमार्गे । अग्निस्थानौनि निगे। ब्रह्मरंध्रा ॥' –ज्ञा ८.९४. ०**होत्र**–न. १ श्रौताग्नीची उपासना; सकाळसायंकाळ अग्नीला होम देऊन अग्नि सतत राखण्याचें व्रत. २ ( थट्टेनें ) धूम्रपान; विडी ओढणें. ०**होत्री**–पु. अग्निहोत्र पाळणारा; ( थट्टा ) तंबाकू ओढण्याचें व्यसन असणारा. ०**स्नान**–न. ( व. ) एक तांब्याभर पाण्यांत स्नान करणें.

**अग्न्यायतन**—न. अग्निकुंड. [ सं. अग्नि+आयतन ]

**अग्न्युत्पात**—पु. १ वणवा; आगधाड; अगीचा डोंब. २ उल्का [ सं. अग्नि+उत्पात ]

**अग्या**—वि. म्होरक्या; पुढारी. ( मुलांच्या खेळांत ). –पु पुढारीपण; पुढाकार. ०**घेणें-धरणें-पत्करणें.** [ सं. अग्र; प्रा. अग्ग; गु. अगुवो; हिं–अगवा–ना, आगे; पं. अग्गे; जि. अगोर ]

**अग्या**—पु. १ काजवा. 'अग्या निजतेजसत्ता। अभितेज प्राशूं जातां। तोंड जळे चवी चाखितां।'–एभा ४.८६. २ एक खाजरी अंगाची आग करणारी वनस्पति ( खाजकुयरी ). [ सं. अग्नि ]

**अग्या(गे)री**—स्त्री. अग्निपूजकांचा किंवा पारशांचा पवित्र अग्नि ज्या ठिकाणीं असतो ती जागा; पारशांचें देऊळ. [ सं. अग्नि+अगार; प्रा. अग्गिआर–अग्यारी ]

**ॲग्यू**—पु. हिंवतापाचा एक प्रकार. [ इं. ]. ०**मिश्चर**–न. या तापावरील औषध. [ इं. ]

**अग्र**—न. १ टोंक; शेवट; कळस; बिंदू; शेंडा. २ पुढचा भाग; अघाडी. ३ दिगंश. ४ ( समासांत श्रेष्ठार्थी ); पहिला; पुढचा; मुख्य; प्रधान. [ सं. ]. ०**का–ज्या**–स्त्री दिगंश; सूर्य, तारे किंवा इतर ग्रह हे क्षितिजाच्या ज्या बिंदूंत उगवतात किंवा मावळतात तो बिंदु आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदू यांच्यामध्यें जो कंस होतो तो. ०**गण**–वि श्रेष्ठ, प्रवीण, तरबेज. 'रुक्मिणी अग्रगणी सकळिकां।'–एरुस्व ६.७०; 'चपळविशई अग्रगण।'–दा १.२.२२. [सं. अग्रगण्य]. ०**गण्य**–वि. श्रेष्ठ. प्रमुख. पुढें नेणारा. अग्रगण्यु, अग्रण्य अशीहि रूपें आढळतात. ०**गामी**–वि. पुढें जाणारा; नेता; पुढारी. **अग्रगामिनी**–स्त्री. ०**ज**–वि. प्रथम जन्मलेला–वडील भाऊ ०**णी**–वि. मुख्य, नायक; म्होरक्या, मुखिया, मार्गदर्शक. ०**तः**–क्रिवि पुढें; अग्रभागीं ०**धान्य**–न जोंधळा, अरगडी, भात, बाजरी वगैरे खरीपाचें पीक. खरीप पहा. ०**तलसंचर (पाद)**–वि ( नृत्य ) नाचण्यास उभें असतां पायाची टांच वर उचलून आंगठा जमीनीला टेंकून बाकीच्या बोटांची अग्रें वांकडीं करणें. ०**पूजा**–स्त्री. सभेंत विद्या, तप, वगैरेमुळें जो श्रेष्ठ असतो त्याची प्रथम करण्यांत येणारी पूजा–मुख्य मानपान. –**मान**–वरील पूजेचा मान. 'ज्याची अग्रपूजेची मान्यता... । त्या ब्रम्हयाग्नि माझी काळसत्ता । ग्रासी सर्वथा ॥'–एभा. १०.६१३. [ सं अग्र+पूजा ] ०**फूल**–न. वेणीच्या अग्रांत गुंतविलेलें सोन्याचें जोड फूल. वेणी खोवली असतां तिच्या मध्यभागीं हें दोन बाजूंनीं दिसतें. [ अग्र+पुष्प ]. ०**भाग**–पु अग्र पहा. १ पुढला भाग २ टोंक; शेवट; कळस; माथा; शिखर; शेंडा. ०**भोजन**–न. पहिल्याप्रथम जेवणें; आधीं जेवणें; प्रथम जेवण्याचा मान, सर्वांच्या आधीं जेवणास बसण्याचा मान. [ सं. अग्र+भुज् ]. ०**भोजी**–वि. अग्रभोजनाचा मान असणारा; आधीं जेवणारा. ०**लेख**–पु वर्तमानपत्रांतील मुख्य लेख ( लीडर ); संपादकीय लेख. [सं. अग्र+लेख]. ०**वन**–न. १ झाडाच्या फांदीला फुटणारी डिरी. 'अधुं कामु पसरे। अग्रवनें घेती थारें।'–ज्ञा १५. १५८. २ अरण्याची सरहद्द. [ सं. अग्र+वन ]. ०**वर्ण**–पु. श्रेष्ठ जात; ( ल. ) ब्राह्मण. 'त्यांहीमाजीं उत्तमता कैशी । अग्रवर्णासी पै जन्म ॥'–एभा ७.६३५. [ सं अग्र+वर्ण ]. ०**वर्ती**–वि. अघाडी, पुढें असणारा–जाणारा. ( स्थळ व काल यांना अनुसरून लावितात ). [ सं. अग्र+वृत् ] ०**वादी**–पु १ वादी; फिर्यादी; वादाचा प्रथम उपक्रम करणारा; प्रतिवादीच्या उलट. २ आपल्या मताचा किंवा पक्षाचा जोरानें पुरस्कार करणारा. [ सं. अग्रवादिन् ]. ०**सर**–वि. १ अग्रेसर; अग्रगण्य; पुढारी; व्यवस्था पहाणारा; नेता. २ प्रमाणांत असलेल्या दोन संख्यांपैकीं पहिली. ३६:४८ यांतील ३६. –छअं १०४. ०**स्कंध**–पु. खांद्याचें पुढच्या भागाचें माप ( शिवणकाम ). 'अग्रस्कंध व पाठतोल हीं दोन्ही योग्य असतां बॉडीकोट पार्टींत फार रुंद असतो याचें कारण काय ?'–काप्र. २५. ०**हार**–पु. ब्राह्मणांना किंवा देवस्थानाला निर्वाहासाठीं दिलेलें गांव, जमीन वगैरे इनाम; (अप.)

अग्राहार. 'वापी कूप आराम। अग्रहारें हून महाग्राम।' –ज्ञा १८.९९. २ एक दुमाला. एका कुटुंबाहून जास्त कुटुंबांस निर्वाहार्थ जो गांव अगर जमीन देतात त्यास अग्रहार दुमाला म्हणतात. –इनाम २८. [सं. अग्र+हृ]

**अग्रा**—स्त्री. अग्रका पहा. समांशाचा कोटिकोन पूर्व किंवा पश्चिम समबिंदूपासून दृग्मंडलाचे पातापावेतों मोजला जातो त्यास अग्रा म्हणतात. –सूर्य १७ [सं.]

**अग्रार**—स्त्री. अग्रहार पहा. 'तीर्थी अर्थी जो अग्रारें।' –दा २.७.१९. [सं. अग्रहार]

**अग्रांशु**—पु. प्रकाशकिरणांचा शेवटः केंद्रबिंदु. [सं. अग्र+अंशु=किरण]

**अग्रासन**—न. सभेंतील प्रमुख स्थान; मुख्यासन, अध्यक्षपद. [सं. अग्र+आसन]

**अग्राह्य, अग्रहणीय**—वि. घेण्यास अयोग्य; वाईट; बेकायदेशीर; अमान्य; अधर्म्य; नालायक. 'मॉटेग्यु सुधारणा अग्राह्य आहे.' –टि. ३.४२५. [सं. अ+ग्रह्]

**अग्रिम**—वि. १ पुढचा; आधींचा. २ पुढारी; मुख्य; प्रमुख; वडील. ३ अग्रज; वडील भाऊ. ०**धान्य**–न. अग्रधान्य पहा.

**अग्रेवन**—अग्रवन पहा.

**अग्रेसर**—अग्रसर पहा.

**अग्रो( ग्रो )**–पु. आग्रह पहा. [सं. आग्रह]

**अग्रोदक**—न. १ कोणाचाहि स्पर्श होण्यापूर्वी घेतलेलें पाणी. २ ताजें पाणी; स्वयंपाकासाठीं सोंवळ्यानें आणलेलें पाणी. 'अग्रोदकाचा भरून कलश.........पूजावया परमपुरुष।' –ह ३४.१८२. [सं. अग्र+उदक]

**अग्र्य**—वि. प्रमुख; श्रेष्ठ; नेता; पुढारी. [सं.]

**अघ**—न. १ पाप. 'म्हणोनि सांडिजे तो अघीं।' –ज्ञा ३.१२३. २ दोष; गुन्हा; अपराध. [सं]. ०**गोवा**–पातकांचा बंद, नड; गुंता. 'मद्भजनें तोचि निस्तरला अघगोवा रे ॥' –शिक १९. [गोंवणें]

**अघटघटी**—वि. अशक्य गोष्ट घडवून आणणारी. 'अघटघटी हरीची माया।' –एभा ७.५७४. [सं. अ+घट् + घट्]

**अघटमान**—वि. न घडणारें. असंभाव्य. अशक्य. 'हे चर्चा अघटमान पै।' [सं.]

**अघटित**—वि. १ असंभाव्य; विलक्षण, चमत्कारिक; लोकोत्तर. 'अघटित वार्ता। कोल्हे गेले तीर्था ॥'; 'हरिच्या दासां चिंता। अघटित हे वार्ता ॥' –तुगा २३११. २ अघोर; अति वाईट; भयंकर; राक्षसी; आसुरी. –न. अतर्क्य, अश्रुतपूर्व गोष्ट–प्रसंग. 'अघटित घडे कापसा ॥ कापसानें कपाळ फुटे ॥'; 'कर्मी त्यांचे अघटित।' –ऐतिपो १४५. [सं.]. ०**घटना**–स्त्री. विलक्षण गोष्ट; आश्चर्यकारक बनाव, प्रसंग; नवल. [सं.]. ०**घटी**–वि. न घडणारें तें घडवून आणणारी. 'ईश्वराची माया पूर्ण। अघटितघटी तिचें लक्षण ॥' –एभा २३.४२१. [सं.]. ०**विंदाण–न**–न. विलक्षण किंवा आश्चर्यकारक गोष्ट; नवल; चमत्कार; करणी ( काल, दैव, ईश्वर यांची ). 'कोरडे कागद उदकीं राखणें। हें अघटित विदान दाविलें ॥'

**अघटी–टें**–आगटी पहा.

**अघड**—वि. न घडविलेलें; घडींव नसलेलें; ओबडधोबड (दगड, वस्तु इ० ). [सं. अ+घट्]. ०**ता**–वि. न घडणारा; अशक्य. 'तेथ परिवारु बहुये। अघडता कीं॥ –अमृ ९.३८; 'हे असो मात अघडती।' –ज्ञा १.२३५; 'म्हणाल हे उपदेशिली नीती। आम्हांस तव अघडती।' रास १.६४०.

**अघननघन–अघाननाघान–अघानीनाघानी**—अगननगन पहा.

**अघमर्षण**—वि १ पापनाशक. –न. स्नानविधि व संध्या या कर्मांत घ्राणस्थित पापपुरुषाचें उच्चाटण करण्यास हातांत उदक घेऊन त्यावर नाकांतील वायु सोडून त्या पाण्यानें जमीनीवर आघात करणें ( म्हणजे पापपुरुषाचा नाश झाला ही भावना ). 'येथींच्या अर्थी बुडी देऊन। जे सदां करिती अघमर्षण।' [सं. अघ+मृष्]

**अघरडा**—पु. १ जीभ, नाक, बोट, लेखणी इ० चें टोंक; झाडाचा शेंडा; ( सामान्यतः ) शेवट; टोंक. [सं. अग्र]. २ अघाडा पहा.

**अघव–वा, अघा**—वि. १ अवघा–घें; पूर्ण; सर्व; एकंदर. 'देवकी उदरींचा आठवा। निजध्यास बैसला कंसभावा। जनींवनीं अघवा। आठवा आठवा आठवत ॥' –ह ३.६०'; 'ऐसेनी आघव चोहोंकडे। बैसिलें जालें।–दाव २०३. 'होति अघवियांची विरहिणी।' –शिशु ७५४. [सं. अग्रवत्; प्रा. अग्घव –अघव]

**अघ( घा )ळणें**—उक्रि. पाण्यांत खळबळणें, धुणें ( वस्त्र इ० ). [का. अगळ, अगुळ=पाण्यांत बुडविणें; सं. आ+गल् ?]

**अघळपघळ**—वि. १ ऐसपैस; मोकळें; सैल; लांबलचक. २ ( ल. ) स्वतंत्र; अनिर्बंध; निष्कपट; मोकळ्या मनाचा. –क्रिवि मोकळेपणानें; ऐसपैस रीतीनें; ( बोलणें, बसणें ). [सं. प्रगल्–पघळ द्वि. किंवा का. अगल=विस्तृत द्वि.]

**अघळाअघळ**—स्त्री. ( पाण्यांत ) पुन्हां पुन्हां खळबळणें. [अघळणें]

**अघा**—पु. १ धनी; यजमान. २ मुसलमान बादशहाचा खास खोजा. ३ तुर्की राज्यांतील सेनापति, मुख्याधिकारी इ० ची पदवी. [सं. अग्र; तु. आघा=श्रेष्ठ]

**अघाऊ**—अगाऊ पहा.

**अघाड**—वि. (चंद्र.) उंच; मोठें. [सं. अ+घट; किंवा तु. अघा]

**अघाडा**—पु. १ आषाढांत उत्पन्न होणारें एक औषधि झाड; पांढरा, रक्त व पाण असे तीन प्रकार; दंतधावन, आम, व्रण यांवर

उपयोगी. उंची ४ ते सहा फूट. दांड्यावर रेषा व लव. पानाची वरची बाजू नरम व खालची खडबडीत. राख खताच्या उपयोगी. क्षाराचा उपयोग धोबी लोक कपडे धुण्याकडे करतात. २ बायकांच्या केसांचीं अग्रें. (क्रि० बांधणें–विंचरणें). [सं. अग्रजात. प्रा. अग्घाड; गु. अघेडो ]

**अघाडी**—स्त्री १ पुढला भाग· पिछाडीच्या उलट. २ सैन्याचा पुढला भाग; बिनी. ' रोखिलें अघाडी जेजाला । ' –पपो ११८ ३ घोड्याच्या गळ्याला बांधावयाची पुढील दोरी; दवासन. –क्रिवि. पूर्वी; पुढें; अगोदर. [ सं. अग्र ]. ०**घेणें**–पुढें होणें; पुढाकार घेणें. ०**मारणें**–१ पुढें जाणें. ' तोंपर्यंतच काय जी अघाडी असेल ती मारली पाहिजे. ' –चंद्रगुप्त १२१. २ सैन्याची बिनी कापणें. ०**साधणें**–दुसऱ्याच्या आधीं जाऊन काम पुरें करणें.

**अघाडीपिछाडी**—स्त्री. १ घर, सैन्य इ० चा पुढला व मागला भाग. २ घोड्याच्या डोक्याकडील व मागच्या पायाकडील बांधावयाचे दोर; दवासन आणि पायबंद. –क्रिवि. पुढें मागें; पूर्वी नंतर. [ सं. अग्र+ पिच्छ. हिं. ]

**अघात**—पु. आघात (अप.); संकट. ' हरिनामें प्रल्हाद तरला । नाना अघातापासून सुटला ॥ ' –दा ४.३.१७. [ सं. आघात ]

**अघेडा**—अघाडा पहा.

**अघोट**—अगोट पहा.

**अघोर**—वि. १ अचाट; फार भयंकर; भीतिप्रद; अमंगळ. (वस्तु, क्रिया, स्थान). २ अकाळविकाळ; अकटोविकट. ३ निष्काळजी; बिनघोर; निर्भय; स्वस्थ; बेफिकीर. ४ सौम्य; घोर नाही असा. 'अघोरचक्षुः अपतिघ्न्येधि।' –ऋग् १०.८५.४४ –अंतरपाट काढल्यानंतर ' ही वधू सौम्य दृष्टीची असावी ' असें म्हणतात. –पु. १ संकट; घोर. ' माझी हरिली त्वां जरा। आणि देहींच्या अघोरा दवडिलें॥'–कथा २.५.१७७. २ शंकर. यावरून अघोरपंथ निघाला. ' या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी। ' –तैसं० रुद्र. ३ एक नरक. ' जो द्विजदेवांची वृत्ति हरी...ते तिघे अघोरीं पचिजेति । ' –एभा २७.३९३. ०**अरण्य**–न. भयंकर अरण्य. ०**कर्म**–न. भयंकर, धाडसी किंवा अमंगळ काम. ०**जप**–पु. पिशाच मंत्राचा जप. ०**दंड**–पु. जबरदस्त दंड. ०**निद्रा**–स्त्री. गाढ झोंप. ०**पंथ**–पु. गोसाव्यांचा एक पंथ; हे लोक हातांत नरकपाल घेणारे व नरमांस भक्षण, मलभक्षण व इतर अघोर (अमंगळ) कृत्यें करणारे असतात. ०**पंथी**–वि. वरील पंथाचे अनुयायी. [ सं. अघोर + पथिन् ]. ०**मत-मार्ग**–अघोरपंथ पहा. –**मार्गी**–अघोरपंथी पहा. ०**योगी**–पु. अघोरपंथ व त्याच्या अनुयायांचा समाज. 'शाक्त आगम आघोरयोगी । कैसे ते ऐकावे ॥ –दा ४.१.१३. [ सं. ]

**अघोरी**—वि. १ अघोरपंथी; साहसादि कर्मे करणारा; स्नान संध्यादि आचार न पाळतां अव्यवस्थितपणें वागणारा. ' राखेचा बोकाणा तोंडांत भरून मेल्यासारखा पडतो. तिळाची पेंड कुजविली म्हणजे तिची विष्ठेसारखी घाण येते हीं नकली विष्ठा खाण्याची भीति दाखून अघोरी पैसे उकळतो ' –गांव १३३. २ तिरस्करणीय. निंद्य. त्याज्य भयंकर दुष्ट. साहसी अमंगळ. [ सं. अघोर ]

**अचकट, अचकटविचकट**—वि अश्लील; वाईट. घाणेरडे वाह्यात बीभत्स; शिनळ चावट(भाषण, भाषण करणारा). ०**उच्चारणें**—अपशब्द, अश्लील वाक्यें उच्चारणें. जननेंद्रियावरून शिव्या देणें. [ सं विच्=निराळें करणें. म विचकट द्वि. ]

**अचकवोचक**—स्त्री गैरपद्धतीनें, अस्ताव्यस्तपणें, कसेंतरी, अधूनमधून घेणें–उपटणें (शेतातील गवत वगैरे) [ वोचक द्वि. ]

**अचकवोचक, अचकवचक**—क्रिवि अव्यवस्थितपणें; कसेंतरी; अस्ताव्यस्त ( गवत काढणें, घांस घेणे ) शिवाय अचट वोचट पहा [ वोचक, वचक द्वि. ]

**अचकय**—क्रिवि (गो ) अजगय, हळूच नकळत [ सं अ+ जागृ. म अजाग ]

**अचकलदचकल**—न.(व ) कोणतेंहि, वाईट, जाडेंभरडें अन्न, काहींतरी अयोग्य खाद्य. ' अचकलदचकल तुला पचणार नाहीं ' [ अचकळ किंवा अचकुल द्वि ? ]

**अचकलेंविचकलें**—अचकलेंविचकलें पहा.

**अचकळ**—वि पाणचट; पाचकळ. [ सं अर्ध+कला ? ]

**अचकाविचका**—पु गोंधळ, गुंतागुंत, चिवडाचिवड; अव्यवस्थितपणा (ल.) नाश, बिघाड, दुर्दशा विचका पहा. [विचका द्वि.]

**अचकागचका**—पु. १ अपस्मार, फेफरें वगैरेनें शरीराला बसणारा हिसका. २ एकाएकी चलाखीनें ओढणें, ढकलणें, ढोसा देणें; धक्का मारणें. ( क्रि० देणें ). ३ धसका. दहशत ( क्रि० बसणें ). ०**खाणें**–बोलण्यांत अडखळणें [ अचका+गचका. सं आ+कृष्; प्रा. अंच; का. अच्चग=घाबरें होणें. द्वि ]

**अचकी**—स्त्री. उचकी हिक्का उचकी पहा. ( क्रि० देणें–येणे ).

**अचक्री**–वि. सर्व, संपूर्ण; अवघी. ' टवकीस (अवनी) अचक्री रत्नाग्री । ' –गगचि ८६. [ सं आसाग्र; म. असगा–गी ]

**अचकुल**—वि. (बे.) १ नाजुक. हळुवार. २ अशक्त, फुसका; रोगट; हलकट; निरुपयोगी कुचकामी ( इंद्रिय, अंग, यंत्र वगैरे ) ३ मोडलेला; दुखावलेला; व्यंग· पंगु [ सं अर्धकल्य ? ]

**अचंगळ**—वि कुरूप. भाग वाईट चांगला नव्हे तो. [ अ+का. चांगु=भलें ? ]

**अचंचल**—वि. १ न चळणारा न हलणारा. दृढ. स्थिर २ न बदलणारा; ठाम निश्चयाचा. निश्चळ. [ सं. ]

**अचटबोचट**—क्रिवि कमीजास्त; विषम; अर्धमुर्ध; एक-मारखें नव्हे; उच्छंखल रीतीनें (कापणें, आडणें, सारवणें, लावणें). अचकबोचक पहा. [ध्व.]

**अचडेंबचडें अचडंबचडं, अचडुबचडु**—न. १ लाडकें मूल. २ त्याचें संबोधन; छबेला! छबेली! 'अचडुबचडु नामें आळविला।' –अमृतक ५९; 'माझें अचडं ग बचडं! छकडं! ग!।' [सं. वत्स; प्रा. वच्छ, बच्च; बच्च+ड; हिं. बछड. बचड द्वि.]

**अचतुर**—वि अकुशल; बावळट अडाणी; निर्बुद्ध; जड [सं]

**अचपळ**—वि. १ खोडकर; उत्पाती, चंचल. 'अचपळ मन माझें नावरे आवरीतां।' –रा. २ चपळ; तरतरीत; उत्साही; हुषार. 'अचपळ गुण गुणी मैमली प्रीति दुर्णा।' –दावि १५८. [सं अ+चपळ] ०पण–न. खोडयाळपणा, चपळपणा. 'भरारी तो वारा अचपळपणें देश फिरतो।' –दावि २२५.

**अचंब**—पु घोड्याचा एक रंग. –अश्वप २८.

**अचंबा**—पु १ आश्चर्य; चमत्कार; कौतुक; नवल. २ आश्चर्याची गोष्ट; नवलपरी [सं. अत्यद्भुत; प्रा अच्चब्भुय–अचंबअ–अचंबा; हिं अचंभा गु. अचंबो]

**अचंबीत**—वि. आश्चर्यचकित; विस्मित; थक्क. –क्रिवि अचानक; एकाएकीं. [अचंबा]

**अचर**—वि. स्थिर; स्तब्ध; गतिरहित; अढळ; स्थावर [सं. अ+चर]

**अचरट**—वि. (मूळ आचाराचें जास्त स्तोम माजविणारा त्यावरून) बाष्कळ; भलतेंसलतें; अद्वातद्वा; अयोग्य; असंबद्ध (भाषण, बोलणारा); मूर्ख; अधवट; बावळट; मूर्खासारखें वर्तन करणारा. 'वांहेरें टेकें तेरें (अळवाची भाजी), आणि अचरट मागें मांभारें.' [सं. आचारवत् किंवा अ=नाहीं+चर=हाट=दावें ?]

**अचरटपचरट**—वि १ कोरडें; भरड; रुक्ष; बेचव (अन्न) २ असंबद्ध; पाल्हाळिक; अश्लिष्ट, (भाषण बोलणारा). अरबटचरबट पहा [अचरट द्वि.]

**अचरप (ब) चर**—अचरटपचरट पहा. [ध्व]

**अचर्च**—वि १ चर्चेचा–वादाचा विषय होऊं शकत नाहीं असा 'देवी देवो म्हणती अचर्चा तें।' –ज्ञा ४ ६९. –पु. (ल.) नवरा (बायकोनें त्याचें नांव घेतां किंवा चर्चा करितां कामा नये म्हणून). –मनको. [स. अ+चर्च्]

**अचल**—वि. १ स्थिर, गतिरहित 'अचळु हा शाश्वत।' –ज्ञा २.१४० २ अक्षय; अखंड. 'बंधु.. अचळिचें राज्य करिती।' –वमा ६६. ३ शांत, थंड; अचंचल; दमदार. निश्चित हेतु असलेला –पु पर्वत; टेकडी 'तैं पापाचा अचळु फिटे।' –ज्ञा ४.५६. [सं. अ+चल]. ०तारा–पु. स्थिर तारका. ०स्वर–पु. (संगीत) आपल्या जागेवरून न हालणारा (खालींवर न होणारा) स्वर; हे दोन आहेत; षड्ज व पंचम.

**अचला**—पु हातरुमाल अचळ पहा. [सं. अंचल].

**अचला**—स्त्री. पृथ्वी. 'कंपातें भीष्मार्जुन देती अचळेसि शस्त्रसंपातें।' –मोभीष्म ३.३० [सं.] ०गौर–स्त्री. मकरसंक्रांतीच्या दिवशीं बायका एका बाईस आसनावर बसवून तिला खाऊं पिऊं घालतात. मुलींचे हाल देत नाहीत, ती बाई

**अचलित**—वि. स्थिर; स्थावर; ठाम; निश्चल; न हललेलें. [सं.]

**अचळ**—वि. १ अचल पहा. २ न शिवलेला; न हाललेला, किंवा हालविलेला; उपयोग न केलेला; अस्पृष्ट (खाण्याचा पदार्थ इ.) ३ (ल.) अवघ; बाकी; शिल्लक. –क्रिवि अलगत; अल्लाद; दमानें; हळूहळू. 'हें तोंडोतोंड भांडें भरलें आहे, अचळ उचलून ठेव.' [सं. अचल]

**अचळ, अंचळ**—पु. १ पदर; आंचा 'नाहीं अचळ सावरावा ठावे।' –तुगा १११. 'लपविला कृष्ण, अचळ पल्लव मुखावरी घाली।' –भज ३५. २ अंचूळ; आंचूळ; स्तन; थान (गुरांचें) ३ बारीक वस्त्र; हातरुमाल 'सर्वेचि निमेला आंचळें दाटिले। सेवक जनीं॥' –ऋ ८८. [सं. अंचल]

**अचळपद**—न. अढळपद, मोक्ष. [सं.]

**अचळय**—क्रिवि. (गो) १अलगत; धक्का न लावतां. २ (ल) सहज; कष्ट न पडतां; अनायासानें 'ताका गिरेस्तकाय अचळय मेळ्ळी.' [सं. अचल]

**अचळवी**—वि. १ अचल, अचळ पहा. ०वाण–मकर संक्रांतीला जिची सर्व मुलें जिवंत आहेत अशा सुवासिनीस आधल्या दिवशीं विरजून ठेवलेलें व हात न लावलेलें असें दहीं पात्रासुद्धां, स्तनःच्या मुलांच्या दीर्घायुष्यासाठीं वाण म्हणून देतात तें. [सं. अचल+वायन]

**अचळागौर**—स्त्री. अचळवी वाण जिला द्यावयाचें ती. तिची न्हाऊखाऊ घालून ओटी भरून पूजा करतात.

**अचळोजी, अचळोबा**—पु. आळशी; मंद; मठ्ठ; लठ्ठ; गेंदी; लठ्ठ; गुळाचा गणपति. [सं. अचल]

**अचक्षु**—वि. ज्याला डोळे नाहींत असा; अंधळा [सं.] ०दर्शन–न. डोळे सोडून बाकीच्या इंद्रियांनीं व मनानें होणारें ज्ञान. ०पण–न चक्षुरहित स्थिति; अंधत्व; आंधळेपणा. 'जयाचेनि बळें। अचक्षुपण आंधळें॥ फिटोनि वस्तु मिळे।' –अमृ ७.१२०.

**अचांगणें**—अक्रि. उमेद, हुशारी, वाढ नाहींशी होणें; कोमजणें; वाळणें; अचांगी भरणें; आजारी होणें. [अ+का. चांग]

**अचांगळी**—वि. उणें; वाईट 'अचांगळी अधिक शब्द। ऐकून उठिला वीर गद॥' –एरुस्व ९. ४. [अचांगळ]

**अचांगी**—स्त्री. आजार; दुबलता; ऱ्हास. ०भरणें–होणें–आजारी पडणें. 'अचांगी भरली पोर मेला.' ०नें शिवी देणें–बोलणें–तोंडानें वाईट बोलणें, शिव्या देणें. [अ+का. चांग]

**अचांचल्य**—न. स्थिरपणा; निश्चितपणा; अचलता. [ सं. ]

**अचाट**—वि. फार; अतिशय; विलक्षण; अफाट; लोकोत्तर, बेसुमार; अपरिमित; अतर्क्य; चमत्कारिक; फाजील; अनिर्बद्ध. ' ते दोन्ही शब्द अचाट ।'—ज्ञा १.१४७; 'लाटांवरी अचाट लाटा ।'—एभा २.६४; ' रत्नमुक्तमार्णीक राशी । शृंगारादि अचाट ।'—नव २१. १०३; ( क्रि० बोलणें, लिहिणें, करणें ) म्ह० १ अचाट खाणें मसणांत जाणें; २ अचाट बुद्धि खेळवावी बळेंच लक्ष्मी मेळवावी. [ सं अत्यर्थ; प्रा. अच्चत्थ अच्चट्ट—अचाट ]

**अचाट**—वि. चावट; फाजील; लुच्चा. ' कशीं मुलें ही अवघीं अचाटें ।'—सारु१. ६ ७ [ सं. अ+चाट=लबाड ]

**अचानक**—क्रिवि. १ एकदम; अकल्पितपणें. ' अचानक गनीम येऊन पडला. ' २ तडक; सरळ; बिनहरकत. 'त्या मार्गानें अचानक पुण्यास जाशील ' ३ हळूच. अल्लाद. ' ही कांचेची हंडी अचानक उचलून ठेव.' ४ सहज, अनायासानें. 'हा ग्रंथ मला अचानक मिळाला.' ५ चोरून; गुपचिप ' हा कांहीं कांहीं अचानक खातोसें दिसते ' ६ अस्पृष्ट; अचळ; जसेंच्या तसें; कमजास्त न होतां. याशिवाय या शब्दाचे आणखी बरेच शिथिलपणें झालेले अर्थभेद आहेत [सं. अज्ञानतः ? हिं. अचानक, अचानचक.]

**अचापल्य**—न स्थिरता; दृढता. अचंचलता; सततपणा [सं. ]

**अचार**—पु. आचार; लोणचें [ हि गु आचार ]

**अचाल**—स्त्री. खोटी; खोळंबा; अडचण ' तुझी अचाल असल्यास दोन दिवस माझी कायती घेऊन जा.' [अ+चाल=प्रगति]

**अचाव( वा )चा, अच्यावच्या**—क्रिवि. १ बोलण्यास अयोग्य; निरर्थक; असंबद्ध; अद्वातद्वा; अचकटविचकट ( भाषण ). २ गैरशिस्त; गंदीपणानें ( काम करणें ) ३ अव्यवस्थित. कसेंतरी. 'तो अचावचा खातो.' [ ध्व. सं. अवाच्य+वाच्य ]

**अचिकित्सनीय**—वि. असाध्य; उपायाबाहेर गेलेला ( रोग इ० ) [ सं. ]

**अचिंत**—वि चिंतारहित; काळजी नसलेला ' जें अचिंतां अनाथांचें मायपोट ।'—ज्ञा ८.१९५. [सं. अ+चिंत=विचार करणें]

**अचिंतित**—वि. अकल्पित; ज्याचा विचार मनांतहि आला नाहीं असें; अतर्कित; अभावित. [ सं. ]

**अचिंत्य**—वि. विचाराच्या-कल्पनेच्या पलीकडील; अतर्क्य. ' हेतु जया बिहे । अचिन्त्य जें । '—ज्ञा ८. ८८. [ सं. ]

**अचिद्**—न चेतना नसलेलें; जड (वस्तु, जग इ० ); अज्ञान 'अचिदाचेनि नांवें । आलें जें चिन्मात्रदशे । '—अमृ ५. २९. [सं.]

**अचिन्ह**—न (गो.) दुश्चिन्ह; अशुभ गोष्ट [ सं ]

**अचिर-अचिरात**—क्रिवि. अचिरेंकरून; लवकरच; थोड्या वेळांत-दिवसांत; थोड्या अवधीनें. 'सुरवरदाय कांहीं न पवे अचिरें ।'—भामु ७ १. [ सं. ]. ०**काळ**—पु. थोडा अवधि वेळ. ०**स्थायी**-वि. लवकर नाश पावणारें; अल्पकालीन; क्षणभंगुर; पळभुटें. न टिकणारें. **अचिरेंकरून**—क्रिवि लवकरच

**अचिरकाय**—स्त्री. ( गो. ) १ अवधान. ' म्हाका तितलीशी अ० उर्ली ना. ' २ आठवण. ' हांवें तितली अ० धली ना '

**अचीपची**—स्त्री. ( गो. ) सागरगोट्यांप्रमाणें दगड झेलून खेळावयाचा एक खेळ. हा पांचसात खड्यांनी खेळतात [ सं. पंच. पची द्वि. ]

**अचुक**—अचूक पहा

**अचुंगळ**—वि. अचंगळ पहा

**अचुंबित**—वि. १ नवीन; ताजा. 'विशेष भक्तिप्रेम अचुंबित ।' —एभा ११ ६८१, अचुंबित कल्पना गोष्ट=अगदीं नवीन कल्पना-गोष्ट. २ अपूर्व; अद्भुत. 'पुढें अचुंबित निरूपण ।'—एभा ३०.४१३ ३ अचुक ' जो परिणामींचा निर्वाळा । अचुंबितु ये फळा । ' —ज्ञा ५ ७ ४ स्पर्श न झालेलें; अस्पृष्ट. ' जैसें वज्रकवच लेइजे । मग शस्त्राचा वर्षावो साहिजे । परी जैतेंसीं उरिजे । अचुंबिता ।'—ज्ञा २ २३२ ५ निर्मळ निर्लेप ' तें ज्ञान पात्रे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ॥ ' —ज्ञा ४ १८९ ६ निर्मळ ' तेणें श्रीकृष्णें स्तविली भक्ती । परम प्रीतीं अचुंबित ॥ '—एभा २९.६४९. ७ सर्व. अगणित. 'तुझ्या विभूती अचुंबिता । कृपेनें.. सांग ॥ '—एभा १६.२३४. ८ अनासक्त; निःसंग ' परी अचुंबित वर्तणें । अघटमान कर्म करणें ॥ ' —एभा ३. २९३ [ सं. अ+चुंबित=न चुंबिलेली; न भोगिलेली ]

**अचुंबित**—क्रिवि ( कों ) अकस्मात. अचेबीत [ अचंबा ]

**अचूक**—वि. नेमकें. बिनचूक; दोषरहित. निर्दोष. ' अचुक यत्न करवेना । म्हणून केलें तें सजेना ।'—दा १२ २ ६. [सं अच्युत; प्रा. अचुक] ०**संधान**—न. १ नचुकणारा नेम, क्रिया. गोष्ट. ' अचुक मारुतीचें संधान । सोडिता आला असंख्य बाण ॥ ' २ बरोबर घडणारा बेत; न चुकणारी मसलत **अचुकसंधानी**—वि. बिनचूक कार्य करणारा.

**अचेत**—वि अचेतन; जड; चैतन्यरहित ' अचेत लोहचुंबकें चळे । '—एभा २.७०२ [ सं अचेतस् ]

**अचेतन**—वि १ निर्जीव; प्राणरहित; मृत. जड '...खांबसूत्रीं । अचेतन पुतळ्या नाचवी यंत्रीं । '—एरुस्व १३ ६४. २ बेशुद्ध; मूर्छित. [ सं. ]. ०**भार**—( व्या. ) निर्जीव वजन ( जड लोड. पुलावरचें वगैरे ).

**अचेष्ट**—न. ( पदा. ) वातावरणांतील वायुघटकांपैकीं एक मूल द्रव्य; " अर्गान "—ज्ञाको अ ३१. [ सं ]

**अचैतन्य**—न. बेशुद्धि; निर्बुद्धि; मूर्च्छा; निरुत्साहीपणा [सं.]

**अचोज**—न. आश्चर्य; नवल ' अचोज हा बळिया माला ।' —निगा १६. [ सं. आ+चोद्य; प्रा. चोज्ज; म. चोज ]

**अचोष्य**—वि. चोखण्यास अयोग्य-अशक्य; अप्राशनीय. [सं.]

**अच्कलेंविच्कलें**—क्रिवि. १ अचकटविचकट; अव्यवस्थित; वाह्यात. 'किती येक तीं अच्कलेंविच्कलेसी।'—दावि २८४. २ अचकुल पहा. [ विचकणें—विचकल द्वि. किंवा अचकल द्वि. ]

**अच्किंत**—क्रिवि. ( गो. ) अकस्मात; अकल्पितपणें. 'म्हाका तॉ अर्चकित वाटेर मेळ्ळॉ' [ अवचित ? ]

**अच्चावच्चा**—अचावचा पहा.

**अच्छ**—वि. १ विमल, स्वच्छ. 'बहुधां ममर्चिला बहु जन्म श्रीराम अच्छविभवानें।'—मोभीष्म ३.६८ [ सं ]. २ श्रेष्ठ, उत्कृष्ट; उत्तम. —उद्गा. ठीक! बरोबर! बरें! [ हिं. अच्छा ]

**अच्छा**—क्रिवि. ( चि. ) अलीकडे; हल्लीं; आतांशां. [ आतांशां अप. ]

**अच्छा**—वि. १ छान; सुंदर, चांगलें. —उद्गा. उत्तम. बरें! ठीक! होय. [ सं. अच्छ; हिं. ]

**अच्छिद्र**—वि. १ भोंकाशिवाय, व्यंगरहित. २ पूर्ण. [ सं. ]

**अच्छिन्न**—वि. अखंड; सबंध, न कापलेलें विभागलेलें. [ सं. ]

**अच्छेखां, अच्छेखान**—वि. (व. ना.) तिस्मारखान, टेकोर्जा (प्रमाणें), वरिष्ठ, मोठा. 'तूं नाही मोठा अच्छेखां आला त ( तर ) मी डरत नाहीं.' [ हिं. अच्छा ]

**अच्छेर**—पु. अर्धाशेर ( वजनी मापी ) [ सं. अर्ध+शेर; का. अच=अर्धा ]. ०**पावशेर**—पु. अव. ( कु. ) कच्चींबच्चीं.

**अच्छेव**—पु. ( गो. ) उच्छाद; धांगडधिंगा, हैदोस; धुडगूस. 'ह्या भुरग्यांचे मामकों अच्छेव आयला!' [ सं. उच्छेद ]

**अच्युत**—पु. १ परमेश्वर ( विष्णु ). —वि. न पडणारा. न ढळणारा; स्थिर, अचल. नाशरहित. जसें अच्युतपदवी. अच्युताधिकार. 'अचळु मी अच्युतु।'—ज्ञा १८.११९८ [ सं. ] ०**फळ**—न. आंबा ( फळ ). [ सं. चूतफल ]

**अछंदस्क**—वि. कवितावद्ध नसलेला ( गद्य ). [ सं. ]

**अछोडा**—पु. ( गु. ) कासरा. ( बैलाचा ) दोर. कादरी; चाबूक. [प्रा. अच्छोडिअ—अछोड. म. असोड ]

**अज**—वि. अजात; नित्य; जन्मरहित. 'मी अजुही परिसंभवें। प्रकृतियोगें।'—ज्ञा ४.४८. —पु. १ ब्रह्मदेव. शिव; विष्णु; चंद्र; कामदेव; सामान्यतः ईश्वर. २ श्रीरामाचा आजा. ३ बोकड; बकरा. [ सं. अ+जन=जन्मणे ]

**अज**—शअ. १ पासून, मुळें, कडून. २ अनेक सदरें वेगळालीं व्हावीं आणि बेरजांचा ताळा पडावा म्हणून सदरवार बेरजांच्या एकंदर बेरजांची जी पंक्ति मांडतात ती. [ फा. अझ् ]

**अज**—आज पहा.

**अजकदीम**—क्रिवि. पूर्वीपासून. 'अजकदीम इनायत असे'—वाडमा १.६५. [ फा. अझ्+अर. कदीम=प्राचीन, जुना. ]

**अजका**—वि. अजिंक्य ( ? ) —शर. [ सं. अजय ]

**अजंगम**—वि. स्थावर; न हलणारें ( घर, झाड इ० ). 'अजंगमाची खाल काढविली।'—ज्ञा १३.२२७. [ सं. ]

**अजगय**—क्रिवि. ( गो. ) हळूच; नकळत. [ सं. अ+जागृ ]

**अजगर**—पु. एक प्रचंड साप; ( कों. ) आर. हा बकरीलाहि गिळतो म्हणतात म्हणून अज+गर ( गिळ ) हें नांव. हा हिंदुस्थान, आफ्रिकेंतील दलदलीचे प्रदेश व अमेरिकेंतील उष्ण प्रदेशांत आढळतो. हा फार सुस्त व हालचालीस मंद असतो. विशेषतः अमेरिकेंत १०० फूट लांबीचाहि आढळतो. [ सं. ]. —वि. १ ( ल. ) सुख दुःखातीत (योगी); कर्मासंबंधीं कांहीं प्रयत्न न करणारा; केवळ ईश्वरावर भरंवसा ठेवणारा. २ आळशी; मंद; जड. उ० अजगरस्वभाव-प्रकृति-चाल-संप्रदाय; अजगरासारखा पडणें-पसरणें-निजणें-चालणें-पोसणें. ०**वृत्ति**—स्त्री. आपोआप येऊन पडलेली भिक्षा ( खाण्याची ) वृत्ति; आळशीपणाची वृत्ति; आळशीपणा; अगांतुकी करण्याचा स्वभाव; ऐदीपणा.

**अजगूल**—वि. ( कों. ) १ अधू नेत्राचा. २ अचकुल पहा. [ अचकुल ]

**अजगै**—क्रिवि. ( गो. ) वाजवीपेक्षां अधिक. 'तुजेकडेन अजगै आसल्यार दी म्हाका.'

**अजज**—पु. घोड्याच्या पायाचा (खुराचा) रोग. —अश्वप २७१.

**अजंट**—वि. ( ना. ) अट्टल; अस्सल; लफंगा; लबाड. [ हिं. अजंट=पूर्णपणें तयार ].

**अजड**—वि. १ चैतन्ययुक्त; जडच्या उलट. 'तो जडाजडातें विरवितु।'—ज्ञा ८.९७. २ मंद, मूर्ख नव्हे तो. [ सं. ]

**अजडांश**—पु. जडपणा नसणारा, पदार्थ, गोष्ट इ०; अमूर्त, निराकार वस्तु ( ब्रह्म, आत्मा इ० संबंधीं योजतात ). [ सं. ]

**अजतरफ-अजतर्फे**—शअ. पासून; कडून, बाजूनें. ( जुन्या पत्रव्यवहारांत वरिष्ठांकडून खालील अधिकाऱ्यांस योजितात )—पया ४००. [ फा. अझ्+तरफ् ]

**अजन्म-न्मा**—वि. १ न जन्मलेला; ज्यास जन्म नाहीं असा. ( ल० ) ब्रह्म; ईश्वर. 'अजन्मा होता निजेला।'—दा. २ शाश्वत; निरंतरचा [ सं. ]

**अजप**—अजब पहा.

**अजपत्र**—न. अभिप्रायपत्र. ( ? ) —शर.

**अजपा ( जप )**—पु. १ एका अहोरात्रांत माणसाचे २१६०० श्वासोच्छ्वास होतात. त्यांवर 'सोहं' हें बसवून जो सहज, आयासविरहित जप करावयाचा तो. श्वासाबरोबर 'सः' व उच्छ्वासाबरोबर 'अहं' ( तें ब्रह्म मी आहें ) म्हणावयाचें; याला हंसमंत्र असेंहि म्हणतात. 'येकवीस सहस्र स्वासें जपा। नेमून गेली ते अजपा।'—रा १७.५.१. (सामान्यतः) श्वासोच्छ्वास. 'पवन विंजितसे अजि

पाळवें। मृदु असूं गतिनें अजपा लवे।' —मंगधा—मक १६२. [सं.] •गायत्री स्त्री., ०मंत्र—पु. वरील जपालाच म्हणतात.

**अजपूजाश्रीसरस्वती**—स्त्री.श्रीसरस्वतीच्या पूजामंदिरांतून: (विजापूरचा दुसरा इब्राहीम आदिलशहा हा हिंदुधर्माला मान देणारा असून त्याला हिंदी गायनाची फार आवड होती व त्यासाठीं त्यानें राजवाड्यांत सरस्वतीची मूर्ति स्थापिली होती. त्या सरस्वतीच्या मंदिरांत त्यानें राज्यकारभाराची कचेरी करून तेथून तो सर्व बादशाही फर्मानें काढी. म्हणून असल्या फर्मानांच्या डोक्यावर किंवा समासांत 'अजपूजा श्रीसरस्वती' हीं अक्षरें लिहिलीं जात.) —भाद्वि-संवृ ५१; ६८.

**अजब**—वि. आश्चर्यकारक; विलक्षण; चमत्कारिक. उ.—अजब ख्याल; अजब तऱ्हा इ०. 'कल्पनाशक्तीनें कांहीं तरी दरवर्षी अजब चिजा काढल्याशिवाय आमच्या पाश्चात्यांनां चैन पडत नाहीं.'—नि ४१६. [अर. अजब]. ०खाना—पु. पदार्थसंग्रहालय; म्युझियम; चमत्कारसंग्रह.

**अजबाई**—स्त्री नवल; आश्चर्य; चमत्कार; अलौकिकपणा [अर. अजब; हिं. अजाइब]

**अजबाब, अज्बाब**—पु. स्त्री. १ मालमत्ता; जमीनजुमला; सामानसुमान; चीजवस्त; बरोबरचा सरंजाम —शिदि २४७. 'जुन्या कमिटीकडून अजबाब सोंपून घेण्याचें काम सुरू होऊन तें सन १८८६ सालीं पुरें झालें.' —जनि ३. २ युद्धसाहित्य; युद्धसामुग्री. असबाब पहा.

**अजबायेस**—शअ. कारणानें. 'अजबायेस बिमारी'=आजारामुळें. —पदमव ११४. [फा. अझ्+अर. बाईस=कारण]

**अजबुनात-द-दी**—वि. प्राचीन. 'बाछाई तक्त दिल्ली अजबुनांत जागा।' —पला ९. [फा. अझ्+बुनयाद=स्थापना, प्रारंभ]

**अजम**—वि. १ श्रेष्ठ; थोर; सन्मान्य; राजश्री; पदवी (विशेषतः मुसलमान आणि ब्रिटिश लोक यांना). 'अज्जम चापलेनसाहेब यांणीं' —मुंब २३६. मुसलमानी आणि पेशवाईतील पत्रव्यवहारांत कनिष्ठांकडून वरिष्ठांस हा शब्द लाविला जात असे. 'अजम अफझलखान महमदशाही.' परंतु इंग्रजी अमदानींत हा कनिष्ठांस लावतात 'अजम पाटील कुळकर्णी.' [अर. अझम्. तु० —सं. अर्यमन्=सूर्य, श्रेष्ठ; प्रा. अज्जम—अजम?]. —पु. १ सामर्थ्य; जोर; अभिमान. २ निश्चय; विचार. 'ऐशा समयास नबाब मौसुफ यांनीं अजम केल्यास पातशाही दाब व बहुत कामें घडून येतील.' —दिमरा १.४९

**अजमत**—स्त्री. थोरवी; श्रेष्ठता; प्रभाव; मोठेपणा; प्राबल्य; करामत. 'कांहीं एक अजमत दाव मला।' —अज्ञाअ १० म्ह० जेथें अजमत तेथें करामत. [अर. अझ्मात्]. ०खान-पीर—पु जेजुरीची देवता; एकदां औरंगजेबानें जेजुरीचा खंडोबा फोडण्याचा प्रयत्न केला त्यावेळीं असंख्य भुंगे त्याच्या पाठीस लागले. तेव्हां त्यानें एक रत्नजडित भुंगा करून खंडोबास वाहिला. तो भुंगा पुढें उमाजी नाइकानें नेला, अशी आख्यायिका आहे

**अजमाव-वा**—पु १ प्रयोग. परीक्षा. कसोटी २ अजमास; अंदाज; हिशेब. गणती [फा अझ्माइश्]. —णें सक्रि १ प्रयत्न करणें; परीक्षा करणें 'शमनापीरें समर्थ अजमाविले।' —सप्र ८.३ ७३ २ अजमास पाहणें. हिशेब करणें. अंदाज करणें.

**अजमास, अज्मास**—पु.(गो) १ अजमाव पहा. 'अजमास घे आणि मागे पुढे सर' २ सालाची जमाबंदीची ठराविक रकम. बजेट; जमाखर्च अंदाजपत्रकाचा तक्ता. मामलेदारानें आपल्या ताब्यांत जो प्रांत आहे त्याचा वसूल कोणत्या रीतीनें करावा व दर एक गांवची कमाल बेरीज किती व प्रांतापैकीं दुमाले गांव किती व नक्त खर्च किती याविशीं बंधारण करून जो कागद दरसाल हुजूर तयार होऊन मामलेदाराकडे पाठवीत त्यास अजमास म्हणतात— इनाम. ५०. —चित्रगुप्त ८८. —खरे २८१६ —पया ९१. [फा अझ्माइश्. गु. आजमायष]. ०णें—उक्रि अंदाज करणें. कल्पना बांधणें. **अजमासानें खोर्गार खाणें**—(क) अनुमानानें विधान करणें. **अजमास पंचे दाहोदर्शे** =अंदाजी विधान.

**अजमासी**—वि १ अंदाजी. हिशेब करून काढलेला; गणती केलेला २ (गो.) अंदाज करण्यांत हुशार, पटाईत. 'अजमासी खरो केन्नाच चुकचोना' =बरोबर सांगेल कधीं चुकणार नाहीं. **अजमासें**—क्रिवि. सरासरी [फा अझ्माइश्]

**अजमेरीजोडा**—पु विशिष्ट मारवाडी जोडा. साधी घडण —घाट असलेला जोडा [अजमीर].

**अजमोदल**—न ओंव्याचें तेल; थायमॉल. हें गजकर्ण, इसब वगैरेवर लावतात. [अजमोदा]

**अजमोदा**—पु. १ (या नांवाच्या तीन वेगळ्या वनस्पती आहेत. सामान्यत.) ओंवा. ओंव्याचें झाड अगर त्याचा एक प्रकार. यास पांढऱ्या रंगाची फुलें येतात. पोटदुखी, गजकर्ण, अतिसार, अजीर्ण वगैरेवर औषध म्हणून उपयोग. —वगु. १ ८. [सं. अजमोदा; हि. गु. अजमोद; ऊ. अज्मूद—अज्मोदा; का. अजमोदा; ते. आजमोदा]

**अजय्य**—वि. अजिंक्य [सं]

**अजर**—वि. शाश्वत. वृद्धपणा येत नाहीं असा. अविनाशी; क्षय न पावणारा; ज्यास जरा प्राप्त होत नाहीं असा —देव. [सं.]

**अजरख्तखाने**—क्रिवि. यांच्याकडून यांच्या कचेरींतून. [फा. अझ्=पासून+रख्तखाना=कचेरी+ई]

**अजरामर**—वि. अविनाशी; जरा व मृत्यु यापासून अलिप्त; अक्षय [सं. अजर+अमर]

**अजरामरा (न्हा) मत**—अज्रामऱ्हामत पहा.

**अहाडून पहाडून**—क्रिवि. आडून पाडून; घालून पाडून; टोंचून; टोमणा देऊन; वर्मी लागण्यासारखें औपरोधिकपणें; आहाडून पाहाडून पहा. [ आडून+पाडून ]

**अहाणा**—पु. १ उखाणा (लग्नांतील). २ कोडें. ३ म्हण; उक्ति. आहणा पहा. [ सं. आहनस्या; प्रा. आहाण=उक्ति, वचन ]

**अहादी**—पु. माणूस; एकांडा शिपाई. ' अहादीवर अहादी रवाना केले. ' –मराचि थोशा ६४. [ अर. अह्दी=एक ]

**अहाय अहाय**—उद्गा. अरे अरे; हाय, हाय ( क्रि० करणें ). [ ध्व. हाय ]

**अहार**—आहार पहा.

**अहार**—पु. अजगर; आर [ सं. अहि + आर ]

**अहार**—पु. १ विस्तव; निखारा; फुंफाटा. २ इस्त्री करणें ( क्रि० देणें ). [ म. आहार=विस्तव; का. होळकु–पु=तेज ]

**अहारणें**—अक्रि. अति अन्न खाल्ल्यामुळें सुस्त पडणें; जेवण अंगावर येणें; सुस्ती येणें. [ सं. आहार=जेवण ]

**अहारणें**—अक्रि. १ निसटणें; बाहेर येणें; ओघळणें ( रहाटाची माळ ). २ खचणें, खालीं पडणें; आधार सुटणें ( इमारत, खांब, जमीन ). [ सं. आ+हृ ]

**अहारोळी**—स्त्री. निखाऱ्यावर भाजलेली पोळी, दामटी; आरोळी. [ अहार=विस्तव+पोळी ]

**अहालकार**—अहल्कार पहा.

**अहाली मवाली**—वि उच्चनीच, सर्व दर्जाचे ( लोक ). ' यावरी तमाम अहाली व मवाली परगणे मज्कूर व गिर्दनवाही जमीनदार हर कोणी लहान थोर सांगताती जे. ' –वाड सनदा १४०. [ अर. अहल् = लोक ]

**अहाळणी**—स्त्री. १ उष्ण वाऱ्यांनीं भाजणें, पोळणें. २ धाप; दम; उसासा. ३ ( ल. ) उत्कंठा; लालसा; हांव; वासना ( क्रि० देणें ). [ म. अहार; का. होळकु–पु=तेज ] **अहाळणी, अहाळण्या कहाळण्या टाकणें, देणें**–द्वेष, राग इत्यादि मनोविकारांना वाव देणें. दुःखोद्गार, शोकोद्गार काढणें.

**अहाळणें**—अक्रि. १ सूर्याच्या, अग्नीच्या झळीनें भाजणें–पोळणें–होरपळणें. २ नाश पावणें. ' सेजार अहाळ अहाळलें दिव्य भोगांचें। ' –भाए ८९. ' कामानळें जीव महा अहाळे। ' –सारुह १.६. ३ अतिशय दुःखित होणें–पीडणें. ' अहाळिली अवनी क्षत्रियांची। ' –एभा ४.२४३. [ म. अहार का. होळकु–पु=तेज प्रा. अहिऊल=जाळणें. का. हालु=नाश ]

**अहाळबाहाळ**—वि. फार; बहुत; अत्यंत. ' तो मी येथें अहाळबाहळीं कांपे। ' –ज्ञा ११.३५१. [ सं. बहुल; का. बाहाळा. बाहाळ द्वि. ]

**अहाळींव**—अहळींव पहा.

**अहि**—पु. सर्प. ' पाहुनि अजातरिपुची तादृक् गुरुचरणभक्ति, महिवरले। अहिवरलेखवरांहुनि बहु कठिनहि यवन वीर गहिवरले। ' –मोभीष्म १.११८. [सं.] ०**नकुळ न्याय**–पु. साप आणि मुंगुस यांच्यामधील जन्मजात वैराप्रमाणें वैर. २ (ल.) जन्मद्वेष; हाडवैर.

**अहित**—न. १ तोटा; नुकसान; हानि; अपाय; अकल्याण. –पु. २ शत्रु; वैरी; द्वेष करणारा. ' करितां सारथि मस्तक–कोदंड–च्छेद पौरवें अहितें। ' –मोभीष्म –वि. १ अकल्याणकारक; नुकसानीचें. २ शत्रुत्वाचें; वैराचें. [ सं. ]

**अहिनी**—वि. लोखंडी. ' अहिनी, दगडी जिन्नस दारूचे अंतरीं ठेवावे। ' –मराआ ३५. [ फा. आहनीन् ]

**अहिमही**—पु.विना. १ हे दोन पाताळांतील राक्षस अत्यंत पराक्रमी व बलाढ्य होते. रामानें यांना ठार मारिलें. यावरून २ (ल ) दोन जुळे वीर; जोडीचे पराक्रमी पुरुष. ' पण मराठेशाहीची मदार या दोघां अहीमहीवर आहे. ' –स्वप २१०.

**अहिरण**—ऐरण पहा. ' कीं अहिरणीं गुंततां हिरा। हिरकणी काढी तया सत्वरा। ' –नव १८.१३४. [ सं. अयस्+हन् तुल० इं. आयर्न. ]

**अहिरण-णी**—स्त्री. गुराखीण, गवळण. –वि. अहिराणी पहा [ सं. आभीर–अहीर ]

**अहिरा, अहेरा**—पु. १ डोळ्याचा एक रोग; बुबुळावर रक्ताप्रमाणें एक लाल ठिपका असतो तो. यास अर्जुन असेंहि म्हणतात. २ एक तांबडा कठिण दगड; डोळ्यांतील रोग बरा करण्यास हा अंगठींत बसवून डोळ्याच्या बुबुळावरून फिरवितात. याला अहिऱ्याचा खडा' म्हणतात. अंगठींत बसविण्याकरितां तयार केलेल्या खड्यास अहिऱ्याचा मणी किंवा त्या अंगठीस अहिऱ्याची मुदि असें म्हणतात. [ प्रा. अहरी=जात्याचा दगड ]

**अहिराणी**—स्त्री. एक खानदेशांतील भाषा. ही मराठीची पोट भाषा म्हणून मानण्यांत येते. हिच्यावर गुजराथीचा बराच परिणाम झालेला दिसतो. [ सं. आभीर–अहीर, एक राष्ट्र ]

**अहिरी**—स्त्री. १ लग्न-मुंजींत बोहल्याभोंवतीं उतरंडी रचायाकरतां उपयोगांत आणतात तीं रंगीत मडकीं; वही म्ह० लोटा घडतां येईना आणि अहिरीचा इसार. ' सोन्याची अहिरी। मोत्याचे कळसत्यावरी। रंगाचे परोपरी चारी। शोभा दिसतसे अहिरी। ' –स्त्रीगीत २२. ' बोलावा साळवी। अहिरी सांगावी। ' –स्त्रीगीत २२.

**अहिरी**—स्त्री. अहेर करण्यास योग्य वस्त्र. अहेराऊ पहा.

**अहिर्णेसी, अहर्निश-शीं**—क्रिवि. रात्रंदिवस; अहोरात्र. ' राम ध्यावा अहिर्णेसी। ' –वेसीस्व १.१४. [ सं. अहर्निश अप. ]

**अहिवा**—वि. अविधवा; सुवासिनी; सवाष्ण स्त्री. ' अहिवा नारी कुरवंडया करती। ' –बसा ३०. [सं. अविधवा] ०**नवमी**–स्त्री. अविधवानवमी पहा.

**अहिंसक, अहिंस्र**—वि. हिंसा न करणारा; हत्या न करणारा; कोणास न मारणारा. 'मित भाषण शांत दांत। अंगीं अमानित्व अदंभित्व । अहिंसक अतिविरक्त । तोचि गुरु करावा।' [सं.]

**अहिंसा**—स्त्री. १ हिंसेचा अभाव; केवळ मांसाकरतां जीवाची हत्या न करणें. अशा कारणांकरतां मनुनें हिंसा त्याज्य ठरविली आहे (मनु ५.४३.). शाकाहारव्रत. २ कोणत्याहि प्राण्याला इजा, दुखापत न करणें; रक्तपात न करणें; हें जैनांचें आद्य तत्त्व आहे. [सं.] ०**धर्म**–पु. प्राणिहत्या न करण्याचा धर्म. 'अहिंसा परमो धर्मः'

**अहिस्ता**—पु. संघव्यायामामधील एक (हिंदी) हुकूम. 'जोश कदमनें जात असतां लांबवर अडथळा होईल असें कांहीं असेल तर त्यांतून सावकाश जातां यावें म्हणून हा हुकूम देतात; सावकाश चालावयाचें असेल तरीहि देतात.' –संव्या २२. (इं.) स्टेप् शॉर्ट –ड्रिल [फा. आहिस्ता=सावकाश. (अप.) आस्ते]

**अही**—स्त्री. १ विस्तवाची–अग्नीची धग, आग. 'जठराग्नीची अही थोर।' –मुरंशु ४३३. २ उष्ण वारा; झळ; मृगजळ. (अव.) अह्या. [सं. अहि=सूर्य]

**अहीमुखी**—वि. ज्याचें तोंड सापासारखें आहे असा (घोडा).

**अहीर**—पु. १ गवळी; गवळ्याची जात. 'शिरे विषयवासना जशि शुका अहीरास भी।' –केका ५४. 'त्यामाजि बोध वृषभानु अहीर थाची। निर्मूनि भक्ति दुहिता तिस फार याची'–मंराधा ५. २ आभिर–गवळी जात. ही खानदेशांत व निजामशाहींत आढळते. हें पूर्वी मोठें राष्ट्र असून यांतील निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकांच्या जातींना पूर्वी हें राष्ट्रनाम लावलेलें आढळतें. जसें–अहीर सोनार, अहीर हलवाई. [सं. अहीर, आभीर]

**अहीर**—पु. १ अजगर; आर; अहार. २ गोड्या पाण्यांतील एक सापासारखा मासा; हा काळा असून याच्या अंगास चिकट बळस असतो. [सं. अहि=साप]

**अहीरभैरव**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गंधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर येतात. ह्याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम गानसमय प्रातःकाळ हा एक भैरवप्रकार आहे [सं.]

**अहूर**—पु. (कों.) नदीचा पूर. अऊर, और पहा.

**अहेतु, अहेतुक**—वि. ज्याला हेतु–कारण नाहीं असें; विनाकारण; अकारण; निष्काम. याच्या उलट सहेतुक. 'अहेतुकें चित्तें। अनुघ्रा पां ययातें।' –ज्ञा ३.९२. 'आमच्या देशांतील सुशिक्षित वर्ग स्वभाषेचा अहेतुक शत्रु बनला।' –टि ४.८९९. [सं.]

**अहेदी**—ऐदी पहा.

**अहेनवमी**—अविधवानवमी पहा.

**अहेर**—पु. लग्न, मुंज, गर्भाधान इत्यादि मंगल प्रसंगीं अथवा एखाद्याच्या सत्कारार्थ–अभिनंदनार्थ त्यास त्याचे इष्टमित्र, सगेसोयरे, नातेवाईक यांच्याकडून शेला, पागोटें वगैरे पोशाख, दागिना वगैरे जी देणगी मिळते ती. (सामा.) देणगी उपायन; बक्षिस. 'तैसें यागाचेनि नांवें। जग वाउनि हांवें। नागविती आघवें। अहेरावारीं॥' –ज्ञा १६.३८७. **म्ह०** अहेर चोळीचा आणि गजर वाजंत्र्याचा=लहान कृत्यास गाजावाजा जास्त या अर्थी. [सं. आ+हृ=हरण; आहरण=भूषण, अलंकार; तुल० फा. महर=स्त्रीधन]

**अहेरण**—ऐरण पहा. 'हिरा ठेवितां अहेरणीं। वांचे मारितां जो घनीं।'

**अहेरण**—स्त्री. सोनामुखीची एक जात. आयरण; ऐरण.

**अहेरा**—अहिरा पहा.

**अहेराऊ, अहेरी, अहीराऊ, अहीरी**—वि. १ अहेर करण्याच्या उपयोगी–योग्य (वस्तु, अलंकार इ०). २ टिकाऊ, पक्क्या रंगाचें नव्हे असें; कामचलाऊ; मामुली; दिखाऊ, [अहेर]

**अहेरावा**—(व) अहिरा (रोग) पहा. 'डोळ्यांत अहेरावा पडला.'

**अहेव**—स्त्री. अविधवा; सौभाग्यवती–सुवासिनी स्त्री. 'भर्तारेंवीण अहेव। जाण पां तो सर्व विटंबू।' –एभा १४.२५७. **म्ह०** अहेवचा मेला खेळायला गेला=नवरा असलेल्या बाईचा मुलगा मेला तर तो खेळायला गेल्यासारखाच असतो, कारण तिला दुसरा होण्याचा संभव असतो. २ सौभाग्य; भाग्य. 'ब्रह्मविद्येचें अहेवकांकण आज फुटलें।' –भाए ८५. 'परंतु हे मम सुखसार्थकता हेंच मदीय अहेव।' –टिक ४०. [सं. अविधवा; प्रा. अविहवा] ०**तंतु**–पु. (काव्य) मंगळसूत्र, सौभाग्यसूत्र. 'कृष्णमणी अहेवतंतु। कंठीं धरिला न तुटतु।'–एरुस्व ७.३६. ०**दोरा**–पु. १ मंगळसूत्र. २ नेहमीं पाठीस लागलेली नोकरी, उद्योग–धंदा; नेहमीं टिकणारा, कायमचा दर्जा, मान, पदवी. ०**नवमी**–अविधवानवमी पहा. ०**पण**–न. सभर्तृकत्व; पति जीवंत असण्याची स्थिति; सौभाग्य. 'वल्लभाचिया उजरिया। आपणया पति कुस्त्रिया। जोडोनि तोषिती जैसिया। अहेवपणें।' –ज्ञा १६.३७७. 'सौभाग्य नटोनि अहेवपण। ऐसी मिरवीत निघाली।' –भवि ३.२४७. 'राखें मजला अहेवपणीं। प्राणेश्वरातें सोडी पितया।' –गुच ७.३४. 'अहेवपणें हळद कुंकुममण्डित मरावें हीच इच्छा सर्व स्त्रियांची.' –भावबंधन ९३. ०**मणि**–पु. मंगळसूत्र. 'कीं अजय झाले रणीं। अहेवमणी।' –पला ४०.१०१. ०**मरण**–न. सौभाग्यवती असतां, पति जिवंत असतां, सवाष्णपणीं आलेलें मरण. हें स्त्रिया फार प्रिय व मंगलकारक समजतात. ०**सवाष्ण**–स्त्री. सौभाग्यवती स्त्री; सुवासिनी. ०**सुयेव**–वि. पति जिवंत असतांना मरण येत असलेली (स्त्री). [अहेव+असु+ई]

**अहो**—उद्गा. कोणाला मोठ्या गौरवानें किंवा बहुवचनीं संबोधून हांक मारावयाचा प्रयोग. अरेचें अव. कांहीं शब्दांपुढें यांतील अचा लोप होतो; जसें—कायहो—कांहो. २ आकस्मिक आनंद-आश्चर्य यांचा उद्‌गार. ०**जाहो**—अ. आदरपूर्वक बोलणें, हांक मारणें. 'कोणी थोर आला असतां त्यास अहोजाहो म्हणावें.' [ अहो+जा+अहो ]

**अहोदिवस**—क्रिवि. सर्व दिवसभर; रात्रंदिवस अहोरात्र शब्दावरून ( सं. अहस्=दिवस हा अर्थ न समजून ) केलेला चुकीचा प्रयोग. 'अहोदिवस अहोरात्र शास्त्राचें अध्ययन केलें तरी तें जास्त जास्त गूढ वाटणार' –नि ४६०.

**अहोपी**—वि. ( अहोदिन पान करणारा ). लोभी; आशाळभूत; अधाशी. [ सं. अह +पा ]

**अहोरातीं**—क्रिवि. रात्रंदिवस. 'राखें अहोरातीं निज भक्तां।' –एभा २०१३९; 'शेवा करी अहोरातीं।' –मुआदि ३०.४७ [ सं. अहस्+रात्रि ]

**अहोरात्र**—पुन दिवस आणि रात्र; चोवीस तासांचा, तीस मुहूर्तांचा किंवा साठ घटकांचा दिवस. पृथ्वीला आपल्या आंसाभोंवतीं प्रदक्षिणा करण्यास जो काल लागतो तो कालावधि. सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल. 'कां अहोरात्रींची गोंवी। आंधळें नेणें।' –ज्ञा १८.७१८. –क्रिवि. १ रात्रंदिवस. २ ( चुकीनें ) सर्व रात्रभर. [सं. अहस्+रात्रि] ०**वृत्त**–न. सूर्याच्या दैनंदिन गतीचें वर्तुळ–वृत्त, क्रांतिवृत्त, द्युज्यासमांतरवृत्त; ज्या वृत्ताची पातळी विषुवांशीं समांतर असून आकाशांतील ताऱ्यांतून जाते तें वृत्त. [ सं. ]

**अहोय**—उद्गा. ( खा. ) वारे वा! [ अहा ]

**अळ, अळई**—स्त्री. कीड; अळि पहा.

**अळई**—स्त्री. एक झाड. हें डोंगराळ प्रदेशांत होतें; उंची सुमारें पुरुषभर असून पानें, टाकळ्यासारखीं. यास 'ओवी' असें म्हणतात. गांठ किंवा उठाणू जिरण्यास याचा उपयोग करतात. –वगु १.३९.

**अळंकरण, अळंकार, अळंकारणें, अळंकारिक, अळंकारी, अळंकृत**—अलंकरण, अलंकृत पहा.

**अळका–अळंका**—वि. १ पाठीमागें लागलेला; धाधावलेला; वखवखलेला; ध्यास, छंद घेतलेला. उ० झोपेचा अळका, भुकेचा अळका. २ (ल.) अडक्या; पैशाचा दास. 'परि अळंकिया आंग वर्णे होऊनि ठेला।' –भाए ७१९. [ का. अळिपु; ह. का. अळकरियु=इच्छा करणें; म. आळ ]. –**केपण**–न. आसक्ति, आवड. अळकुवा पहा.

**अळकुटी**—वि. ( चांभारी धंदा ) जोडयाचा एक प्रकार [ अळकुट ]

**अळकुडी**—स्त्री. अळवाचा गड्डा, कांदा किंवा मूळ. [ अळूं+कुडें=मूळ ]

**अळकुवा**—वि. ( कों. ) आसक्त; गुंग झालेला; अतिशय प्रेम करणारा; लंपट; पाठीमागें लागणारा. अळका पहा.

**अळंग**—अलंग पहा.

**अळग, अळंग**—अलग पहा.

**अळगत**—अलगत पहा.

**अळगावणें**—अक्रि. १ व्यायला होणें; प्रसुति अवस्थेला येणें ( गाय, म्हैस वगैरे ). २ अलगणें पहा. [ सं. अलग्न. म. अलग ]

**अळगु**—क्रिवि. अलग; अळग; एकीकडे. 'मी उखेंडी जाय अळगु।' –भाए १४०. [ सं. अलग्न. म. अलग ]

**अळंगें**—न. गोणीच्या प्रत्येक आख्याच्या तोंडाला असणारा फांसा, कडी; यांतून गोणी आंवळण्यासाठीं तडकणी ओंवून घेतलेली असते. [ का. अळ=जोडणें किंवा आळि=वर्तुळ ? ]

**अळंगें विळंगें**—न. अव. आळोखे पिळोखे; अळे पिळे; ( क्रि० देणें ). [ सं. अलग्न+विलग्न. का अळुगु=कांपणें, हलणें. ]

**अळंटळं–टाळं–टाळी**—न.स्त्री. १ चेंगटपणा; चुकारपणा; ढिलाई, दिरंगाई, हेळसांड; हयगय, सुस्ती; सावकाशी; आळस; दुर्लक्ष. (क्रि०मांडणें–लावणें–करणें). २ टाळाटाळ; चुकवाचुकव; टंगळमंगळ; लांबणीवर टाकणें. 'यानें कामाची अळंटळं मांडली.' ३ अनिश्चितता; शंकास्पद स्थिति; मोघमपणा. 'त्याचें येण्याचें अळंटळं दिसतें.' –क्रिवि. दिरंगाईनें, हयगयीनें [ सं. अलं+तत्+अलं किंवा टाळंटाळणें द्वि ]

**अळण**—न. १ हरभऱ्याचें पीठ पाण्यांत शिजवून मसाला घालून कालवणाचा पदार्थ करतात तें; कालवण; पिठलें; ताक व हरभऱ्याचें पीठ लावून केलेली पातळ भाजी २ पातळ भाजी दाट होण्याकरितां तींत पीठ वगैरे घालतात तें; बेसन; आळण पहा. [ का. अळक=अर्धवट पातळ; सं. आ+लयन ? ]

**अळणट**—वि. थोडा अळणी. [ सं. अ+लवण+ट प्रत्यय ]

**अळणी**—वि. १ मीठ कमी असलेला; मीठ न घातलेला; मिळमिळीत. २ कमी प्रतीचें; ज्यांत सत्त्व, तेज, जीव, पाणी, रस, खोंच नाहीं असें (भाषण, सौंदर्य, लेख, शरीराची ठेवण, मुद्रा, चेहरा वगैरे ) खरमरीत किंवा कडक नव्हे असें ( भाषण ). ३ ( सामा. ) बेचव. म्ह० नावडतीचें मीठ अळणी. [ सं. अ+लवण; प्रा. अलोण; बं. आलुणी ]

**अळणें**—उक्रि. १ घट्ट, दाट करणें. २ घट्ट, दाट होणें ( दूध, पाक ). ३ सुकून, वाळून जाणें; रोड होणें; बारीक होणें; कृश होणें. 'उपवास करून तो अगदींच अळला आहे.' ४ वयांत येणें; यौवनावस्था येणें. ५ आटणें; आळणें पहा. [ का. अळक=अर्धवट घट्ट पातळ; सं. आ+लयन ? ]

**अळता**—पु. १ लाखेपासुन तयार केलेला तांबडा रंग. २ त्यानें भिजविलेला कापूस. [ सं. अलक्तक ]

**अळती**—स्त्री. ( कर्ना. ) माप. [ का. अळि=मापणें; अळति= माप ]

**अळंदें भळंदें**—न. पोळा नामक सणांत वापरण्यांत येणारा रांजण–घागर. [ का. अळिगे=रांजण ]

**अळपण-णें**—न. १ बांधण्यासाठीं घेतलेली कोणतीहि वस्तु; **निर्बंधन करणारी वस्तु**; बंद. २ ( ल. ) निर्बंध; नियमन; अडचण; **मोडता** ( एखाद्या कामांत. ) ३ (व.) ढोराच्या शेंपटास गुंडाळलेली चिंधी. [ का. अळपु. सं. आवलन, म. आवळणें याचा वर्णविपर्यास ]

**अळपणें**—उक्रि. जोरानें आंवळून बांधणें; घट्ट करणें; भोंवताली वेष्टून बांधणें. टीप–या क्रियापदाला, ज्या पदार्थानें बंधन करावयाचें त्या पदार्थाचा वाचक शब्द कर्म नसून जो पदार्थ बांधला जातो त्याचा वाचक शब्द कर्म असतो. याशीं संबद्धक्रियापद बांधणें उ० अळपून बांधणें.

**अळपा**—पु. १ बांधण्याकरतां घातलेला वेढा. (क्रि० घालणें–घेणें–देणें ). २ बांधण्याचें–वेष्टण्याचें साधन. ३ घट्ट बांधणें–वेष्टणें. ( क्रि० घेणें–देणें. )

**अळंप्रतीति**—स्त्री. तृप्ति; पुरेपणा; अलंप्रतीति पहा. ' तन्हि भोगितां आनंदावाप्ति। न पवती अळंप्रतीति।' –रास ४.१२२. [ सं. अलं+प्रतीति ]

**अळबळीत गळबळीत**—वि. १ साधा; मनमिळाऊ; घळघळीत; जुळतें, मिळतें घ्यावें अशा स्वभावाचा. २ निष्कपट; अनुकूल, प्रिय भाषण–बोलणारा. [ गळबळ द्वि. ]

**अळंबें-भें**—न. एक वनस्पती; कुत्र्याचें मूत; भुइछत्री; याचे दोन प्रकार–गोडें व विषारी, यानें अंमल चढतो, वांती होते जाती–चुडयें, चितळें, गवतें, कुवळें, करडी, तेलंगी, भुईफोड, मोगराळें. हें शीत, मधुर, त्रिदोषकारक, कफप्रद आहे. [ का. अळिबें ]

**अळंबो, ओळंबो**—पु ( गो. ) वाळवी; वाळिबे.

**अळमळीत, अळमळीतगुळमळीत, अळमळीत गुळमुळीत**—वि. १ मोघम; अनिश्चित ( भाषण ). २ मिळमिळीत; कडक, स्पष्ट नसणारें. ३ हयगयीचें;बिन कळकळीचें; टाळाटाळीचें; सुस्ताईचें ( काम–कृत्य ). [ गुळमुळीत द्वि. ]

**अळमाळु**—अळुमाळु पहा. ' तंव अळमाळु रूपु झळकलें ' –शिशु ४१

**अळमें, आळमें**—न. ( गो. ) अळंबें पहा.

**अळय**—अळवट पहा.

**अळव**—अळू पहा.

**अळवट**—स्त्री.(शती) नांगरलेली जमीन साफ करण्याचें हत्यार, साधन. [ का. हलिवे. सं. हल+वर्ती ? ]

**अळवंटण**—न. स्वयंपाकास लागणाऱ्या मसाला वगैरे जिनसांची पिशवी; पंचपाळें.

**अळवडी**—स्त्री. अळवाची वडी; अळवाच्या पानास पीठ लावून तळून केलेली वडी. [ अळू+वडी ]

**अळवण**—न. १ पातळ पदार्थ–भाजी दाट होण्याकरतां लावलेलें पीठ; अळण पहा. २ दाट होणें. घट्ट होणें; जमणें. ३ ( ल. ) उपासामुळें वाळणें, सुकून जाणें. ( क्रि० काढणें–घालणें–निघणें ) [ अळणें ]

**अळवण**—स्त्री. आळवण; अळविणें; गोंजारणी; समजूत. [ अळविणें ]

**अळवणी**—वि. अळणी. ' स्वल्प रूक्ष अळवणी।' –गीता २.२१४१.

**अळवणी**—वळवणी व अकाळवणी या दोन शब्दांबद्दल चुकीनें वापरतात.

**अळवंत**—स्त्री. बाळंत होत असतांना मृत झालेली पिशाचरुपी स्त्री; बाळंत स्त्रीचें भूत; हडळ; जखीण. [ सं. बालवती-बाळवंत ? ]

**अळविणें**—अळणें पहा.

**अळविणें**—उक्रि. १ समजूत घालणें, प्रार्थना करणें; प्रेमानें–लाडक्या शब्दानें वश करणें–मन वळविणें ( देव, राजा, वल्लभ, वल्लभा यांचें ); अंजारून गोंजारून, लाडीगोडीनें समजावणें (तान्ह्या मुलास वगैरे ); शांत करणें; सांत्वन करणें. ' आतां नाळवावें तुम्हीं मातें।' –ज्ञा २.८२. ' सद्भावें अळवुनियां पंढरीराया। केली काया ब्रह्मरूप।' २ विनवणी करणें; मिनतवारी करणें. ३ आलापणें; गायन करणें; मंजूळ स्वरानें, तालसुरावर गाणें ( राग, गीत, रागिणी, तान ). ४ हाक मारणें; बोलावणें. आळविणें पहा. [ सं. आलापन; प्रा. आलावण ]

**अळवी**—क्रिवि. सन्मुख. ' बीजे करितां चुकवी। न न्हायें दृष्टीचिए अळवी।' –ऋ ५०. [ प्रा. अल्लिअ=समीप जाणें ? ]

**अळवी**—स्त्री. ( कर्ना. ) धान्यरूपी कर्ज. [ का. अळवी=जमीन धारण करण्यासंबंधीं करार )

**अळवीण**—अळू पहा.

**अळव्यान**—वि. ( गो. ) करारबंद; करार केलेलें. [ का. अळवी ]

**अळशिकावणें**—क्रि. ( गो. ) लज्जा उत्पन्न करणें. [ अळशीक ]

**अळशी, अळस, अळसी, अळसावणें, अळा, अळाबांधा, अळीकर, अळीपाळीनें**—आमच्यें पहा.

**अळशी, अळसी**—स्त्री. जवस. ( इं. ) लिन्सीड. [ सं. अतसी–अडसी. प्रा. अलसी. का. अगशी ]

**अळशीक**—स्त्री. ( गो. ) १ लज्जा. २ घाण; घाणजागा. ३ आळशीपणा. **अळशीकणो**–वि. घाणेरडा. [ सं. आलस्य ]

**अळशी, अळाशी**—स्त्री. एक पेंढी–जुडी बांधतां येईल इतकें शेतांत कापून वाळत ठेवलेलें पीक; मूठभर रास. ( सामा. ) कापून

वाळत ठेवलेलें पीक. पाथरा व अळशी हीं एक नव्हत. [ अळा, आळा ]

**अळसंदा, अळसंदी**—पुस्त्री. एकप्रकारचें कडधान्य; मोठी चवळी; चवळीची एक जात. [ का. अळसंदी; गो. अळसांदो ]

**अळसिणी**—स्त्री. आळशी स्त्री. 'तेथें येकी अळसिणी असे।' –पंच ४.१६. आळशी पहा.

**अळापिळा**—पु. मुरडा; अळखाविळखा, पिरगळा (अंगाचा, वस्त्राचा इ०) (क्रि० देणें) [पिळा द्वि.]

**अळि**—पु. भ्रमर; भुंगा. 'कल्हारीं कुमुदोत्पळीं अळि शरत्काळीं जळीं गुंजती।' [सं. अलि] ०**उळ**–पु. भ्रमरांचा समुदाय. –एभा ५.५५५. 'भक्त अळिउळ आलापवी स्वरें।' [सं. अलिकुल]

**अळिका**—स्त्री. अळी; कीड. 'कीं अळिकेवरी द्विजराज।' –राम २७.८१. [सं. अलीक=क्षुद्र, अति लहान. का. आळि=वर्तुळ, वेटोळें. म. अळें ]

**अळिता**—अळता पहा. 'रंग पिळुनि अळिता जणु देति फेंकुनी।' –मृ ४२.

**अळी**—स्त्री. १ धान्य इत्यादिकांत बारीक तंत्वाकार क्षुद्र जीव–कीडा उत्पन्न होतो तो; किड. [सं. अलीक. का. आळि=वेटोळें ]

**अळी**—स्त्री. वोळ; गल्ली; लहान रस्ता. [सं. आलि=रांग, ओळ] ०**कर**–वि. शेजारी; जवळचा. ०**न वळीचा**–शेजारचा, आळींतला नव्हे असा; लांबचा; दूरचा. कांहीं संबंध नाहीं असा.

**अळी**—स्त्री. छंद; रळी; हट्ट. [का. अलु=रडणें] ०**कर**–वि. छांदिष्ट; हट्टी.

**अळी**—स्त्री. अळें १ व ३ पहा.

**अळीपिळी**—स्त्री. १ (दोरीचा–वस्त्राचा) वळसा; वेढा. अळापिळा पहा. (क्रि० देणें–घालणें–खाणें–येणें–पडणें). [पिळा द्वि.]

**अळीमिळी गुपचिळी**—स्त्री. कांहीं न बोलणें; गप्प बसणें. (लहान मुलांच्या खेळांतील शपथ). 'यावेळीं अळीमिळीगुपचिळी हें वेदसूत्र आठवतें ना? या वेळीं आधीं बोलेल त्यानें भांडीं घासावीं' –हाच मुलाचा बाप. ०**घालणें**–न. बोलण्याची शपथ घालणें, ताकीद करणें.

**अळींव**—वि. १ आटवलेला; दाट केलेला (रस, पातळ पदार्थ). २ प्रौढ झालेला; वयांत आलेला (मनुष्य, देह). [अळणें]

**अळु**—वि. किंचित्; थोडें. 'नसे अळुहि प्रपंच लालची।' –दावि ११८. [सं. अणु]

**अळुकी**—स्त्री. आवड; भूक; प्रीति. अळका पहा. –वि. भुकेलेला. [का. अलुगु=प्रेम करणें.]

**अळुकैलें**—वि. भुकेलेलें. अळका, अलुका, आलुकणें पहा.

**अळुमळु, अळुमाळ, अळुमाळु**—वि.क्रिवि. १ (काव्य) थोडें थोडें; अल्प; किंचित्. 'मुख माखिलेंसें अळुमळु' –कृष्णाची भुपाळी १८. 'मजही दर्शन दिधलें अळुमाळ। घातला कवळ मुखामाजीं.' –ब ३०. –अमृ २.३०. 'हा आतपुही अळुमाळु।' –ज्ञा ६.१७५. (विशेषतः कृत्याविषयीं) क्षणभर; लहानसें; कमी. 'अळुमाळु प्रकाश करी। तेतुलेंनेच उभारू धरी।' 'म्हणुनि आतां पुसों अळुमाळुसे। मग करूं दैवा ठाकें जैसें' २ परिपूर्ण; ओतप्रोत; विस्तारानें. 'हाडांच्या अळुमाळ डोलति गळां माळा, कटीं कांबळा।' –आता १२. 'अंगीं तारुण्य प्रबळ। शृंगार केला अळुमाळ।' –कथा १.६.५३. ३ हळु हळु. ४ किंचित् देखील; अणुमात्र. 'जैसें तीर्थ आणि जळ॥ भिन्न नसेचि अळुमाळ।' –भवि १२.११६. [सं. अणुमात्र]

**अळू**—पु. एक फळ झाड. याचें फळ तपकिरी रंगाचें असतें. [सं. आलु]

**अळूं**—न. एक शाक भाजी; याच्या निरनिराळ्या जाती–राजाळूं, धांवअळूं, काळेंअळूं, पानअळूं, रुखअळूं, मुंडलेंअळूं, रानअळूं (तेरी). काळेंअळूं उत्तम असून अग्निदीपक, रक्तपित्तीचा नाश करणारें, बलवृद्धिकारक आहे. **म्ह०** अळवाची खाज अळवास ठाऊक=ज्याची चिंता त्यास ठाऊक. **अळवाची देंठी**–स्त्री. अळवाच्या देंठ्यांचें दह्यांतील रायतें. **अळूवडी**–स्त्री. अळवाच्या पानांची तळून केलेली भाजी. शिवाय गाटी, कोरडी भाजी, ताकाचें अळूं इ० पदार्थ अळवाचे करतात **अळवावर अंचविणें**–उपकाराची जाणीव नसलेल्या माणसावर उपकार करणें (अळवाच्या पानावर पाणी टिकत नाहीं यावरून) **अळवावरचें पाणी**–(अळवाच्या पानावर पाणी ठरत नाहीं यावरून ल.) क्षणभंगुर; अशाश्वत; चंचल; अस्थिर (लक्ष्मी–देह–वस्तु–मन इ०) [सं. अलुक; गुज. अळवी, अळू, हिं. आलु, व. धोपा ]

**अळें**—न. १ वृक्षाच्या बुंध्याशीं पाणी सांचण्याकरितां केलेला खळगा; माती, चुना यांचा चिखल–रद्दा करण्याकरितां केलेली खळी; भोंपळा, पडवळ इत्यादींचीं बीजें रुजविण्याकरितां व पाणी ठरून राहण्याकरतां केलेला मातीचा उंचवटा. **अळेवाफे**–भोंपळा, दोडका, इ० वेल लावण्यासाठीं केलेलें अळें वगैरे. 'काय? यंदां अळेवाफे कांहीं लावलेस कीं नाहीं?' २ वांगीं, मिरच्या इ० कांचें खळींत एकेक लावलेलें रोप. अशांच्या समुदायांना दंड म्हणतात. ३ एक कुळव. इतर प्रांतांत डिफळा असा प्रचार आहे. (नांगरल्यानंतर मातीचीं डिफळें फोडण्याचें साधन). [सं. आलवाल. तुल० का. आळि=वर्तुळ.]

**अळें**—न. किंमत, वजन, मापदर्शक दुय्यम परिमाणाच्यामागें प्रथम परिमाणाचा अभाव अगर त्यापासून भेद दर्शविणारें चिन्ह. उ० २८३; २८३; दोन रुपये तीन आणे. ५८३८८ पांच खंडी, तीन मण आठ शेर. ८३।४ सवातीन मण चार शेर.

**अळेण, आळेण**—न. (गो) अळण; तांदुळाचें पीठ. [अळणें]

**अळेदांडी, अळेपिळणें**—स्त्री. न. गाडीचा अगडा (जूं आणि दांडीची दोरी) नीट पिरगाळून घट्ट आंवळण्याकरितां ज्या लांकडाच्या दांडक्याचा उपयोग करतात तें. [अळणें+दांडी—पिळणें]

**अळेपिळे, अळोके पिळोके, अळुके पिळुके**—पु अव. **अळ्यापिळ्या**—स्त्री. अव. अळापिळा पहा. 'अळेपिळे अंगासीं देत। हिंडे क्षुधातृषापीडित।'

**अळेंबळें**—क्रिवि. कसें तरी, संकटानें; प्रयासानें, जबरीनें; जुलमानें; जेमतेम; होय नाहीं करतां, रडतकढत. 'म्यां अळेंबळें दोन घांस खाल्ले.' [बळें द्वि]

**अळोंचो मळोंचो, अळोंचो पाळोंचो**—लहान मुलांचा एक खेळ. दोन मुलें एका मुलाला दोन्ही कांखेंत धरून झोंके देतात तेव्हां हें गाणें म्हणतात. [का. अलुगु, अलुगु=हालणें. सं. पर्यंक= प्रा. पलिअंक—पलंख—पालख—पाळणा द्वि.]

**अळोणी**—अळवणी पहा.

**अळ्य**—स्त्री. (गो.) १ अळें (गणितांतील). २ शेत साफ करावयाची फळी. [अळें]

**अक्ष**—पु. १ फांसा (सोंगट्या खेळण्याचा). उ० अक्षक्रीडा; अक्षकुशल. २ (ल.) द्यूत. 'हे दुर्दशा बरी कीं पूर्ति असे कीं न अक्षतृष्णेची.' —मोसभा ५.३२. ३ माळेंत घालण्याचा मणि; रुद्राक्ष.

**अक्ष**—पु. १ (ज्यो.) दीर्घ वर्तुळाचा व्यास. २ विशिष्ट स्थलाचें विषुववृत्तापासून अंतर; अक्षांश. ३ (गणित) ज्या काटकोन त्रिकोणाच्या फिरण्यानें शंकु तयार होतो त्याच्या स्थिर राखिलेल्या बाजूला त्या शंकूचा अक्ष म्हणतात. —महमा १२. [सं. लॅ. इं. ॲक्सिस; ग्री. ॲक्सॉन; जर्म. अक्से; लिथो. ॲस्सिस; फ्रेंच. जिप्सी. अकेस]

**अक्ष**—पु. नेत्र; डोळा. [सं. अक्षि]

**अक्ष**—न. (गो.) आरोप; जबाबदारी, खापर; अपेश. अकस पहा. [अर. अक्स्]

**अक्ष**—पु. कपाळावर एकावर एक असे दोन भोंवरे असणारा घोडा.

**अक्षई**—क्रिवि. सर्वकाळ; नेहमीं वारंवार. 'अक्षई पदाचें अधिष्ठान।' —वेसीस्व १.९. [सं. अक्षय]

**अक्षक**—न. १ (शारीर) गळसरीचें हाड; जत्रु. २ (प्राणि) पक्ष्यांच्या पंखांतील हाडांतील कांब; मणिबंधास्थि. [इं. रेडियस]

**अक्षकर्ण**—पु. (ज्यो.) अक्षक्षेत्राची कर्णरेषा; पलकर्ण.

**अक्षक्रीडा—अक्षद्यूत**—स्त्रीन. फाशांनीं सोंगट्या खेळणें; पण लावून फाशांनीं सोंगट्या खेळणें; द्यूत. [सं.]

**अक्षज्या**—स्त्री. (ज्यो.) अक्षांशाची ज्या; पलज्या. [सं.]

**अक्षत**—स्त्री. १ अभिमंत्रित केलेले किंवा अभिमंत्रित करण्यासाठीं घेतलेले तांदूळ; लग्न, मुंज इ० समारंभांत प्रधानभूत व्यक्तींच्या डोक्यावर टाकण्याकरतां, देवतांच्या कपाळीं लावण्याकरतां, किंवा लग्न, मुंज इ० चें आमंत्रण देण्याकरतां घेतलेले तांदूळ. २ लग्न—मुंज प्रसंगींच्या आमंत्रणाकरतां मिरवणूक निघते ती (देवास आणि शिष्ट लोकांस अक्षत देण्यासाठीं). ३ कपाळीं लावलेल्या गंधांत काळ्या रंगाचा जो टिकला लावतात तो किंवा तें गंध. ४ (सामा.) तांदूळ. **वाप्र**—वाटाण्याच्या अक्षता लावणें=साफ नाकारणें; (वाटाणे वाटोळे असल्यामुळें कपाळास चिकटून रहात नाहींत म्हणून). **अक्षत काढणें—फिरविणें—निघणें**—समारंभाचें निमंत्रण करण्याकरतां मिरवणूक निघणें. **अक्षत टाकणें**—१ एखाद्या धरावर अक्षत टाकून आंतील लोक काय बोलतात तें ऐकणें. हा एक शकुन पाहण्याचा प्रकार आहे. २ (देवावर) पूजेकरतां आव्हान केलेल्या देवतेचें विसर्जन करणें. ३ एखाद्या गोष्टीवरील सत्त्व सोडून देणें. ४ लग्नांत वधूवरांवर तांदूळ टाकणें; लग्न लावणें. 'अक्षत टाकिली जैसी। मांदियेवरी।' —ज्ञा १८.७२३. **अक्षत देणें**—विवाहादि समारंभास निमंत्रण करणें. **अक्षत घेणें**—निमंत्रणाचा स्वीकार करणें. **डोक्यावर अक्षत(ता)पडणें**—विवाह होणें. **०टाकणें**—लग्न लावणें, करून देणें. **तांडावर अक्षत पडणें**—मनसोक्त, वाटेल तसें बोलणें. **अक्षत भरणें**—ओंस भरणें. 'अक्षत भरिली भाणा। दुजा ब्राह्मण मेहुणा। आला होता पाहुणा। स्त्रियेस मूळ।' —दा ३.३.१०. **अक्षत लावणें**—(घरास, चुलीस) घरांतील सर्व माणसांस, कुटुंबास भोजनास बोलावणें केल्यामुळें चूल न पेटविणें. **अक्षत लावणें**—(वेशीस) गांवभर—सर्व लोकांस आमंत्रण करणें. **अक्षत लावणें**—१ भाकीत करणें. २ गुंतवून घेणें; प्रयुक्त होणें. **अक्षत वाहणें**—(मूर्तीवर) अभिमंत्रित तांदूळ देवावर टाकणें—वाहणें. **म्ह०** या या माझ्या कपाळाच्या अक्षता पहा=दुसऱ्याला विनाकारण हांक मारणाऱ्या किंवा बोलावणाऱ्या मनुष्याबद्दल रागानें म्हणतात. **वरतीं अक्षता, मध्यें गोपीचंदन खालीं रक्षा** (अंगारा)—तोंडाशीं हिरवा, मध्यें गोपीचंदनासारखा मऊ व तळाशीं रक्षा झालेला असा भात; चांगला न शिजलेल्या भाताचें विनोदप्रचुर, खुबीदार वर्णन. वैष्णवीभात पहा. —वि. १ अभंग; इजा न झालेला; शाबूत; धडधाकट; सबंध. 'अक्षतधनु तोंवरि हें वीरशिरोरत्न नावरायाचें' —मोद्रोण ३.१२१. २ पतिसमागम न झालेली (स्त्री); तीन पुनर्भूंपैकी. पुनर्भू पहा. अनुपभुक्त स्त्री. [सं. अ+क्षत]

**अक्षतमरिष्ट**—क्रिवि. अडथळा न येतां; अप्रतिहत; अव्याहत; संकट, विघ्न न येतां; बिन हरकत. 'आमची वृत्ति पांचशें वर्षें

अक्षतमरिष्ट चालत आली आहे.' 'तुमची संपत्ति अक्षतमरिष्ट असो.' [सं. अक्षतं+अरिष्टं. 'अक्षतमरिष्टं चास्तु' या ब्राह्मणपूजन विषयक मंत्रावरून']

**अक्षतय**—स्त्री. (गो.) अक्षयतृतीया.

**अक्षतयोनी**—वि. १ पुरुषाशीं संग न घडलेली, अनुपभुक्त (स्त्री); बालविधवा; कुमारी, अविद्धयोनि [सं.]

**अक्षता**—अक्षत पहा.

**अक्षतारोपण**—न. कंकणें बांधिलीं गेल्यावर वधुवरांचें आयुष्य वाढविण्याच्या उद्देशानें वधूवरांनीं एकमेकांच्या डोक्यावर अक्षता टाकण्याचा विधि. [सं.]

**अक्षतिज**—स्त्री. अक्षय तृतीया. 'नवशिके टाउके बेसुर। चाल बदलून गाती टौर। घरोघरीं वाजविती डौर। जशी अक्षतिजेची गौर।' —पला १५.

**अक्षतृतीया**—अक्षयतृतीया पहा.

**अक्षतेचें खोड**—न. काळें गंध लावण्याकरितां उगाळावयाचें लांकूड; टेंभुर्णीचा नार; काळया टाकळीचें मूळ

**अक्षभा**—स्त्री. (ज्यो.) पलभा पहा.

**अक्षम**—वि. १ उतावीळ; असहनशील. २ मत्सरी; हेवेखोर. ३ खुनशी; दया न करणारा. [अ+क्षमा]

**अक्षम**—वि. पंगू; दुर्बळ; असमर्थ; अशक्त; व्यंग असणारा; (आंधळा, लुला, इ०) 'अक्षमें आणि संन्यासिलें। कां निरिधन आणि विझालें।'—ज्ञा १३.२७९. 'क्रोधें धरिल्या अक्षमा। अक्षम होती साधनें।' —मुआदि ७.९८. [सं. अ+क्षम]

**अक्षमा**—स्त्री. १ उताविळपणा, असहनशीलता; अविवेक; अधीरपणा. २ क्षमेचा अभाव; क्षमा न करणें. ३ मत्सर; हेवा. [अ+क्षमा]

**अक्षमाला**—स्त्री. रुद्राक्षांची माळ; मण्यांची माळ, जपमाळ.

**अक्षमी**—वि. १ क्षमेस अयोग्य २ असमर्थ. 'केवि गति लाहिजे अक्षमी।' —क. ७. [सं.]

**अक्षय, अक्षय्य**—वि. १ अविनाशी; अनश्वर; नाश न पावणारा; ऱ्हास न पावणारा; नित्य; शाश्वत. 'क्षय पावती इंद्र चंद्र। कृष्ण नरेंद्र अक्षयी।' —एरुस्व १.७८. २ कधीं न सरणारा; कमी न होणारा; निरंतर असणारा. उ० अक्षय भाता=नेहमीं बाणांनीं भरलेला असा भाता. '.. माझें धनुष्य। अक्षयभाते विशेष। वरद शस्त्रें अणावीं।' ३ (व्याप.) नित्य, नेहमीचें; निरंतर. 'आमचें राहणें ह्या गावांत अक्षय असतें तर घर बांधलें असतें.' —पु. क्षयाचा अभाव; अविनाशित्व. [सं. अ+क्षय]

**अक्षयतृतीया**—स्त्री. वैशाख शुद्ध तृतीया; कृतयुगाचा आरंभ दिवस. ह्या दिवशीं केलेल्या जप, होम, तर्पण, दान वगैरेंचें फल अक्षय टिकणारें असतें. [सं.]

**अक्षयत्व**—न. अविनाशित्व; अमरत्व. 'जेणें जोडे जीविता। अक्षय्यत्व।' —ज्ञा १८.९८६. [सं.]

**अक्षयवट**—पु प्रयाग (अलाहाबाद) येथें गंगा व यमुना यांच्या संगमाजवळ असलेला एक वटवृक्ष. हा फार प्राचीन असून कधीं मरत (वठत) नाहीं असें सांगतात. अशा नांवाचे वृक्ष इतर क्षेत्रांतूनहि दाखवितात.

**अक्षयवाण**—न. दीर्घायुष्य व समृद्धि प्राप्त होण्याकरितां सुवासिनी स्त्रिया ब्राह्मणांना जें वायन (नारळ, वस्त्र, तांदूळ इ०) देतात तें. 'अक्षय वाणें घेऊनि। धांवती नगरीच्या गौळिणी।' —ह ८.३१. [सं. अक्षय+उपायन—वायन=वाण]

**अक्षयवीट**—स्त्री. विठोबाच्या पायाखालची वीट. 'अक्षयवीट चरणतळवटीं।' —विठ्ठलाची भूपाळी २८.

**अक्षयसुख**—न. चिरकाल सुख; ब्रह्मानंद; ब्रह्मसुख. [सं.]

**अक्षयीं**—क्रिवि. १ नेहमीं; सतत; सदांसर्वकाळ; कधीं न चुकतां; कधीं न टळतां. २ सबंध, अशेषतः; सबंधच्या सबंध; यच्चयावत. ३ (निषेधार्थी) मुळींच; अगदीं. [सं. अक्षय]

**अक्षय्य**—अक्षय पहा. उ० अक्षय्यतृतीया, अक्षय्यत्व; अक्षय्यवट. [सं.]

**अक्षर**—न. १ वर्णमालेंतील वर्ण किंवा मातृका. २ ज्यांचा पूर्ण उच्चार होतो असे वर्ण; शब्दावयव. (इं.) सिलेबल. ३ (ल.) विद्या; विद्वत्ता; अध्ययनसंपत्ति. 'अक्षर नाहीं चातुर्य नाहीं मग प्रतिष्ठा कशानें होईल' ४ ब्रह्म. 'मग वेदांतें परापर। प्रसवतसे अक्षर।' —ज्ञा ३ १३६. ५ अव्यक्त प्रकृति. —गीर,१५८. ६ लेख (पत्र, दस्तऐवज). —वि. अविनाशी; नाशरहित; शाश्वत; अव्यय; कूटस्थ; अव्यक्त. 'अक्षयो मी अक्षरु।' —ज्ञा १८.११९३; 'सर्व भूतें क्षर म्हणती। अक्षर कूटस्त बोलिजे।' —दा १०.१०.४५. [अ+क्षर] ०**ओळख**—स्त्री. १ अक्षरांची, मूळाक्षरांची ओळख· ज्ञान. २(ल) लिहितां—वाचतां येणें. ०**जीवी** (अक्षरोपजीवी)—वि. १ विद्येवर उपजीविका करणारा २ लेखक किंवा कारकून. ०**न्यास**—पु. अक्षरांची मांडणी.शुद्धलेखन,शब्दांतील प्रत्येक अक्षर स्पष्ट मांडणें. ०**पद्धति**—स्त्री. शब्दांतील अक्षरांची रचना; अक्षरन्यास. ०**परिभाषा**—१ लिहिण्याची धाटणी. २ विशिष्ट अक्षरांना विशिष्ट किंमत देऊन लिहिण्याची पद्धति. ०**माला**—स्त्री. वर्णमाला. ०**मुष्टिकाकथन**—न. मनांतील अक्षरें सांगणें; मुठीमध्यें कोणता पदार्थ आहे हें सांगणें. ०**वटिका**—स्त्री. १ स्पष्ट वर्णोच्चार; शब्दांचा शुद्ध व स्पष्ट उच्चार करण्याची पद्धति. २ अक्षरांचें वळण. [अक्षर+वर्तिका]. **अक्षरशः, अक्षरागणिक**—क्रिवि. प्रत्येक अक्षर घेऊन; प्रत्येक अक्षराचा उपयोग करून. 'या कूट श्लोकाचा अर्थ मला अक्षरशः लागत नाहीं.' ०**शत्रु** ०**शून्य**—वि. अशिक्षित; निरक्षर;

अज्ञ; मूर्ख. ' एखादा अक्षरशत्रु हमाल असो किंवा कवींचा कवि असो दोघांचाहि श्रीगणेशा एकच ' –एकचप्याला.

**अक्षरारंभ**—पु. सुमुहूर्तावर लहान मुलांस मूळाक्षरें शिकविण्याचा आरंभ; विद्यारंभ. [ सं. ]

**अक्षरी**—वि. १ अक्षरासंबंधीं. २ अक्षरांनीं लिहिलेली (संख्या). ३ वार, नक्षत्र इत्यादिकांचे ज्ञापक अंक न घालतां त्यांचीं आद्याक्षरें घालून केलेलें ( पंचांग ). [ सं. अक्षर ]

**अक्षरेषा**—स्त्री. ( गणित ) समीकरणलेखनांतील मूळ रेषा; निर्णयरेषा; मापनरेषा. ( इं. ) ॲक्सिस.

**अक्षवण-वाण, अक्षवाणी**—नस्त्री. १ मंगलप्रसंगीं पुष्कळ वाती लावलेला दीप (घरचा यजमान किंवा देवता यांच्या भोंवतीं) ओवाळतात तें; संकटें, अरिष्टें नाहींशी करण्याचा हा विधि आहे. ' कौसल्यात्मजा रघुवीरा। अक्षवाणें केलीं ' –वेसीस्व ८.६. ' राया जनकाच्या वन्हाडिणी। रामा केली अक्षवाणी। '–वेसीस्व ९.३२. २ मूल वगैरेस न्हाऊं घालतांना अखेरीस पाणी ओवाळतात तें, औक्षण; अरिष्टें टाळण्याचा आणि दीर्घायुष्य चिंतण्याचा यांत हेतु असतो. [ सं आयुष्यवान ; म. औक्षण ]

**अक्षवलन**—न. ( ज्यो. ) क्रांतिवृत्तीय स्थानावरून ध्रुव व समबिंदु यांवर जाणाऱ्या चापामधील कोण. [ सं. ]

**अक्षविचलन**—न. ( ज्यो. ) अंडाकृति पृथ्वीवरील चंद्रसूर्याच्या विषम आकर्षणामुळें खगोलीय ध्रुवाचें त्याच्या मध्यम. स्थितीसभोंवतीं जें भ्रमण होतें तें. [ सं. ]

**अक्षविक्षेप**—पु. फांसे टाकणें; द्यूत खेळणें; अक्षक्रीडा. [ सं. ]

**अक्षवृत्त**—न. विषुववृत्ताशीं समांतर वृत्त; ह्यावरून आपणांस एखाद्या स्थलाचे अक्षांश समजतात. अक्षांशवृत्त; (इं.) पॅरलल ऑफ लॅटिट्यूड. [ सं. ]

**अक्षसूत्र**—न. रुद्राक्षांची माळ. –एभा २३.५२०.

**अक्षहृदय**—न. द्यूतक्रीडाज्ञान; फांशांचें अंतरंगज्ञान. [ सं. ]

**अक्षक्षेत्र**—न. ( ज्यो. ) ज्यांतील एक कोण अक्षांशतुल्य आहे असा काटकोनत्रिकोण.

**अक्षांति**—स्त्री. १ उतावीळपणा; असहनशीलता; असहिष्णुता; अक्षमा. २ दुसऱ्याच्या विजयाचा, वैभवाचा, वर्चस्वाचा मत्सर; हेवा; असूया. [ सं. ]

**अक्षारलवण**—न. १ सूतकांत किंवा व्रतस्थवेळीं खावयाचें अन्न (मीठ वगैरे शिवाय–अळणी), जसें गाईचें दूध, तूप, तांदूळ इ०. २ असें ( अळणी ) अन्न खावयाचें एक व्रत. [ सं. अ+क्षार+लवण ]

**अक्षांश**—पु. ( ज्यो. ) दोन्हीं ध्रुवांपासून ९० अंश अंतरावर काढलेलें जें भूविषुववृत्त, त्यापासून खस्थलापर्यंत जें गोलीय लंबरूप अंशात्मक अंतर तें: विशेषस्थळीं ओळंब्याचा ( किंवा भूत्रिज्येचा ) विषुवाशीं जो कोन होतो त्याचा अंश. ( इं. ) लॅटिट्यूड. **०वृत्तें**–न.अव. विषुववृत्ताशीं समांतर अशीं, त्याच्या दक्षिणेस व उत्तरेस काढलेलीं वर्तुळें. [ सं. ]

**अक्षि**—पु. नेत्र; डोळा. सामाशब्द–अक्षिगोचर, अक्षिमीलन, अक्षिपात, अक्ष्युन्मीलन. [ सं. अक्षि; लॅ. ओक्यूलस्; ग्री. ओकोस; झें. अश्नि. ]

**अक्षिकूटक, अक्षगोल-क**—पु. डोळयाचें बुबूळ. [ सं. ]

**अक्षिकोश**—पु. डोळे ज्यांत बसविले आहेत तो खोल भाग; डोळ्याची खांच. [ सं. ]

**अक्षितारा**—स्त्री. डोळ्याची बाहुली. [ सं. ]

**अक्षिपटल**—न. डोळयावरील कातडें–आवरण. [ सं. ]

**अक्षिव**—न. समुद्राच्या पाण्यापासून झालेलें मीठ. [ सं. ]

**अक्षी**—क्रिवि. अक्शी पहा. ' अक्षी लई छान ! '

**अक्षीवक्षीच्या वाती**—स्त्री. ( कर्ना. ) एक प्रकारचें व्रत; ज्या स्त्रीला भावंडें असतात ती तुलसीविवाहाच्या दिवशीं वाती करून देवापुढें लावते. [ अक्षय ]

**अक्षीर, अशीर**—वि. ( गो. ) अरुंद. [ अ+शिरणें ]

**अक्षुण्ण**—वि. १ इजा न झालेला; अखंड; न झिजलेला; न वापरलेला. २ ( ल. ) अस्पृष्ट; अक्षत; अभुक्त; बिनवहिवाटीचा. **०मार्ग**–पु. १ न वापरलेला रस्ता. २ थोडासा केलेला अभ्यास; थोडीशी पढलेली एखादी विद्या. [ सं. ]

**अक्षे**—अक्षय पहा. [ अक्षय अप. ]

**अक्षेप**—पु. ( प्र. ) आक्षेप; संशययुक्त पृच्छा; शंका; हरकत.

**अक्षै**—अक्षयीं पहा. ' ऐसा जो विरळा संत। अवघ्यां वेगळें मत। अक्षै ज्याचें। ' –दा ५.२.३८. [ अक्षय अप ]

**अक्षो**—स्त्री. ( गो. ) तागाचें बीं; सणबिया.

**अक्षोट-ड**—अक्रोट–ड पहा. [ सं. अक्षोट ]

**अक्षोभ**—वि. १ फार खोल; ज्याला अंत–ठाव नाहीं असें; अगाध; अथांग ( पाणी ). ' वरी उदकासी नाहीं अंतपार। अक्षोभ सागर भरलासे॥ ' –तुगा ५१. २ स्थिर; शांत; खळबळ नसणारें. ' तेंचि निर्झर कां अक्षोभ जळ। '–एभा २१.११९. [सं. अ+क्षुभ् ]

**अक्षोभनरक**—पु. या नांवाचा एक अत्यंत खोल नरक. [सं.]

**अक्षोभ्य**—वि. अक्षोभ; क्षुब्ध न करतां येण्यासारखा; खवळतां न येण्यासारखा; शांत; सौम्य; गंभीर; न रागावणारा ( स्वभाव, खोल पाणी ). [ सं. ]

**अक्षौणी, अक्षौहिणी**—स्त्री. १ गज २१८७०, रथ २१८७०, घोडे ६५६१०, पायदळ १०९३५० इतकें मिळून होणारें सैन्य. ' आंगवणा करावेआं खोंचणी। वेठिलिआं बत्तीस अक्षौणी। ' –शिशु १०३५. ' तीन कोटि म्लेंछ त्याचे। तेवीस अक्षौहिणी

दळ मागधांचें ।' –ह २२.१४७. २ एकावर एकवीस शून्यें दिलीं असतां जी संख्या होते ती. [ सं. ]

**अक्ष्वण**—न. ओवाळणें; अक्षवण पहा.

**अज्ञ**—वि. अजाण; विद्या नसलेला; मूर्ख. [सं. ]

**अज्ञात**—वि. १ माहीत नसलेला. २ ( क्र. ) अजाण; अज्ञ. ३ जो कोणाला आकलन झाला नाहीं असा ( परमेश्वर ). 'अज्ञातानें घालुनि दिधली चक्रें तीं चुकविणें ।'–विवि. डिसेंबर १९२२. **०पातक, ०पाप**–न. अज्ञानामुळें किंवा नकळत घडलेलें पाप. **०पूर्व**–वि. १ पूर्वी माहीत नसलेला;पूर्वी न घडलेला. २ अगदीं नवीन; विलक्षण; अपूर्व. **०यौवना**–स्त्री. अजाण; अल्लड; वयांत न आलेली कुमारी; बालिका; तारुण्य (विकार) प्राप्त न झालेली स्त्री. **०वास**–पु. गुप्तपणानें, एकांतांत राहणें, कोणाला उमगूं न देतां राहणें; दूर राहणें. **०हत्या**–स्त्री. न कळत–अजाणतेपणीं झालेला खून, हत्या. [ सं. अ+ज्ञा=जाणणें ]

**अज्ञातता**—स्त्री अज्ञान; अविकल्प भाव. [ सं. ]

**अज्ञान**—न. १ ज्ञानाचा अभाव; अजाणतेपण. 'नेणे जीव तो अज्ञान ।' –दा ११ १.३४. २ निरक्षरता; अशिक्षितता. ३ मोह; भ्रमात्मक ज्ञान 'सर्पविषयक भ्रमाचें रज्जुविषयक अज्ञान कारण' 'मी करतों, मी लोकांचें चालवितों इत्यादि अज्ञानामुळें जीव मानतात. वस्तुत पाहिलें असतां ईश्वर करतो–चालवितो.' ४ तारतम्यबुद्धीचा अभाव; असमंजसपणा; समज नसणें. 'पाषाणादि जड पदार्थी अज्ञान राहतें' ५ मूर्खपणा; अप्रबुद्धता; जडत्व. ६ जीवाच्या सात अवस्थांतील पहिली अवस्था. –वि. १ अडाणी; ज्ञान नसलेला; न शिकलेला; अजाण; जड; मंद. 'कृष्णाः– प्राणवल्लभे, किती अज्ञान आहेस ?' –पारिभौ १७. २ ( कायदा ) ( अ ) विवाह, आंदण, घटस्फोट या बाबतींत सोळा वर्षे पुरीं होण्यापूर्वी अज्ञान; ( आ ) इतर बाबतींत अठरा वर्षे पुरीं होण्यापूर्वी अज्ञान. ( इ ) कोर्टानें पालक नेमला असल्यास एकवीस वर्षे पुरीं होईपर्यंत अज्ञान. (इं.) मायनर. [सं. ] **०गत**–स्त्री. भांबावलेली स्थिति; मोहाची–चित्तवैकल्याची अवस्था. 'ते वेळेस मला अज्ञानगत झाली.' **०जन**–पु. निरक्षर मनुष्य; अविचारी, अज्ञ, जड मनुष्य. **०तिमिर**–पु. अज्ञानांधकार; गाढ अज्ञान. **०धन**–न. ( कायदा ) वयांत न आलेल्या मनुष्याची किंवा वेड्या मनुष्याची संपत्ति, मालमत्ता. **०पटल-पडळ**–न. ( काव्य ) आध्यात्मिक अज्ञान; आध्यात्मिक ज्ञानाचा अभाव; ब्रह्म, माया इत्यादिकांच्या संबंधीं वास्तविक ज्ञान नसणें. 'तुझें अज्ञान पटल विरालें । तुज झाली दिव्य दृष्टि ।' **०पालक**–पु. ( कायदा ) वयांत न आलेल्या मनुष्याच्या मालमत्तेची व्यवस्था पाहणारा किंवा त्याची काळजी वाहणारा. ( इं. ) गार्डियन. **०प्राणी**–पु. बुद्धिहीन प्राणी; विचार–विवेक नसलेला प्राणी; पशु. **०बुद्धि**–स्त्री. १ विवेकहीन किंवा मूर्खपणाची समजूत, कल्पना, ग्रह. 'हें तूं म्हणतोस अज्ञानबुद्धीनें.' २ मूर्खपणा, बुद्धिहीनता. –वि. मूर्ख; बुद्धिहीन; भोळा; बालक. **०भुररें–भुरळ**–( काव्य ) अज्ञानाचा मोह; भ्रम. 'जै फिटे अज्ञान भुररें' **०सिद्ध**–वि.१ अज्ञानामुळें निश्चित झालेलें, बनलेलें (मत–कल्पना). २ अज्ञानामुळें निश्चित–प्राप्त होणारें; मूर्खपणापासून अवश्य मिळणारें ( फल–शिक्षा ). ३ अडाणी लोकांसहि निश्चित माहीत असलेलें. 'तापावर दूध प्यायलें असतां विकार होतो हें अज्ञानसिद्धच.'

**अज्ञानी**—वि. अडाणी; अजाण; न शिकलेला; ज्ञानी नव्हे तो; अज्ञ. [ सं. ]

**अज्ञाव**—स्त्री. ( गो. ) अवज्ञा. 'अज्ञाव केली बरी न्हे.' [ सं. अवज्ञा वर्णविपर्यास ]

**अज्ञेय**—वि. विचारशक्तीच्या पलीकडील; बुद्धीस अग्राह्य; अलक्ष्य. [ सं. ]

**अज्ञेयवाद**—पु. ( तत्त्व. ) ( इं. ) ॲग्नॉस्टिसिझम; आपणांस जें वास्तविक ज्ञान होतें तें इंद्रियांस गोचर होणाऱ्या वस्तूंचेंच होतें. ईश्वर, अमरत्व या गोष्टी इंद्रियांच्या म्हणजे प्रत्यक्षाच्या कक्षेपलीकडील असल्यानें त्यांसंबंधीं निश्चित असें कांहीं मत स्थापणें अशक्य आहे असा वाद; मत. –ज्ञाको (अ) ६९४. **अज्ञेयवादी**–वि. अज्ञेय ( वाद ) मतानुयायी. 'ती नास्तिक नाहीं आहे, ती स्पेन्सरप्रमाणें आणि माझ्याप्रमाणें अज्ञेयवादी आहे.' –सुदे १०८

**अज्नी**—पु. (चुकीचें रूप) अग्नि. 'करोनि थारोळी अज्नी । आहरसिद्ध ।' –दावि ३४७.

# आ

**आ**—१ वर्णमालेंतील दुसरें अक्षर. याचा अक्षरविकास साधारण अ सारखाच झाला आहे. २ संस्कृत शब्दाच्या मागें जेव्हां हें अक्षर उपसर्ग म्हणून लागतें तेव्हां त्याचे पुढील अर्थ होतात–(अ) लघुता; अल्पता; कमीपणा. उ० ओष्णम्=कोंबट ( उष्णम्=कढत, ओष्णम्= किंचित् उष्ण–कोंबट ) (आ) व्याप्ति; प्रसार; वाढ. उ० आभोग= समृद्धि; पूर्णता. (भोग=सुख, आभोग=अधिक भोग, भोगाची वाढ). (इ) उपक्रमाची मर्यादा (अमूकपासून). उ० आसमुद्रात्=समुद्रापासून, आजन्मतः=जन्मापासून. (ई)अवसानमर्यादा;शेवटची,अंताची मर्यादा (अमूकपर्यंत, पावेतों)उ० आफलोदय=फलप्राप्ति होईपर्यंत; आजानु= गुडघ्यापर्यंत; आकर्ण; आमरण=मृत्यूपर्यंत. ( उ ) अंतर्भूत व समाविष्ट मर्यादा. उ० आक्रमण (क्रम्=जाणें, चालणें, पाऊल टाकणें)= व्यापून टाकणें, आसकलात् ब्रह्म=ब्रह्म वस्तुमात्र व्यापून आहे. ( आ+ सकळ=सर्व ). ( ऊ ) अतिरिक्त; अकारण, वाजवीपेक्षां अधिक;

निरर्थक; द्विरुक्ति. उ० आभास, आघ्राण, आह्लाद, आघात, (भास, घ्राण, ह्लाद, घात, याप्रमाणेंच अर्थ). (ए) आ लावल्यानें शब्दाचा अर्थ वाढतो, मर्यादित होतो, बदलतो किंवा फिरविला जातो उ० आग्रह(ग्रह=घेणें–घेतल्यानंतर त्यालाच चिकटून राहणें)= हेका. आचार (चर्=चालणें)=शास्त्राप्रमाणें वागणूक ठेवणें. आगमन (गमन=जाणें)=जवळ जाणें, येणें. आमोद (मोद=आनंद)= सुवास. आकृति (कृति=कृत्य)=मूर्ति; स्वरूप; आकार.

**आ**—(आ अक्षर उच्चारतांना होणाऱ्या ध्वनीचा अनुवाद व तोंडाचा आकार) तोंड वासणें, उघडणें; उघडलेलें तोंड. (क्रि० करणें, पसरणें, वासणें). 'तव सुप्रसाद मुदिरा इच्छितसे चातकी करुनि 'आ' हे।' –मोआ ४.८३. 'हृदयें वाट पहाती मेघाची जेंवि करुनि आ शेतें।' –मोशांति ३.६५. ०**वासणें**–१ तोंड पसरणें; आ करणें; जांभई देणें. २ खाऊन टाकण्यासाठीं तोंड उघडणें. ३ मदतीसाठीं याचना करणें. जसें–चीं चीं करणें, बें बें करणें; दयेची याचना करणें; आधीनता, अंकितपणा कबूल करणें; शरण आलों म्हणून कबूल करणें. म्ह० नाक दाबलें म्हणजे आ वासतो. ०**वासून, पसरून बसणें**–आशा धरून, उत्कंठेनें बसणें. ०**पसरणें**–तोंड उघडणें; पदार्थ खाण्यासाठीं आ करणें. '.. आ ज्याला। कवळार्थ पसरिला...' –मोभीष्म १.२४.

**आ**—(संक्षेप) पत्रव्यवहारांत मोठ्यानें लहानास लिहितांना 'आ' (आशिर्वाद या अर्थी) लिहितात. जसें–कळावें हे आ०. दंडवत बद्दलहि नुसता 'द' लिहितात.

**आ**—उद्गा. १ खबुतर, मोर, इत्यादि पक्ष्यांस बोलावण्याचा शब्द. २ (अनुमोदनार्थी) होय; बरें.

**आ**—भिल्ली भाषेंतील षष्ठीचा प्रत्यय. उ० उनाड पोयराआ हानोपेन=उनाड पोऱ्याचें लहानपण. -भिल्ली भाषेंतील गोष्टी ३०.

**आं**—उद्गा. १ सांगितलेली गोष्ट चांगली ऐकली नसतां पुन्हां बोल असें म्हणण्याच्या अर्थानें केलेला उच्चार; काय ? आं! (प्रश्नार्थी). २ षष्ठीचा विभक्तिप्रत्यय. 'तंवं तो धारासिंपे तिरवटें। डोळेआं उजूं।' –शिशु ७११. 'तेआं पासाव जगजीवनें। काइ आधिष्ठीलेति।' –ऋ १३. [सं. आम्]

**ऑ**—सना. तो–ती तें. 'ऑ साहेबी 'ऱ्या प्रभूंनीं. –अ. असें कीं. [फा. ऑ]

**आआडणें**—अक्रि. (भि.) ओरडणें. 'जीव वाचवाखातांर तो मोठानें आआडावा लाग्यो' –भिल्ली भाषेंतील गोष्टी १७.

**आइकट**—पु. (गो.) तह. [का. आयकट्टु=व्यवस्था]

**आइकणें – आइकभट्टी – आइकीव**—ऐकणें, ऐकभट्टी, ऐकीव पहा. **आइका**–ऐका पहा. 'ते प्रसिद्ध नागांविका। प्रसन्न होए आइका।' –ऋ ४. **आइकत**–ऐकोत. 'तें आइकतु रसिकु आतां॥' –शिशु ७४३. **आइकौनि**–ऐकून. 'जेआंचे आइकौनि बरवेपणा।' –दाव ४८. **आइकीजे**–ऐका. 'आइकीजे द्वारकापुरा नगरी' –उषा ६४७. **आइकें**–ऐक. 'आणीक आइकें यादव टीळका।' –उषा ८१३. **आइकशी**–(रा. कुण) ऐकशील. 'माजें आइकशी ता तूं मुंबयच्या वाटे पडों नुको.' –मसाप २.४.१११. साधारणपणें जुन्या मराठींत लिहितांना ऐ बद्दल आई किंवा अई येतें.

**आइणी**—आयणी पहा.

**आइतवार**—आदितवार पहा.

**आइ(ई)ता–ती–तें**—वि. १ स्वतंत्र, स्वतःसिद्ध; स्वयंपूर्ण. 'तो तुझा तूं आइता'–परमा ४.१६. 'म्हणूनि हें आइतें। सच्चिदानंद।' –विउ १०.२५. २ श्रम, यत्न न करतां प्राप्त झालेला, मिळालेला. 'हा दागिना मीं करविला नाहीं, मला आइता मिळाला. आयता–ती–तें पहा. म्ह० आइती गुरवीण होईन, नैवेद्य खाईन= आयतें केलेलें अन्न खाण्यास मागेंपुढें न पाहणारी ऐदी स्त्री. [सं. अ+यत्=प्रयत्न करणें]

**आइती**—स्त्री. १ सिद्धता; तयारी; सामग्री 'मग म्हाइंभटीं ऋद्धिपुरा जावेयाचि आइती करूं आदिरिली' –ऋ १३३. 'जुंझाची आइती। करवीतुसें यदुपती।' –शिशु ९१०. 'ऐसेंएसिया आइती। जयाची परी असती।' –ज्ञा १३.५९१. 'करा तुम्ही बाशिंगाची आइती।–स्त्रीगीत ८. आयती पहा. [सं. आ+यत्= प्रयत्न करणें]

**आइतोजी**—वि. पूर्वी खटपटीच्या वेळीं न येतां फलोपभोगसमयीं मात्र येणारा. [आइता]

**आइतोळा**—पु. पाटाच्या स्त्रीला तिच्या पूर्वभर्त्यापासून झालेला पुत्र. आयतखाऊ, आयतोजी. (हा दुसऱ्या भर्त्यास आयता मिळालेला असतो).

**आइंद–दा–दे**—क्रिवि. १ येणारा; पुढें; पुढील वर्षी. 'हाली (सध्यां) व आइन्दे' –पया ४९३. 'सरकारचे वचनाची कायमी कशी तें आईन्दे जहुरांत येईल.' –रा १०.१६६. २ यंदां; या सालीं [फा. आयन्दा=येणारा, भावी.]

**ऑइल**—न. तेल, अर्क; एल (तिळेल, फुलेल यामधील). [इं.] ०**इंजन,** ०**एंजिन**–तैलयंत्र, तेलानें (तेलाच्या वाफेनें) चालणारें इंजन. 'आइल एंजिनांतील क्रूड ऑइल वापरण्याचा प्रघात बऱ्याच जणांस विदित असेल.' –सासं २.१३२. [इं.]

**आइस**—पु. बर्फ [इं.] ०**क्रीम**–न. दूध, दहीं, रस किंवा अशाच पातळ पदार्थांत साखर (कधीं बदाम, केशर) घालून यंत्राच्या व बर्फाच्या साहाय्यानें घट्ट केलेलें खाद्य. 'यापुढें विश्वामित्राचें कुलपीमलाय आइसक्रीम थंडगार होतें' –नाकु ३.७९.

**आई**—एक भावदर्शक प्रत्यय. हा विशेषणास लावला असतां भाववाचक नाम होतें. उ० भला–भलाई कुचर=कुचराई; नरमाई, बारकाई, गनिमाई. [फा.]

**आई**—स्त्री. १ जननी; माता. 'आई वंदंबा न मानीं संकट' —दावि १६०. २ जगदंबा; देवी; देवींच्या नावापुढें लावावयाचें उपपद; जसें—तुकाई, मरीआई, काळकाई. ३ (सांकेतिक) वारकरी पंथांतील लोक ज्ञानेश्वरीस म्हणतात. ४ (सामा.) देवी 'आईच नवसु नाहीं पुरविला' —दावि ३४७. ५ देवी (रोग); फोडया. ६ लहान मुलाला लडिवाळपणें संबोधितात. [सं. आर्ये, किंवा अयि? सं. आदि? प्रा. आइ?] शिवाय अइ पहा. **म्ह॰** १ आईचें दूध कीं गायीचें दूध=दोन समान गोष्टीपैकीं सरसनिरस ठरवितां येत नाहीं अशा वेळीं योजतात. यासारखीच दुसरी म्हण—आई गोड कीं खाई गोड. २ आईजीच्या दोंदावर (जिवावर) बाईजी उदार=दुसऱ्याच्या मालमत्तेवर उदारपणा दाखविणें; आयती चैन करणें. ३ आई जेवूं घालीना, बाप भीक मागूं देईना=दोन संकटें आलीं असतां किंवा दोन परस्परविरुद्ध मतांच्या अधिकाऱ्यांची मर्जी संभाळावयाची असतां योजतात (इकडे आड तिकडे विहीर याप्रमाणें). ४ एका आईचीं लेंकरें=बंधुभाव दाखविण्याकरितां योजतात ५ लहानपणीं आई आई, थोरपणीं बायलाबाई=लहानपणीं आईची आठवण वारंवार होते पण प्रौढपणीं स्त्रीमुळें विसर पडतो. ६ आई मेल्यावर बाप मावसा (निष्काळजी) होतो. ॰**आंग**—न. आईपणा—मायपणा ज्या अंगापासून येतो तें अंग; स्त्रीचें किंवा प्राण्यांतील मादीचें जननेंद्रिय, व आंतील गर्भाशयाचा भाग; गुह्यांग. 'बाळंत होतांना तिला त्रास झाला, आईअंग बाहेर आलें' [आई+अंग] ॰**काळी**—स्त्री. शेतजमीन. ही आईसारखी पोषक असते म्हणून आदरार्थी. —गांवगाडा. [आई+काळी =शेतजमीन] ॰**पांढर**-स्त्री. गांवठाण; गांव ज्या जमिनींत वसतो ती जमीन; ही शेताच्या निरुपयोगी म्हणजे साधारण पांढऱ्या रंगाची असते. [आई+पांढरी] ॰**पोरका**—वि. आईवांचून उघडा पडलेला; ज्याची आई मेली आहे असें (मूल) ॰**बाई**-स्त्री. १ आईसारखी वयानें श्रेष्ठ, सुस्वभावी अशी बाई; आईप्रमाणें स्त्री. **म्ह॰** देई घेई ती आई बाई, न देई ती मसणांत जाई. २ शेजारची बाई; शेजारपाजारची स्त्री; शेजारीण. ३ कोणी तरी बाई. (अनेकवचनी उपयोग). **म्ह॰** परीट नागविला तर आयाबाया नागविल्या=परटाच्या येथें चोरी झाली तर त्याचें कांहीं जात नाही, उलट इतर लोक उघडे पडतात. ॰**करणें**—खुशामत करणें; गोंजारणें. ॰**बाप**—पु आई व बाप; वडील व मातोश्री; मातापिता. (अव.) आई व बाप. 'माझीं आईबापें आणि माझे शिक्षक जें मला सांगतात तें कां केलें पाहिजे?' —मराठी ३ रें पुस्तक (१८७३) पृ. ४१. **आईबापावरून पावणें, आईबाप उद्धरणें**—आईबापावरून शिव्या देणें; वेड्यावांकडया, वाईट शिव्या देणें. ॰**माई**—स्त्री. व्यापक अर्थानें बाई; एखादी आईसारखी मानलेली स्त्री, माउली; आईबाई. ॰**माई उद्धरणें**—आईवरून शिव्या देणें. ॰**माई करणें**—खुषमस्करी करणें; मनधरणी करणें.

**आईक**—वि. ऐकिव; पाहिलेली नाहीं अशी. —वामन बालक्रीडा ७३. (शर.)

**आईणी**—आयणी पहा.

**आईंदे**—क्रिवि. यापुढें; आइंद पहा. —ख ३५७६; पया ४.६६.

**आईन**—पु एक झाड; अईन पहा. 'ते पाईरहि खैर, किंजळ, तिथें आईन ही वाढती।' —केक १२९.

**आईस**—(कों. गो. कुण) आई; माता; देवी; लक्ष्मी; आई पहा. 'मीं जरी सत्पीचा चांगु। तरी काय आइसीहूनि अंतरंगु।' —ज्ञा ११.३२. 'आईस लागे की बहिण लागे सांग शिवशक्तिचें नांव' —मसाप १.१.८. [आई+स प्रत्यय]

**आउक-ख, औख-क्ष**—न आयुष्य; हयाति; जीवित. 'नाहीं फिटली आसोसी देवा आउक दिला थोडा।' —ऐपो ८९. [सं.] आयुष्य=आउख] ॰**वंत**—वि. आयुष्मान्, दीर्घायुषी. [आयुष्यवान्]

**आउंज**—आविंज पहा.

**आउट-ऊट-कें**—औट पहा.

**आउत**—औत पहा.

**आउलें**—वि. वेगळें; निराळें; वायलें. 'चाऱ्ही वेदयासीं आउलें ठेविलें। बळीसि दिधलें बलिदान॥' —ब १९८. [उवाइला वाइला पहा.]

**आउ(ऊ)स**—(कों. कुण.) आई; माता; आईस.

**आउ(ऊ)क्ष**—आउख (आयुष्य) पहा. 'आउक्ष तानाजीचें समजली। घोरपड फिरली।' ऐपो ४१. 'अगे बाई! आला! सोनियाचा बाळा। आउक्ष तयाला। उदंड हो॥' —वाट बघ (जननी जनकज कृत काव्य). ॰**वंत**—आउखवंत पहा.

**आऊ**—स्त्री. अवा पहा. १ मराठयाच्या स्त्रीला आदरार्थी संबोधितात. उ॰ जिजाऊ. 'आऊसाहेब' —पया ५२७. २ आवडी नांवाचें संक्षिप्त रूप. ३ (ल.) हलक्या शीलाची स्त्री; आवा; अवाजी. ४ (सामा.) स्त्री. 'ही आऊ कोण बुवा?' [सं. अंबा; प्रा. अव्वा—आऊ, का. अव्वा] ५ स्तन; थान. 'आईचा आऊ तें पिऊं लागेल' —नीतिशास्त्रप्रवेश पृ १००. [अमा—आमा—आमू]

**आऊ**—न. १ कण्हणें; विव्हळणें; अयाय करणें; मारतांना काढलेला किंवा असाच दुःखाचा उद्गार. २ कांकूं करणें; नकार दर्शविणें. [ध्व. ऑ+ऊँ]

**आऊट-की-कें**—अवटकी, अवटी, औट पहा.

**आऊड**—साडेतीन हाताचा पुरुष; औट पहा. ॰**बारा**—अउडबारा पहा. [प्रा. आउट्टि=साडेतीन]

**आऊड**—पु. (औंध) १ टप्पा. २ बंदुकीच्या गोळीच्या टप्प्याइतकें अंतर, [औट, आउट]

**आऊत-काठी-की-घेणें-फाटा**—औत पहा.

**आऊत**—न. (कु.) मासे धरण्याचें जाळें. [ सं. आयुध ]

**आओ**—पु. आकृति; रूप; आकार. ' जरि माजा सीं मोटकाचि आओ। तरि चराचरां कैसां भाओ। ' -शिशु ३९४. [ सं. आकार, तुल० म. आव ]

**आक**—पु. १ ( गु. ) गाडीचा कणा; आंख. [ सं. अक्ष. म. आंस ] २ ( घडकाम ) लोखंडी लांबट तुकडा; गज; बार.

**आंक**—पु. १ अंक पहा. २ आंख पहा. ' आंका वैसला भाला ' सयाजी गायकवाड पडला। ' -ऐपो ८७.

**आकटी**—आगटी पहा.

**आकंठ, आकंठमर्याद**—क्रिवि. गळ्यापर्यंत-पावेतों (भोजन, जल, संकट, इ० किंवा त्यांत बुडणें, निमग्न होणें. ) ' हिमोदकें आकंठें। ' -ज्ञा १७.२५८. [ सं. आ+कंठ=गळा ]

**आकंठणें**—उक्रि. (काव्य) गांठणें; आटोपणें ( पकडणें, धरणें). ' देव भोळा भावें भक्ता पाठोपाठीं। उचिता आकंठी माघोमाघ।' [ सं. आ+कंठ ]

**आकडसासु**—स्त्री. ( व. ) बायकोची वडील बहीण; वडील मेव्हणी, [ आक्का+सासू ]

**आकडा, आंकडा**—पु. १ संख्या; अंक; गणितांतील एक चिन्ह. २ बांकदार, वांकडें टोंक; आंकडी; हूक. ३ ( ल. ) विंचू किंवा खेंकडयाची नांगी. ४ लांब मिरची किंवा चिंच. ' चिंचेचा आकडा. ' ५ टोंक; शेंडा. ' आंकडयाचें पान ' ' तैसे आवाळुवा वरी आंकडे । धगधगीत दाढांचे। ' -ज्ञा ११. ३६३. ६ घोडा ( छत्रीचा वगैरे ). ७ ( जरतार धंदा ) फिरकींतून जाणाऱ्या तारेस एकाच दिशेनें फिरण्यास लावणारें यंत्र. ८ (गो.) अंगठा. [ सं. अंक्=खूण करणें, अंक=चिन्ह, आंकडा ] ०**वळणें**-थंडीनें किंवा भीतीनें अंग आखडणें. ०**मोडणें-बसणें**-विण्याच्या अगोदर गाय किंवा म्हैस या जनावरांच्या ढुंगणाच्या दोन्ही बाजू खोल जाणें. **आंकड्यास येणें-लोंबणें-लवणें**-वांकणें, पिकणें ( शेत, पीक, धान्याचीं कणसें ). 'कितेक भारें आकडया लवती'-सप्र १२.४३.

**आंकडी**—स्त्री. आंकडा पहा. १ (गो.) थंडी वाजून भरणारें कांपरें. 'माकां आंकडी आयली ' [ गो. आंकडुंचें=कांपणें ] २ लहान मुलांच्या पोटांत होणारा व हातापायास आंचके बसणारा रोग. [ तुल० सिं. आकुडु. ] ३ उंचीवरील वस्तू ( फुलें, फळें वगैरे ) तोडण्यासाठीं एका उंच काठीच्या टोंकाला कोयती, विळा किंवा तशाच प्रकारचें हत्यार बांधून केलेलें साधन. ' आंकडी घेऊन पानें काप ' ४ ( कों. ) कमरेस कोयती ठेवण्यासाठीं एका दोरीला गेळ केलेला लांकडाचा तुकडा बांधून केलेलें साधन. ' कंबरेला आंकडी लाव. ' ५ नांगराचें जूं ज्याला बांधतात तो मुख्य दांडा. -मसाप २.३.७७. ६ दुबेळक्यासारखें चिरयाचा गळपट्टा बांधण्याचें एक हत्यार; एस्की; इचकी. -चिरयाची माहिती पृ. २१. ७ समेळ (डम व डंका) वाजविण्याची वेताची वांकविलेली लहान काठी. ८ (खा.) सोनारी ( धंदा ) गावी नांवाच्या तार काढण्याच्या ठोकळयावर लोखंडी जाड पट्टीची कमान बसविलेली असते ती. [ आंकडा, सं. आकृष्ट; प्रा. आकड्ढ ]

**आकडी**—वि. (कर.) पाणी न मिसळलेलें-कोरें; निरसें (दूध) ' आकडी दूध महाग असतें. ' आखरी दूध पहा. [ ? ]

**आंकडेपत्रक**—न. वस्तुस्थितिनिदर्शक आंकडयांचा तक्ता. (इं.) स्टॅटिस्टिकल रिटर्न. [ सं. अंक+पत्रक ]

**आंकडेशास्त्र**—न राज्यकारभारांत ज्या गोष्टींचें ज्ञान अवश्य असेल तें परिमाणात्मक करण्यासाठीं आंकडे गोळा करण्याचें शास्त्र (इं.) स्टॅटिस्टिक्स. [ अंक+शास्त्र ]

**आकण**—न. १ एकदां मळणी केलेलीं कणसें (जोंधळा, बाजरी इ० चीं ). २ ( कांहीं प्रांतांत ) दुसरी मळणी झाल्यानंतरचें धान्य; मदन पहा. ३ धान्याची मळणी झाल्यानंतर उरलेलें, माती खडे मिसळलेलें धान्य; मातेरें. -ज्ञायो १.४४. [ सं. आकृष्ट+कण किंवा आ+कंडण किंवा आ=ईषत्, किंचित्+क्षुण्ण=मळलेलें ] ०**निघणें**-( व. ) पिट्टा पडणें; खात्री निघणें; अतिशय दमून थकणें. ' फार मजल तो चालून आल्यामुळें त्याची खूपच आकण निघाली. ' ०**निकण**-एकदां मळून, धान्य काढून झालेलीं कणसें पुन्हां मळून त्यांतून निघालेलें धान्य.

**आंकण-णा-णें**—पुन. १ पायांत घालावयाचा तोडा ( पूर्वी शत्रूला जिंकल्यानंतर त्याचें नांव एका तोडयावर खोदून तो पायांत घालण्याची चाल होती त्यावरून);पराक्रमसूचक पादभूषण. 'तो रणीं जितिला करूनि नेम। तेणें संतोषोनि परम। आपलें नाम आंकणा घाली। ' -एभा १९.१८३. [ सं. अंकन ] २ ( सामा. ) ब्रीद; बिरुद; ब्रीदावळी; अलंकार; भूषण. ' आंगाचेनि गोरेपणें। हे पण्हेरयांवरी पदवी आंकणें। ' -शिशु ८०७. ' हें आंकणें अनंता तुजचि साजे। ' -भाए ६५०.

**आंकणकडवें, आंकडकडवें**—न. १ गाण्यांतलें पालुपद; ध्रुवपद; पेडावंद. २ ( ल. ) एकदां नाकारलेली गोष्ट पुन्हां पुन्हां काढणें; विनंति करणें; टरलेली गोष्ट पुन्हां उपस्थित करणें; जपमाळ घेणें; घोळणें; तुणतुणें गाणें, घोकणें. ३ एखाद्याच्या भाषणांत वारंवार येणारा शब्द; पादपूरण; वाक्यपूरण. [ अखंड+कडवें. गुज. आंकणी, आखणी ]

**आंकणा-ना**—पु. अंकित; ताबेदार; आज्ञांकित. ' तेजाचेआं आळवना। जेआं बारां हीं सुर्य्ये आंकनां। ' -शिशु ३९८; ' माझिया प्रतापें यमु आंकणा ' -कृमु रा ३.५४; ' विठ्ठल म्हणा विठ्ठल म्हणा। कळिकाळ आंकणा मग तुम्हां। ' -निगा पृ. १५५. [ आंकण पहा ]

**आकणी**—स्त्री. ( का. ) रस्सा [ अ+कण ]

**आगरी**—पु. १ एक कुणबी जात; आगले कुणबी; बागवान २ बागाईतदार; आगर म्हणजे पोफळीच्या बागा मक्त्यानें करणारा. हा शब्द १२८९ च्या नागांवच्या शिलालेखांत आलेला आहे. ' हे दाम वरत सकोश कवळिआ मुख्य करूनि समळि आगरियां मागि उडिळि ' –यादवांचा शिलालेख ( श. १२८९. ). ३ कोळयांपैकीं एक जात. हे मिठागरांत राहातात व होडया, मचवे हांकारतात. यांच्यापैकीं कांहीं गुत्ते चालवितात. हे जेजुरीच्या खंडोबाची भक्ति करतात. ४ ( गो. ) मिठागरांतील कामकरी. [ सं. का. आगर ] –वि. आगरासंबंधीं; आगरांत उत्पन्न होणारा (पदार्थ). ०**बागायत**–स्त्री. किनाऱ्यावरील, खाडीवरील रेताड जमीनींतील नारळ, केळी वगैरे होणारी बाग; आगरांतील बाग. ०**भाषा**–स्त्री. ठाणें व कुलाबा या जिल्ह्यांतील आगरी लोकांची भाषा. ही भाषा देशी कुणब्यांच्या भाषेहून बरीच भिन्न आहे. ०**मिरीं**–न.अव. आगरांत पिकणाऱ्या काळ्या मिऱ्यांची जात.

**आंगरुखा**—स्त्री. (कों.) एका अखंड लाकडाची केलेली होडी. [ अंग+रुख=वृक्ष ]

**आगरूं**—अगरू पहा.

**आगल**—वि. पहिला; पुढचा.–स्त्री. १ नांगराच्या बैलजोडयांतील शेवटची बैलजोडी. पहिली धुरवी व दुसरी चाहुरी. जेव्हां तीनच जोड्या असतील तेव्हां तिसरी ती आगली, आणि चार किंवा अधिक जोड्या असतील तेव्हां धुरवी व चाहुरी शिवाय बाकी सर्व जोडयांस ( शेवटाकडून पहिली–दुसरी–तिसरी ) आगली म्हणतात. २ अगल–ला–ल्या–पहा. [ सं. अग्रल ]

**आगल**—स्त्री. ( ना. ) आगळ; अडसर; अर्गला. [सं. अर्गला]

**आगॅल**—न. ( गो. ) आकाशांतून पडणारें आगीचें पाणी. [ आग ]

**आंगलग**—वि. अंगासंबंधीं.

**आंगला–डा**—( कु. ) आंगरखा पहा.

**आगलाव्या**—वि. भांडण, कळ, कलागत लावणारा, कज्जेदलाल; कळचेटया; कळीचा नारद; कळलाव्या; आगलावणें पहा. [ आग+लावणें ]

**आगली**—आगल–ला पहा.

**आंगलें**—न.अव. ( भिल्ली ) बोटें. [ सं अंगुली ]

**आंगलें**—न. आंगडें. ' लेवविलीं पांचपुडीं आंगलीं । ' –शिशु ९१. (गो.) झबलें. 'ताका मावशेन कितलीशीं आंगलीं धाडल्यांत ! ' 'आंगलें टॉपरें घालप=पोशाख घालणें–चढविणें. [ सं. अंग ]

**आंगवण**—अंगवण पहा.

**आंगवणें**—क्रि. ( गो. ) अंगवण, नवस करणें. अंगवण पहा. ' ताणें दॅवाक बोकडॉ आंगैल्या. '

**आगवळ**—अगवळ पहा.

**आगवा**—स्त्री.प्रगति; वाढ. 'संत समागम धरावा । तेणें ब्रह्मानंदी होय आगवा गा । ' –भज २०. [ अग्रवत् ]

**आगवाडा**—अगवाडा पहा.

**आगवान**—पु. ( गु. ) १ पुढारी; मुख्य. २ वाटाडया. [सं. अग्रवत् ]

**आगवाला**—( यंत्र. ) बॉयलरमध्यें कोळसा घालणारा; (इं.) फायरमन. [ आग+वाला ]

**आंगवालें**—न. ( गो. ) अंगांत घालण्याचा कोणताहि शिवलेला कपडा, आंगलें. ' तूं नाटकाक यॅतलॉ ज्याल्यार तुगलीं आंगवालीं घाल. ' [ सं. अंग+म. वाल ]

**आगवीस**—स्त्री. ( कु. ) १ रानांत वणवा लागला म्हणजे भोंवतालचीं झाडें–झुडपें तोडून वणवा विजविणें–थांबविणें. ( क्रि० काढणें ). २ आलेलें संकट निवारण करणें. [ आग+विझणें ]

**आगशी**—स्त्री. ( कों. ) अग्नीची ज्वाळा; झोत; अही. [ अग्नि+शिखा ]

**आगशी**—स्त्री गच्ची; अगाशी पहा. [ सं. आकाशिका ]

**आगष्ट**—पु. इंग्रजी वर्षाचा आठवा महिना. हा श्रावण–भाद्रपद या महिन्यांच्या सुमारास येतो. (इं.) ऑगस्ट. [इं. ऑगस्टस् ]

**आगस्**—न. पातक; अपराध; गुन्हा. [ सं. ]

**आगस**—वि. आगप; लवकर, अगोदर किंवा योग्य वेळेच्या पूर्वी पिकलेलें तयार झालेलें ( फळ–धान्य ). याच्या उलट **मागस**. ( इतरत्र फारसा उपयोग करीत नाहींत ). [ सं. अग्र+स्रु ]

**आगसणें**—अक्रि. योग्य कालाच्यापूर्वी तयार होणें; पिकणें. **म्ह**० आगसली ती मागसली आणि मागून आली ती कापुसली= गर्भार झाली. ( विशेषतः सुनेच्या बाबतींत उपयोग ). तुल० ' कानामागून आली, तिखट झाली. '

**आगसपाळणा**—पु. ( व. ) आश्विनाच्या महिन्यांत खुल्या जागेंत लांब व उंच झोंके घेण्याकरितां पाळणा बांधतात तो. [ आकाश+पाळणा ]

**आंगसां**—पु. ( गो. ) वस्त्राचा तुकडा; रुमाल; फडका. ' तॉ आंगसां हांगाहाड पळोया. ' [ सं. अंगवस्त्र, म. अंगोच्छा; हि. आंगच्छा ]

**आगस्कर**—पु. अपराधी; गुन्हेगार. ' परि म्हणतों यासमयीं येतां आगस्करांहि अन्यां या । ' –मोभीष्म १.१०९. [सं. आगस्+कृ ]

**आगस्ता**—अगस्ता पहा.

**आगस्ताळ**—अगस्ताळ, अकरताळ पहा.

**आगळ–गुळ–गोळ**—पु. ( कु. ) रातंब्याच्या फळाचा तांबडा रस. अगळ पहा.

**आगळ, आगळगोटी, आगळडाव, आगळा**—अगळ–अगळगोटी–अगळडाव पहा.

**आगळ**—स्त्री.(व.) १ जमीनींत खोदलेली लांब चूल; ढोब चूल; चर. २ विटीदांडू, गोटया खेळण्याकरितां केलेली खळगी; अगळ पहा. [ का. अगळु=खड्डा ]

**आगळणें**—क्रि. रातंब्याच्या सालीस पुटें देणें. अगळावणें पहा. [ आ+गल् ]

**आगळा**—वि. १ अधिक; वरती; जास्त. 'चउ आगळे चाळीस गड ।' –ऐपो १४. शेर आगळें मण = १ मण १ शेर. **म्ह॰** (क.) जवा आगळी काशी=काशीपेक्षां जवभर अधिक. २ अधिक किंमतीचा; उंची; वरचढ; श्रेष्ठ; मोठा. 'अग्राकडूनि इक्षुरस । मुळां येतां आगळा सुरस ।' –मुआदि २.५७. 'सहाय दुमरा नसे तुजविणें बळें आगळा.' –केका ४६ ३ ( संख्येनें किंवा परिमाणानें ) मोठा; पुष्कळ. 'देखोनियां धार्मिकांची लीळा । अपवित्रास खेद आगळा ।' ४ अधिक ( वाईट, फाजील, खोडयाळ ). ५ उध्दट; उद्दाम; मगरूर ( नोकराचें भाषण, वर्तन वगैरे ). 'तो रुक्मिया असत्य स्वार्थ बोले । म्हणे येवेळें म्यां जिंकिलें । तों रेवतीवर म्हणे आगळें । असत्य न बोले कपटिया ॥' –ह ३२.६९. ६ निराळा; भिन्न; वेगळा. 'उपमा देऊं अप्सरा । तरी त्या व्यभिचारी समग्रा । हे त्याहून आगळी सुंदरा । पतिव्रतारत्न ॥' –कथा १.८.९२. [ का. अग्गल=मोठा; श्रेष्ठ; सं. अग्र+ल; प्रा. अग्गल=अधिक; हिं. आगला; जि. अंगळे ]

**आगळा**—स्त्री. अडसर; अर्गला. अगळ पहा. 'गळेत त्या आपण आगळा हो ।' –सारुह १.५१.

**आंगळी**—स्त्री. ( गु. ) अंगुली अप.

**आगळी, आगळिक, आगळीक, आगळी-त**—स्त्री. १ आधिक्य; वाढ. 'तैसीं मि आं केली थोरी आगळी ।' –दाव ३९०. 'रंगीं सुरंगतेची आगळीक ।' –ज्ञा १.३८. 'करतळानें ताडूनि कवतुकीं । आगळीक दावणें ।' –मुआदि ३१.४६. २ कुरापत; खोडी; अमर्यादा; औद्धत्य; मर्यादेपलीकडील कृत्य. ( क्रि॰ करणें ). [ का. अगळिके; म. आगळा ]. ३ (कायदा) कोणा मनुष्याच्या ताब्यांतील गोष्टींत ( मालांत किंवा मालावर ) धमकी देणाच्या, त्रास देण्याच्या किंवा गुन्हा करण्याच्या इरायानें जाणें. ( इं. ) ट्रेसपस.

**आगा**—उद्गा. अगा पहा. 'आगा तुम्हां देवां दोघां जणा ।' –उषा १७६९.

**आगा**—पु. १ अंगरख्याचा पेश कळी आणि खुटकळी यांच्यामधील भाग. २ पुढील भाग. –वि. मुख्य; श्रेष्ठ. उ॰ आगा हैदर. [ सं. अग्र; प्रा. अग्ग; फा. आगा=श्रेष्ठ ]

**आगा**—स्त्री. अगा ( ह ) पहा.

**आंगां**—न.अव. ( गो. ) काढ्यास लागणाऱ्या औषधी; अंगें. [ सं. अंग ]

**आंगा**—अ. (गो.) येथें; इथें; हंग. [तुल॰ कुण. अंग, हंग, हथं]

**आंगा**—पु. अंगरखा, कुडतें; अंगा पहा.

**आगाऊ**—अगाऊ पहा.

**आगाखानी**—पु. एक मुसलमानी धर्मपंथ; आगाखानाला गुरु समजणाऱ्या इस्मायली मुसलमानांचा पंथ. [ आगा+खान ]

**आंगागवडी, आंगागणिक**—क्रिवि. ( कों. ) पृथक् पृथक्; निरनिराळें; प्रत्येकीं; वेगवेगळें; प्रत्येक माणसाला निराळें. 'आंगागवडी शेला पागोटें दिलें.' 'आंगागणिक कारभार करूं लागले तर राज्य बुडतें.' आंगोगडी–ड्या पहा. [ अंग + अंग + वर्ती; अंग+गणिक ]

**आगाजणें**—अगाजणें पहा.

**आगाजा**—१ अगाजा पहा. ॰**उठणें–होणें**–बोभाटा होणें. २ वाद्य. 'आगाजांचे धडधडाट ।' –वेसीस्व ६.७६; ९.६३.

**आगाडा**—( गो. ) आघाडा.

**आगाड्याचें बगाडें**—न. ( गो. ) अवाच्यासवा सांगणें; अतिशयोक्ति. [ का. ]

**आगांतुक–की**—आगंतुक पहा.

**आंगाथिणें**—क्रि. १ पुष्ट होणें. 'भणऔनि आंगाथिलें ठीकलग ।' –दाव १७८. २ अंगिकारणें. अंगाविणें पहा. [ सं. अंग+स्था ]

**आगादज्वारी**—स्त्री. अगात ज्वारी; मृग नक्षत्राच्या वेळीं पेरतात ती ज्वारी; लवकर येणारी ज्वारी; अगात पहा. [ सं. अग्र जात; म. अगात+ज्वारी ]

**आगाप**—अगप पहा.

**आगापिछा**—अगापिछा पहा. 'आतां मला आगा पिछा कांहीं नाहीं. काशीवासास जावें म्हणजे जन्माचें सार्थक होईल.'

**आगाबानी**—अगाबानी पहा. 'अंगीं आगाबानी अंगरखा । चहूंकडून डौल सारखा ।' –प्रला ११६.

**आगामी**—वि. पुढील; येणारें; भविष्यकाळचें; भावी. [ सं. आ+गम् ]

**आंगार**—अ. (गो.) अंगावर. अंग पहा. ॰**जावप**–क्रि. अंगावर जाणें; विटाळशी होणें; ऋतुप्राप्त होणें; रजस्वला होणें. ॰**य्रेवप**–क्रि. १ अंगावर येणें. २ (ल.) मुद्दाम दुसऱ्याशीं स्पर्धा करून त्याला तोशीस लावणें; खोट बसणें. ॰**यावप**–क्रि. अंगावर येणें; खेंकरणें; वसकन अंगावर येणें. ॰**लॉळप**–क्रि. अंगावर लोळणें; विधिनिषेध न बाळगतां (एखाद्याशीं) लगट करणें. यांखेरीज वाक्प्रचारांसाठीं अंग पहा.

**आगार**—न. १ घर; मंदिर; वाडा; महाल; अगार पहा. २ सांठा; संचय; खाण. [ सं. आगार ]

**आगार**—पु.स्त्री. अंकुर; (व.) आगारे. अगारी पहा. 'तें वौपासि घेऊनि आगारें। खोलावती॥' –ज्ञा १५.९२. 'जन्मवरी आगारी। वाढतीचि असे॥' –ज्ञा १५.१७२. [सं. अग्र]

**आंगारइचें**—क्रि. (गो.) रागावणें; चिडणें. [सं. अंगार=अग्नि]

**आंगारडबी**—स्त्री. (व.) आगकाडयांची पेटी; आगपेटी. [अंगार+डबी]

**आगारा–री–रें**—पुस्त्रीन. अंकुर, शेंडा, डिरी. आगर, आगार पहा. [अग्र]

**आंगारा**—अंगारा पहा.

**आगाव**—अगाऊ पहा. 'आगाव रुपये दिले असतां सस्ते मिळेल, ऐतेवेळेस दिले तर महाग पडेल.'

**आंगावो**—पु. (गो.) मोठेपणा.

**आगाशी-सी**—अगाशी–सी पहा.

**आगासदिवा**—(व.) आकाशदिवा पहा.

**आगासताळपणा**—अकरताळ(पणा) पहा.

**आगाह–ही**—अगा(ह–ही) पहा

**आगाळा**—पु. (चि.) मुडा; ज्यांत धान्य अथवा पेरणीचें बीं बांधून ठेवतात असा पेंढयाचा अंडाकृति बोजा; मोटकुळें; गाठोडें बिवळा; कोळें इ०

**आगिअेल–येल**—न. आग; विस्तव; आगीचा डोंब. –वि. विस्तव किंवा अग्निसंबंधीं. 'जें आगिएलाचां सरोवरीं। घालिजे पुढिला तें॥' –शिशु ७५६; ९८०. [अग्नि+आलय]

**आगिओ**—पु. (गु.) जोंधळयाच्या पिकांत उगवणारें एक रोपटें. यामुळें जोंधळयाचें ताट सुकतें; आगी पहा. [का. अगे=कोंब; अंकुर; रोप.]

**आंगिक**—अंगिक पहा.

**आगिटा–ठा**—पु. विस्तव; आगटी. 'कोणी एकु सुभटा। विचाराचा आगिटा।' –ज्ञा १३.१०३६.

**आगिटें**—न. आगटी. 'मग तिहीं आणिलीं वांगींचीं काष्ठें। तापावया केलें आगिटें।' –कथा २.९.१९.

**आगिठ–ठी–ठें**—पु स्त्री.न. आगटी; भट्टी; शेगडी; विस्तव; आग. 'कीड आगिठां पडे। तरी मलु तुटे वानी चढे।' –ज्ञा १८. १२१. 'लोहाराची आगिठी जैसी।' –एभा २६.४४. 'हें वाङ्मयाचें सारें। साकारपणाचें वसौटें। प्रपंचाचें आगिठें। अखंड धुपे॥' –स्वादि १३.३.४५. 'नेत्र जैसे कुंडींची आगिठी॥' –कृमुरा. २७.४५. [सं. अग्नि+स्था]

**आगिनगाडी**—स्त्री. आगगाडी; वाफेच्या साहाय्यानें चालणारी गाडी; बाष्परथ. (इं.) रेल्वे. 'टोपीवाल्याचा मूलूख। आगिन गाडीला कुलूप।' –बाळगीत [सं. अग्नि–म. आगिन+गाडी]

**आगिया**—पु. काजवा; अग्या. 'सीतकाळी आगिया देखौनि आगि म्हणोनी पानि झांकिला।' –पंच १.४५.

**आगियाळें**—न. आगिअेल पहा. १ अग्निकुंड. 'घृतें आंबुखूनि आगियाळें।'–ज्ञा १४.१६२. २ ललाटस्थ अग्निचक्र. [सं. अग्नि+आलय]

**आगिवळा**—पु. १ अभक्ष्य पदार्थ ठेवल्यानें अशुद्ध झालेलें भांडें शुद्ध करण्यासाठीं द्यावयाची विस्तवाची आंच. (क्रि० देणें). २ इमारतीचें लांकूड (नवें तोडलेलें) आकसण्यासाठीं त्यास धुरकटविणें. –ळी–स्त्री. अग्नीची ज्वाळा. [सं. अग्नि+वलय]

**आगी**—१ अग्नि; आग; विस्तव; निखारा. 'जिव्हारीं आगी सूदली। तापत्रयाची।' –ज्ञा ३.२५४. **–चा पुलाव**–पु. अति तापट, कडक मनुष्य. [आग+पुलाव] **–चा लोळ–कल्लोळ**–पु. १ आगीचा डोंब, झोत. २ मोठा, दांडगा प्रतिस्पर्धी; योद्धा. ३ (ल.) संतापी मनुष्य. **–ची जीभ**–स्त्री. अग्नीची ज्वाळा; अग्निजिव्हाशिखा. **–चा विमा**–पु आगीमुळें कोणत्याहि मालमत्तेच्या होणाऱ्या नुकसानीबद्दल किंवा नाशाबद्दल मोबदला देण्याचा करार. **–ची वृष्टी**– स्त्री. १ तोफ, बंदूक यांचा मारा. २ (ल.) संकटपरंपरा. 'तिच्यावर सारखी आगीची वृष्टी होत होती.' –इंप ५६.

**आगी**—पु. शेवट. '(घाण्याचा बैल) भंवतां फिरे लागवेगीं। परी पाहतां नलगे आगी।' –एभा २१.२३२. [सं. अग्र=टोंक]

**आगी**—स्त्री. (कर्ना.) पड जमीनींत प्रथमच पीक करतांना उगवणारें रोपटें. [का. अगे=कोंब; अंकुर]

**आंगी**—अंगी पहा.

**आगीदुगी**—स्त्री. १ भानगड, चोंबडेपणा करून किंवा मध्यें तोंड घालून दुसऱ्यानें केलेला अपराध किंवा मूर्खपणा पुढें आणणें; चहाडी; आगलावेपणा (अकरणरूपांत उपयोग व ज्या वस्तूवर क्रिया घडते तिची षष्ठी योजितात). (क्रि० काढणें, पाहणें, करणें, उकरणें) 'मी कोण्हाची आगीदुगी पहात नाहीं.' २ उठाठेव; दुसऱ्याची पंचाईत; भानगड. 'बाबा कोणी कांहीं करो, कोणी कोणाची आगीदुगी करूं नये.' [सं. आगस्; म. आग=अपराध, द्वि.] **आगीदुगींत नसणें**–भानगडींत नसणें; उठाठेवींत, पंचायतींत न पडणें. **आगीभागी पडणें**–धोक्याच्या व दगदगीच्या धंद्यांत पडणें; गोत्यांत पडणें. [सं. अग्नि; म. आग+भाग]

**आगीन**—स्त्री अगिन; अग्नि (अप.) 'तिसऱ्या पानावरी जळते नित्य आगीन।' –लावण्या (मसाप १.१.१.)

**आगीमण्यार**—स्त्री. मण्यार; सर्पांतील एक अतिउग्र, भयंकर विषारी जात. [आग+मण्यार]

**आगीमाशी**—स्त्री. जंगलामध्यें सहा प्रकारच्या माशा असतात, त्यांपैकीं एक. ही चावली असतां दंश कृष्णवर्ण होऊन स्रवतो, सुजतो व पिकतो. ही माशी प्राण हरण करणारी आहे. [सं. अग्नि+मक्षिका]

**आंगु**—अंग पहा.

**आंगुठ**—पु. आंगठा. 'देपा धोत्राची नीरी। आंगुठेनें चेपते पुढां।' –उषा १८४६. [सं. अंगुष्ठ]

**आगुदान**—न. बाराव्या शतकांतील देवगिरीच्या राज्यांतील एक सोन्याचें नाणें. 'तीस तीस आगुदानां दिधलिया.' –भाअ १८३६. पृ. ६३.

**आगुल-गूल**—स्त्री.(व.) नांगराच्या बैलजोडयांपैकीं शेवटची, पुरवणी जोडी; आगली पहा. २ बैलाच्या चाहोरांतील पुढचा भाग. 'आगुलीची जोडी हलकी असली तरी चालते.' –वि. (व.) आगुल्या; आगुली (आगली) हांकणारा मनुष्य. [सं. अग्र+ल; म. आगल]

**आगुल्ल**—वि. (गो.) कजाग; कर्कश (स्त्री, पुरुष); भांडखोर. 'तें झगडूं गॅल्यार सामके आगुल्ल।' [पोर्तु. आगुल्ह. तुल० सं. अग्नि+तुल्य]

**आंगुळ**—न. १ आठ यव रुंदीचें माप; आठ यव एकाशेजारीं एक ठेवून जें प्रमाण होईल तें. २ बोटाच्या रुंदीचें माप. [सं. अंगुलि]

**आंगुळी-आंगूळ-आंगोळी**—अंगुळी पहा.

**आगू**—पु. श्रौत यज्ञांत याज्या म्हणावयाच्यापूर्वी म्हणावयाचा विशिष्ट मंत्र. [वै.]

**आंगूळ**—अगूळ, अगवळ पहा.

**आगे**—उद्गा. अग, अगे पहा.

**आगें**—क्रिवि. (हिं.) पुढें. [सं. अग्र] ०**मागें**–क्रिवि. पुढें मागें; अंमळ पुढें अगर पाठीमागें; याबाजूला अगर त्याबाजूला; जवळपास; इकडे तिकडे; अलीकडे पलीकडे (स्थळ, काळ संबंधीं). 'मागाल तेव्हांच रुपये देईल असें प्रमाण नाहीं, परंतु आगेंमागें देईल, बुडविणार नाहीं.' 'तो श्लोक त्याच ठिकाणीं कोठें आगेंमागें असेल.' [आगे; सं. अग्र,+म. मागें का. मगनु; प्रा. अग्गओ-मग्गओ.]

**आंगें**—क्रिवि. खुद्द; स्वतः; जातिनिशीं. 'तेचि वस्तु होये आंगें। या नांव साधक।' –दा ५.९.२१. [सं. अंग]

**आगेरूं-रू**—अगरूं (रोग) पहा.

**आगेल**—न. १ (गो.) आग; विस्तव. 'त्येचा घराचेर आगेल पडों.' [सं. अग्नि] २ (कु.) नारळाचें उष्ण तेल. [आग+तेल]

**आगेवान**—वि. पुढारी; दर वीस इसमांवरील नाईक. –डुकराची शिकार ४. [सं. अग्रवत्-वान; सिं. अगवाणु]

**आगो**—उद्गा. (कों. गो.) अग पहा. 'आगो, तूं थै वचूं नका.'

**आँगोगडी-ड्या**—क्रिवि. (कों.) प्रतिव्यक्तीवर निरनिराळा अन्वय होईल असें (देणें, सांगणें). प्रत्येकीं; निरनिराळया व्यक्तींस स्वतंत्रपणें. 'एक जण कोण ते काम सांगा, आंगोगडी सांगूं लागलां तर म्यां काय करावें.' 'सगळे गांवकन्यांस शंभर रुपये बक्षीस दिले, आंगोगडी दिले नाहींत.' [ऑग+गडी]

**आंगोघडी-ड्या**—क्रिवि. १ आंगोगडी पहा. २ पुनःपुनः; वारंवार. [अंग+घटि-डि]

**आगोज**—वि. मोठें; भयंकर; अगाध. 'भलतें जड पडो भारी। जीवावरी आगोज।' –तुगा ६६१. [सं. आ+गर्ज् ?]

**आगोट-टी-ठ**—स्त्री. पावसाळयाचा आरंभ. अगोट पहा. 'आगोठी मेघ वर्षले।' –गीता १.२३९१. [सं. अग्र+वृष्टि]

**आगोटणें**—सक्रि. (व.) आवरणें; ताब्यांत आणणें. 'बैल आगोटले तेव्हां गाडी थांबली.' [सं. आकृष्ट]

**आगोटता**—वि. (व.) आटोपशीर. 'त्याचा कारभार आगोटता आहे.' [आगोटणें]

**आगोतली-थली, आगुतली, आगोती**—स्त्री. (कों.) केळ, चवेण यांच्या पानाचा शेवटचा–जेवणास उपयोगी पडेल असा भाग. दांडाळवत याच्या उलट. 'श्राद्धाकरितां चार आगोतल्या पाहिजेत.' 'केळीच्या लांब लांब आगोतल्या हींच त्यांचीं रुंद्याचीं तारें.' –पाव्ह १७. [सं. अग्र+दल]

**आगोदर-धर**—अगोदर–धर पहा.

**आंगोपती**—क्रिवि. अंगप्रती; वेगळाले; प्रत्येक जण आपल्यापुरतें; स्वतंत्रपणें. 'ते चौघे भाऊ आंगोपती संसार करूं लागले म्हणून घर बुडालें.' आंगोगडी पहा. [सं. अंग+प्रति]

**आगोस**—स्त्री. (कों.) उन्हाळयाच्या सुरवातीचे दिवस. जसें– आगोठ=पावसाळयाचा आरंभ. [सं. अग्र+उस्र=किरण; प्रा. ऊस; आग+ऊस]

**आंगोस्तर, आंगोस्ती**—अंगोस्तर–अंगोस्ती पहा.

**आगोळ**—१ (कु. गो.) रातंबीच्या फळापासुन होणारा रस; तांबडा रंग. अगूळ पहा. २ अगवळ पहा.

**आगोळा**—(गो.) आगाळा पहा. [चि. गो. आगोळो]

**आंगोळी**—अंगुळी, अंगोळी पहा.

**आग्न**—पु. आग; विस्तव. 'आग्न म्हणे आमुचें घर। भस्म करूं।' –दा १.१०.४६. [सं. अग्नि]

**आग्नेय**—वि. १ विस्तवासंबंधीं; अग्निदेवतेसंबंधीं. [सं] –स्त्री. २ आग्नेयी (अग्निदेवतेची पूर्व व दक्षिण यांमधील) दिशा.

**आग्नेयी**—स्त्री. अग्नि अधिष्ठित दक्षिण आणि पूर्व यांमधील दिशा. [सं.]

**आग्या**—पु. १ खाजरी; खाजकुइली; स्पर्श झाला असतां आग होणारी एक वनस्पति; पीतवर्णी. हिचीं जाईच्या पानासारखीं पानें असून सफेद रंगाचीं लहान बोंडें येतात; धान्याच्या शेतांत हीं झाडें झाल्यास पीक जळून जातें. 'आग्या आणि काचकुहिरी।' –दा ३.७.५. २ काजवा. अग्या पहा. ३ सुतेरा (कोळी); पाऊस

कमी झाला असतां जोंधळ्याच्या पिकावर होणारा किडा. –कृपिवि १७४. ४ आगी माशी; मोहळाची माशी; चावणारा–आग करणारा ( चावल्या–डसल्यानंतर ) साप इ० प्राणी. –वि. १ आग करणारा; दंश करणारा. २ अतिशय रागीट; तापट, जहाल (मनुष्य, स्वभाव). [सं. अग्नि] ०घणस–घोणस–पु. ज्यानें दंश केला असतां अंगाची आग होते असा घणस. ०झोटिंग–पु. आग्यावेताळ पहा. 'जाखाई जोखाई मायाराणी। मारको मेसको यक्षिणी। आग्याझोटिंग जखिणी। त्यांस भजोन जन बुडाले॥' –ह १३.६७. ०देवी–स्त्री. देवी (फोड्यां) चा एक जाज्वल्य प्रकार. ०फुरसें–पु. (कु.) सर्पाची एक जात. ०विंचू–पु. एक प्रकारचा विंचू; काजव्यासारखा प्रकाशणारा. 'आगाया विंचु झाला म्हणून काय कंठींच कवळावा।' –भज ८८. ०वेताळ–पु. १ आग लावणारा पिशाच्चांचा राजा. याचा एक मंत्र आहे. तो जपला असतां ज्या मनुष्याचा नाश कर्तव्य असेल त्याच्या शरीरास किंवा मालमत्तेस आग लागते. रात्रीं डोंगरावर इकडे तिकडे जाळ दिसूं लागला असतां आग्या वेताळाचा संचार सुरू झाला असें म्हणतात. २ अति तामसी, तापट, तडफदार मनुष्य. 'आमचे रावसाहेब म्हणजे शुद्ध आग्यावेताळच आहेत.' ०सर्प–पु. एक सापाची जात. 'गगनीं लागती ज्वाळ। आग्यासर्पे।' –दावि २४४. ०सोमल–पु. मनशीळ.

**आग्यें फुरसें**—न. (कों) एक जातीचें फुरसें; सर्प. [आग्या+फुरसें]

**आग्यें मोहोळ**—न. आगीमाशीचें पोळें. [आग्या+मोहोळ]

**आग्येल**—न. (गो.) अग्निवर्षाव; आकाशांतून पडणारें आगीचें पाणी. [आग+तेल]

**आग्रयण**—न. नवीन धान्याचें भक्षण; नवीन तांदुळाच्या केलेल्या भाताचा स्थालीपाक (होम) करून तो भक्षण करणें. हा विधि आश्विन शुद्ध पौर्णिमेस करतात; नवान्नेष्टि. [सं.]

**आग्रह**—पु. १ जो हेतु किंवा जें मत एकदां झालें असेल तें बळकट धरणें; दृढमत; दृढनिश्चय. २ हेका; हट्ट. (क्रि० धरणें). 'ऐसियाहि करूं म्हणती तयांचा। आग्रहोचि उरे।' –ज्ञा ३.६३. ३ मिनतवारी; प्रार्थना; गळ घालणें; अगत्याचें बोलावणें किंवा आमंत्रण. (क्रि० करणें). ४ दुराग्रह; अनमान; हरकत. 'गज दशसहस्र वधितां भीमभुजांला नसे लवायास। आग्रह करिति अशाच्या चरणीं त्वत्सुत कसे लवायास।' –मोभीष्म ५.३१. [सं. आ+ग्रह्] **आग्रहास पेटणें**–आग्रह धरणें.

**आग्रहणें**—अक्रि. आग्रह धरणें. 'आग्रहाल तरी सेवीन अन्न वैश्वानर।' –वसा ४२.

**आग्रहायण**—पु. मार्गशीर्ष महिना. [सं.]

**आग्रहायणी**—स्त्री.१ मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा. २ त्या पौर्णिमेस करावयाचा पाकयज्ञ (एक होमविधि). ३ (ज्यो.) मृगनक्षत्र.

**आग्रही**—वि. १ निग्रही; आग्रह धरणारा; हट्टी; हेकेखोर. (विशेषतः निंदाव्यंजक अर्थानें उपयोग). २ चिकाटी–नेट धरणारा. ३ आग्रह करणारा; अगत्य दाखविणारा.

**आग्राव**—पु (गो.) हरकत; विरोध 'हाजेर म्हगॅलो कांयूच आग्राव ना' [सं. आग्रह; तुल० पोर्तु. आग्राव्हो]

**आग्राळ**—स्त्री. (व.) आळ 'त्यानें माझ्यावर उगीच आग्राळ घेतली.'

**आंग्ल**—वि (इं) इंग्रज किंवा इंग्रजी यासंबंधीं. [इं आंग्लो]

**आंग्लोइंडियन**—वि. युरेशियन; हिंदुस्थानातील रहिवाशी, हिंदुस्थानांत जन्मलेले, इंग्रज व हिंदू यांच्या मिश्रणानें उत्पन्न झालेले इंग्रज.

**आंग्ळ**—न. (व.) सद्रा.

**आघ, आघटी, आघटें**—आग–टी–टें पहा.

**आघरू**—(प्र.) अगरू, आगरू, अगरू पहा

**आघवा**—वि. एकंदर; सर्व; अवघा. अघवा पहा. 'म्हणऊनि अपाडु हें आघवें। निर्धारितां।' –ज्ञा. १.६९.; 'असत्य हे माया म्हणतां प्रत्यक्ष। मायेचा हा पक्ष दृश्य आघवें।' –च १६५

**आघळ**—पु स्त्री. दाराचा अडसर; अगळ पहा. [सं. अर्गला]

**आघळणें**—आघाळणें पहा.

**आघा**—वि. १ सर्व, अवघा; अघवा पहा. २ अघा पहा.

**आघाट–ण–णें**—पुन. सीमा; हद्द; मर्यादा; चतु:सीमा. 'भूतग्रामांचे आघाट चिरिले चारी' –ज्ञा १३.४५. 'ऐसि आघाटणे चिआ।' –शक १२८९ तील यादवांचा नागांव येथील शिलालेख (ग्रंथमाला पु ६) [सं. आघाट=हद्द; मर्यादा]

**आघाटी**—स्त्री. एक तंतुवाद्य; किनरी; एकतारी. 'रंगावति अे तूं घेई आघाटी। गाई स्वरांचा पढिमटी।' –शिशु ६९७. [वै. आघाटि (ऋग्. १०.१४६.२)]

**आघाडा–डी, आघेडा**—अघाडा–डी, अघेडा पहा.

**आघात**—पु. १ तडाखा; गुद्दा; चपेटा; धक्का; प्रहार; मार. 'माया करुणा हे करिते बहुत। किती सोसूं या जगाचे आघात।' –तुगा ११९. २ वधस्थान. ३ (यंत्र.) चलनयुक्त पदार्थ दुसऱ्या पदार्थास जो धक्का देतो तो. –यंमू २११. [सं. आ+हन्]

**आघार**—पु. कोणत्याहि होमांत मुख्य देवतेसंबंधीं याग होण्यापूर्वी अग्निस्थंडिलाच्या वायव्य कोपऱ्यापासून आग्नेय कोपऱ्यापर्यंत एक व नैर्ऋत्य कोपऱ्यापासून ईशान्य कोपऱ्यापर्यंत एक अशा संतत धार धरून दोन तुपाच्या आहुति देतात तो. [सं.]

**आघारी**—स्त्री. शूद्र लोक श्राद्धाच्या वेळीं पितरांना उद्देशून अग्नींत तुपाची किंवा भाताची आहुती देतात ती; किंवा कावळ्यास काकबळी (भाताचा पिंड) देतात ती. [सं. आघार]

**आघाळणें**—क्रि. वस्त्र वगैरे खळबळणें, पिळणें, चुबकणें. [ सं. आ+क्षालन; आ+घळ ( ध्व ) किंवा का. अगलु; अगळ=हालविणें ] **०पाघ(घा)ळणें**-खळबळणें.

**आघिवळा, आघिवळी, आघीदुघी, आघीमण्यार**— आगिवळा, आगिवळी, आगीदुगी, आगीमण्यार पहा.

**आघी-आघीमाशी**—आगीमाशी पहा. **म्ह०** मेलें मेंढरूं आघीस भीत नाहीं.

**आघोट**—आगोट, अगोठ पहा.

**आंघोळ-आंघूळ**—अंघोळ-अंघूळ पहा.

**आघ्या**—आग्या; हा व यापासून साधलेले शब्द आग्या खालीं पहा. **०वाघळी**—स्त्री. वाघळी नांवाची समुद्रांतील माशांची एक जात.

**आघ्यें**—न. १ ( कों. ) मधपाशांचें पोळें; आग्यें मोहोळ [ आग ] २ आग्या; मधमाशा; आगीमाशी [सं. अग्नि, म. आग]

**आघ्रव-आघ्रो**—आग्रह पहा. [ सं. आग्रह अप. ]

**आघ्राण**—न. वास घेणें; हुंगणें. [ सं. ]

**आघ्रात**—वि. वास घेतलेलें; हुंगलेलें. [ सं. ]

**आंच**—१ विस्तवाची झळ; धग; शेक. २ विस्तवाची उष्णता ( शिजविण्याकरितां, भाजण्याकरितां, औषधें, धातु वगैरे वितळ विण्याकरितां ). ' विस्तवाची आंच लाविली म्हणजे धातूंचा रस होतो. ' ( क्रि० देणें ). ३ ( ल० ) काळजी; चिंता; धागधूग, सावध-गिरी. ( क्रि० लागणें ). ' गंगाधराला संसाराची आंच लागली. ' ४ धक्का; धसका; भीतियुक्त मनाची स्थिति; भय; भीति. ( क्रि० बसणें ). ५ ( ल. ) बोट भाजणें; जळून जाणें; हात पोळणें; ( एखाद्या धाडसांत किंवा उलाढालींत ) तोटा येणें. [ सं. अर्चिस्; हिं. बं. आच; का. इचु ] **०बसणें-लागणें**-पोळणें; चटका बसणें; डाग दिला जाणें. **-चींत असणें**-धाकांत-दराऱ्यांत असणें.

**आचकट**—अचकट पहा.

**आंचकणें**—उक्रि. १ जोरानें ओढणें; हिसका देणें; हिसडणें, २ तोडणें; खुडणें; सोलणें. ३ लुबाडणें, हिसकणें. ४ ( अश्लील ) *उपटणें, *विचकणें. [ सं. अंच्=जाणें; वांकविणें ]

**आंचका**—पु. १ एकाएकीं चलाखीनें ओढणें; ताण; खेंच; हिसका; एकदम दिलेला धक्का. ( क्रि० देणें ). २ भीतीचा धक्का; धसका. ( क्रि० बसणें ). ३ झटका; कंप. [ सं. अंच्; का. अंजिके= भय ? ]

**आचकूड, आसकूड**—पु. ( व. ) बैलगाडीचा आंस; आस. [ सं. अक्ष; सं. आंस ]

**आचकूल**—वि. ( गो. ) जायबंदी; लुला. अचकुल पहा.

**आचकोन**—पु. (वास्तुशास्त्र) ( अप. ) आर्चकोन; दोन शेजा-ऱ्या कमानी एकाजागीं मिळतात त्या जागीं होणारा कोन; स्प्रिजर वरील कोन [ इं. आर्चकोन ]

**आचंगणें, आचांगणें**—अचांगणें पहा.

**आचंगुल**—वि. कृपण; अचंगळ पहा. ' हीन आणि कृत्रिमी। रोगी आणी कुकर्मी। आचंगुल आणी अधर्मी। वासना रमे। '–दा २.३.१४. [ अ+चंगळ ]

**आंचणी**—स्त्री. आंच २ व ३ अर्थ. [ आंच. ]

**आंचणी**—स्त्री. ( कों. ) ओटी; ज्या घरीं लग्न वगैरे असेल त्या घरच्या बायकांची ओटी भरण्यासाठीं हळद, कुंकू, खण, नारळ, अक्षता इत्यादि साहित्य तबकांत भरून नेतात ती. [ सं. अर्चन; किंवा अंच्=पूजणें; प्रा. अचण ]

**आंचणी**—स्त्री. रवीनें घुसळण्याची दोरी. [ सं. अंच्=वळविणें ]

**आंचणें**—( गो. ) जमीन तयार करणें; जमिनीचा पोकळपणा घालविणे. [ गो. आंचप. सं. अंच् जाणें; फिरविणें ]

**आचंद्रार्क**—अ. सूर्य, चंद्र आकाशांत आहेत तोंपर्यंत; शाश्वत; चिरकाल; निरंतर; यावच्चंद्रदिवाकरौ. [ सं. आ+चंद्र+अर्क ]

**आचपळ**—अचपळ पहा.

**आचंबणें**—अक्रि. ( क. ) आश्चर्यचकित होणें; अचंबा वाटणें; नवल वाटणें. [ अचंबा ]

**आचंबा**—अचंबा पहा.

**आचमन**—न. १ धार्मिक कृत्याच्या आरंभीं शरीरशुद्ध्यर्थ उजव्या ( गोकर्णाकृति ) तळहातावर पाणी घेऊन तें मंत्र म्हणून पिणें, असें तीन वेळ मंत्रासह पाणी पिऊन चौथ्या वेळीं दोन्ही हात धुणें. या सर्व विधीस आचमन म्हणतात. कर्माच्या शेवटींहि दोन वेळ आचमन करतात. त्याप्रमाणें भोजनानंतरहि आचमन करतात. 'आचमन करून सागर। उदरामाजीं जिरविला॥' **०देणें**- आपोष्णी घालणें. ' कर वाहेना तुला आचमन शुद्धाला द्याया। ' –विक १. २ ( ल. ) एकदम गट्ट करणें; आचमनासारखें पिऊन टाकणें; मुखरोग नाहींसा करण्यासाठीं बाभळीच्या सालींच्या काढ्यांत तुरटी,मध घालून त्याच्या गुळण्या करणें.[सं. आ+चम्] **०पळी**-स्त्री. संध्येची पळी.

**आचमनीय**—वि. आचमन करण्यास योग्य ( पाणी ).

**आचरट**—अचरट पहा.

**आचरण**—न १ वर्तणूक; वागणूक; विधि; एखादें कृत्य करणें-पार पाडणें. २ व्रत, नियम; चाल; आचार; रीत; रिवाज. **०करणें**—बरहुकूम चालणें; नियम पाळणें; आचरणें; अभ्यासणें. [ सं. आ+चर् ]

**आचरणीय**—वि. १ आचरण करण्यास योग्य; पाळण्यास योग्य ( उपास, व्रत, विधि इ० ). २ अनुसरणीय; अनुसरण्यास योग्य; करण्यालायक.

**आचरणें**—उक्रि. १ आचरण करणें, ठेवणें; वागणें. ' वहिणी म्हणे ऐसे भक्त आचरित। तयासी भगवंत जवळींच। ' –ब ५४०.

२ चालविणें; करणें; उरकणें; अभ्यासणें. 'ज्या अंगना कधि न आचरिल्या तपातें ॥ ' [ सं. आ+चर् ]

**आचरय**—न. ( खा. ) आश्चर्य. [ सं. आश्चर्य अप. ]

**आचरित**—वि. १ आचरलेलें; पाळिलेलें ( व्रत, काम ); अभ्यासिलेलें; अनुसरलेलें –न. १ वर्तणूक; वागणूक; आचरण. २ (कायदा) कर्ज वसूल करण्याचा एक प्रकार–ऋणकोच्या दारांत उपाशीं बसणें.

**आँचवणें, आंचविणें**—अंचवणें पहा. [ सं. आचमन॰]

**आंचळ–ळी**—अंचळ–ळी पहा.

**आचांगळी**—वि. वाईट, अभद्र, निंदात्मक. अचांगळी पहा. 'आचांगळी अधिक शब्द । ऐकून उठिला वीर गद । '–एरुस्व ९.४. [ अ+चांगलें ]

**आचार**—न. लोणचें; अचार पहा.

**आचार**—पु. १ श्रुति–स्मृतींना अनुसरून वर्तन–वागणूक; विहित आचरण; शास्त्रशुद्ध वर्तन. **म्ह॰** दोन प्रहर आचार, नंतर अनाचार=बारा वाजेपर्यंत धर्माचरण करून नंतर विषयासक्त होणें किंवा दोन प्रहरपर्यंत धर्म कर्म केलें तर तो आचार व त्यानंतरचा अनाचार समजला जातो. २ ( सामा. ) वर्तन; वागणूक; राहाणी. सामाशब्द –शिष्टाचार; दुराचार, लोकाचार, कुलाचार; सदाचार, आचार–प्राप्त–युक्त–शील–प्रिय–वेत्ता; आचारानुमत–नुरूप इ. [सं. आ+चर्] ॰**पद्धति**—स्त्री. वागण्याची चालरीत; नेहमींचें आचरण, वर्तनक्रम; राहाणी. ॰**वृत–वान–शुद्ध–संपन्न**–वि १ कुलधर्म व कुलाचार व इतर रीतीभाती वकशीर व शुद्ध रीतीनें आचरणारा; सद्वर्तनी. २ योग्य; रीतीप्रमाणें. 'केवळ सलगीच्या मनुष्याबरोबर जरी देवघेव करणें झालें तरी खतपत्र करून करावें, कांकी कोणताहि व्यवहार आचारशुद्ध असावा.' ॰**प्रसिद्ध**–वि. लोकरूढींतील, शिष्टाचाराचा; शिरस्तेवाईक. [सं.] ॰**भ्रष्ट–वर्जित–हीन**–वि. विहित धर्मकृत्यें न करणारा, न आचरणारा; अनर्गल. बेशिस्त; धर्मलंड, अनाचारी. ॰**भ्रष्टी**–वि. आचारभ्रष्ट ( अशुद्ध रूप ). **म्ह॰** आचारभ्रष्टी सदा कष्टी. ॰**वाणं**–( गो. ) अमंगळ; अभद्र [ सं. आचार + विहीन ] ॰**विचार**–पु. शास्त्रविहित कर्मे, कुळाचार, धर्माचार, विधि संप्रदायशुद्ध आयुष्य घालविण्याचे मार्ग, नियम, शिस्त, मर्यादा इ०; शास्त्रोक्त आचार विचार. 'शहरांत राहिलें असतां तादृश आचारविचार रहात नाहींत.' ॰**शील**–वि. आचारसंपन्न, सदाचारी. ॰**शोधक**–वि. सदाचार व अनाचार यांचें परीक्षण करणारा, विवरण करणारा.

**आचारी**—पु ( प्र. ) आचार्य. १ गुरु; उपद्रष्टा; उपदेश करणारा. 'जैसी तैसी असो पुढिलांचे सोई । धरिती हातींपायीं आचारिये ॥' –तुगा १९०२. रामाचारी, कृष्णम्माचारी वगैरे नांवांत आचारी हें पद आचार्याचें अप. असतें. [सं. आचार्य.] २ स्वयंपाक करणारा; स्वयंपाकी; दुसऱ्याच्या घरीं स्वयंपाकाची नोकरी करणारा (विशेषतः ब्राह्मण जातीचा). [सं. आचार्य] ॰**पाणक्या**-पु. १ स्वयंपाक करणारा व पाणी भरणारा. २ (ल.) जड बुद्धीचा; अशिक्षित; ठोंब्या माणूस.

**आचारु**—पु. आचार; वागणूक. 'येरु आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा । ' –ज्ञा ३.२२०.

**आचार्य**—पु. १ उपनयन करणारा, वेदमंत्र शिकविणारा गुरु. २ उपाध्याय; धर्मकृत्यें चालविणारा; भटजी; पुरोहित. ३ धार्मिक पंथाचा संस्थापक, प्रवर्तक उ॰ मध्वाचार्य; रामानुजाचार्य. ४ अध्यात्मज्ञान करून देणारा 'जें जाणणें या आघवेयांचें गांवीं । गुरुत्वाची आचार्यपदवी । जें सकळ गुह्यांचा गोसावी । पवित्रां रावो ।' –ज्ञा ९.४७. ५ पंडित; निष्णात या अर्थी नांवाच्या पुढें लावण्यांत येणारी पदवी; प्रोफेसर. जसें– राघवाचार्य; व्यंकटाचार्य इ० ६ (ख्रिस्ती) मिनिस्टर याचा पर्याय; ख्रिस्ती लोकांचे धर्मविधि, संस्कार व उपासना चालविणारा दीक्षित; ख्रिस्ती धर्मोपाध्याय; सेवक. 'कोणीं कारण न दाखविल्यास आचार्यानें वधूवरांच्या आप्तांना पुढें बोलावून याप्रमाणें उपासना करावी'–उपासनापद्धति ३१, –ईवि १३८. –साप्रा. ६८. इ० ७ (उप.) आचारी; स्वयंपाकी. ८ आद्य शंकराचार्य; किंवा त्या पीठावरील अधिष्ठित व्यक्ति. 'आचार्यस्वामीची साजे उपमा ।'–सप्र २.९९. ॰**वरण**–न. धार्मिक कृत्यासाठीं आपल्या अंगत्वानें यजमान एखाद्या उपाध्यायाची धार्मिक पद्धतीनें योजना करतो तें; पौरोहित्य. 'कश्यपा दीधलें ब्रह्मासन । दत्तात्रेया आचार्यवरण ।'–कथा २.१८.६०. [सं. आचार्य+वृ] **आचार्योपास्ती**–स्त्री गुरुसेवा, आचार्याची पूजा. 'तें आचार्योपास्ती । प्रकटिजेल तुजप्रती । ' –ज्ञा १३.३७०.

**आचावाचा**—अचावचा पहा. 'काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचा । ' –तुगा २८०३.

**आचिरकाय**—स्त्री. ( गो. ) कल्पना, अंदाज, अटकळ.

**आंची**—अंची पहा.

**आचीर**—न. ( क. कुण. ) आश्चर्य. [ सं. आश्चर्य अप. ]

**आंचुक–चौक, आंचेवक–चुक**—(गो.) अंचवणें पहा.

**आचुडमूळ**—वि. आमूलाग्र; सर्वच. 'भग देखों लागे सकळें । आचुडमुळें पीतवर्णे. ' –एभा ५.१७४. [ सं. आ+चूडा+मूल ]

**आचुंबित**—अचुंबित पहा.

**आचुळ–चूळ, आंचूळ**—पु. १ गुराचें थान; सड; आंचळ. २ ( विणकाम ) विणून झालेल्या कापडाचे उरलेल शेवटचे धागे, ज्यास नवीन ताणा ( विणावयाच्या सुताचे उभे धागे ) जोडतात ते. या व इतर अर्थी अचळ, अंचल पहा [ सं. अंचल ]

**आचूक**—अचूक पहा.

**आचोज**—न. नवल; आश्चर्य; अचोज पहा. 'नंद नंदन हा आचोज आंधुला वो ' –निगा ६५. [ सं. आ+म. चोज ]

**आचांद्रा, अचुंद्रा**—वि. १ पिचकया किंवा चिपडया-डोळयाचा; अधु दृष्टि असलेला; २ (ल) बावळ्या मुद्रेचा. [सं. आ+तंद्रा=चंद्रा]

**आच्कलें**—वि. (गो.) एकटें; एकलें.

**आच्छन्न, आच्छादित**—वि. १ झांकलेलें; वर पसरलेलें; व्यापलेलें. २ लपविलेलें; गुप्त; गुपित. [सं. आ+छद्]

**आच्छरिय**—न. (गो.) आश्चर्य; नवल. [सं. आश्चर्य अप.]

**आच्छा**—अच्छ पहा.

**आच्छादक**—वि. १ झांकणारा; पसरणारा; व्यापणारा. २ लपविणारा; गुप्त ठेवणारा. [सं.]

**आच्छादणें**—उक्रि. १ झांकणें; पांघरूण घालणें (वस्त्र वगैरेनीं वस्तू इ०) २ छपविणें, लपविणें. [सं. आ+छद्]

**आच्छादन**—न. १ झांकणें; पांघरूण घालणें; आच्छादणें; व्यापणें; लपविणें, छपविणें. [सं.] २ गुप्तावस्था, गुप्त स्थिति; गुप्त असणें. ३ (सामा.) झांकण; पांघरूण; कपडे; वस्त्रप्रावरण. ४ आच्छादनाचें साधन; जसें- तरवारीचें म्यान; घराचें छप्पर; कीटकांवरील कोश. इ०

**आच्छुरित**—न.(अंगहार) (नृत्य.) उजव्या हाताने नूपुरकरण करणें, त्रिक फिरविणें व मग व्यंसितकरणांतील हात करून त्रिक फिरविलेलें नीट करणें, नंतर उजवा पाय अलातक करून त्याच पायानें सूची करणें व शेवटीं करिहस्त व कटिच्छिन्न करणें. [सं.]

**आच्यांव**—पु. (गो.) कांचेची बरणी. [पोर्तु. आशांव]

**आच्यावाच्या**—अचावचा पहा. 'आच्यावाच्या बोलवितो। ज्यामीं त्यारीं॥' -दा १३.९.१६.

**आज**—अज पाहा. हा शब्द व त्यापासून झालेल्या म्हणी-उ० आजीं नसणें इत्यादि, अजीं शब्दाखालीं पहा.

**आज**—क्रिवि. वर्तमान, चालू दिवस-काळ; या शब्दापुढें बहुधां दिवस शब्द येतो. जसें-आजचा दिवस. [सं. अद्य; प्रा. अज्ज; सिं. अजु; हि गु आज; बं. आइज; पं. अज्ज; गो. आंज] ०**उद्यां**-क्रिवि. पुढें ढकलणें, लांबणीवर टाकणें. (क्रि० करणें). 'त्याचें आज उद्यां दोन वर्षें चाललें.' ०**काल**-क्रिवि. चालू काळ; आतांशा; सांप्रत; या दिवसांत; सध्यां, हल्लीं, सांप्रतकाळीं. 'दीन-गरीब याचा समाचार घेणारा आज काल कोण आहे बाबा!' ०**तंव-तागाइत-यत, -पर्यंत**-क्रिवि. या दिवसापर्यंत; आज पावेतों. ०**दिन-पर्यंत**-क्रिवि. आज पावेतों ०**दिवसीं**-क्रिवि. १ गुदस्तां किंवा मागें या दिवशीं. २ आज; आजच्या दिवशीं. ०**लग**-क्रिवि. (हा शब्दप्रयोग फक्त लिहिण्यांतच उपयोगांत येतो, बोलण्यांत नाहीं) आतांपर्यंत. [अद्य+लग्न] ०**ला**-क्रिवि. १ आज; आजच्यासाठीं, करतां. 'मला आजला खर्चावयास कांहीं रुपये पाहिजेत.' २ आजच्या दिवशीं; एव्हांना. 'मुंज झाल्यापासून जर अध्ययन केलें असतें तर आजला पंडित झालों असतों.' ०**वर-वरी-वेरी-वैरी**-क्रिवि. आजपर्यंत; हा काळ पावेतों. ०**वर्दी-वर्ष-वर्षी**-क्रिवि. ज्या काळास आज वर्ष झालें तो काळ दाखविणें या अर्थी; तो दिवस; 'आजवर्दी आम्हीं पंढरीस गेलों होतों.' [आज+वर्ष] **म्ह**० १ आज माझा उद्यां तुझा=चालू घडीस काम करून घेणें, उद्यांवर न टाकणें. २ आज अमीर तर उद्यां फकीर.

**आजगर**—अजगर पहा.

**आजगा-गो**—(गो.) भाता (साळी)ची एक जात.

**आंजणी, आंजिणी, आंजणवाडी**—स्त्री. (कों.) रांजणवाडी; डोळ्याच्या पापणीस होणारा एक फोड-पुळी. [सं. अंज्=काजळ घालणें; अंजनावर्ती]

**आंजन**—पु. १ अंजन पहा. २ अंजनीपुत्र मारुती. [सं.]

**आजन्म**—क्रिवि. १ जन्मापासून; जन्मप्रभृति. या शब्दाच्या ऐवजीं **आजन्मपर्यंत, आजन्मापासून, आजन्मप्रभृति, आजन्मांत** इ० शब्द चुकीनें योजतात. [सं. आ+जन्म] २ (चुकीनें) मरणापर्यंत; जोपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत. जसें-आजन्म-सेवक=लाइफमेंबर. 'मी आजन्म ब्रह्मचारी राहणार!' -सु ५१. ०**मरण(णें)**-क्रिवि. जन्मापासून मरणापर्यंत.

**आजन्मतः**—क्रिवि. १ जन्मापासून. २ (चुकीनें) मरणापर्यंत; आमरण.

**आजन्मांत**—क्रिवि. १ जन्मापासून आजपर्यंत; आजतागायत. २ सर्व आयुष्यांत.

**आजम**—पु (व) सामर्थ्य; अजम पहा. 'तुमच्यांत तर आजम नाहीं.'

**आजमा**—पु. अजमोदा; ओवा; अजमोदा पहा.

**आजमावणें**—अजमावणें पहा.

**आजमावा**—अजमाव पहा. -वामन विराट ८.३१. (शर.)

**आजमास**—अजमास पहा.

**आंजरली, आंजुर्ली**—आंजणी पहा.

**आजराहे**—अजराहे पहा.

**आंजली**—अंजली पहा.

**आजवळ**—आजूळ पहा. 'राम म्हणे वत्से! तूं आजवळा पावलीस न वनातें।' -मो उद्योग. १३.८; -मोवन ६.५३.

**आजस्वारी**—अ. (आज स्वारी अमुक मुक्कामीं आहे वगैरे मायना). लष्करांतून; स्वारीमधून (हुकूम निघतो कीं=आज्ञापत्र निघतें जें). जुन्या कागदपत्रांत हा शब्द आज्ञापत्राच्या आरंभीं लिहितात. [फा. अझ्=पासून+स्वारी]

**आजा**—अजा पहा. 'वधिलें कैसें धनार्थ आज्याला!' -मोभीष्म १.२८. **म्ह**० १ आजा मेला नातू झाला=एकाच्या जागीं दुसरा आला. २ आज्यास नातू शिकवितो.

**आजागुरु**—अजागुरु पहा.

**आजात-द्**—वि. स्वतंत्र; मुक्त. अजात पहा. 'यांच्या मुलांमाणसांचें चाल्वून (त्यांस) आजात करावें.' –ऐटि १.२२. [फा. आझाद् =स्वतंत्र ]

**आजादी**—स्त्री. स्वातंत्र्य. [फा. आझादी ]

**आजादेवी**—स्त्री. एक क्षुद्र देवता (शूद्रादिकांची). [अजा+देवी]

**आजानुबाहु**—वि. उभा राहिला असतां ज्याचे हात गुडघ्यापर्यंत पोंचतात असा (मनुष्य). 'ऐकें आजानुबाहो नृपनाथा।' –एभा ३.७६. [सं. आ+जानु+बाहु]

**आजाबा**—आजोबा पहा.

**आंजाम**—अंजाम पहा.

**आजार**—पु १ रोग; दुखणें, व्याधि. २ (ल) उपद्रव; पीडा, जुलूम; त्रास. 'त्याणीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाहीं.' –रा ८ २४. [फा. आझार्; तुल. सं. आ+ज्वर]

**आजारणें**—अक्रि. आजारी पडणें, नादुरुस्त होणें; तंदुरस्ती नसणें. 'जोड्यापरी तुज घड बनवावें, आजारणी तूं नित।' –घड्याळ कविता (विवि. १९२२ डिसेंबर.)

**आंजारणें**—अंजरणें पहा.

**आजारी**—वि. दुखणाईत; रोगी; पीडित; बेमार; व्यथित. [फा. आझार्; तुल. सं. आ+ज्वर]

**आजास**—(कों. कु.) आजा पहा.

**आजि**—आज. 'आजि या म्हण रामयारी। आणि तूं आतां।' –लक्ष्मीनारायणकल्याण नाटक (शके १६०४.) 'प्रसन्न नाहीं मन आजि तूझें।' –सारुह १.१०. ०च्यानें–क्रिवि. आजपासून; यापुढें. 'काकुळती येती हरी। म्हणे आजिच्यानें मी न करी चोरी।' –ह ९.७०. [सं. अद्य. म. आज]

**आजि**—पु. रण; समर; युद्ध. 'कथिलें तेणेंचि तुझें विजयें मज आजि आजि–दक्षातें।' –मोद्रोण ११ २४. [वै. आजि=शर्यत, युद्ध]

**आजिजी**—अजिजी पहा.

**आजिमांय**—स्त्री. (गो.) आजेसासू.

**आजिमांव**—पु. (गो.) आजे सासरा.

**आजी**—अजी पहा.

**आजी**—क्रिवि. आज. 'आजी जरी ते असती। तरी मजला कदा न विशंभती।' –दा ३.४.३६. [सं. अद्य]

**आजीआजी करणें**—अजीअजी करणें पहा.

**आजीज**—वि. दीन. अजीज पहा. 'मारतां मारतां मरावें परंतु केवळ आजीज होऊं नये.' –भाब ७. [फा. आजिझ्=दीन]

**आजीबाई**—स्त्री. अजी, अजीबाई पहा.

**आंजीमांजी**—पु (कु.) लपंडाव खेळ.

**आजीव**—क्रिवि. जन्मभर; मरणापर्यंत; आयुष्यभर. उ० आजीव सभासद=लाईफमेंबर. (इं) [सं.]

**आजीवक**—पु. १ भिकारी; भिक्षुक. २ एक धर्मपंथ, अस्तित्व सुमारें खिस्तपूर्व ६ वें शतक. [सं]

**आजीस**—स्त्री. (कों.) आजी.

**आजीसबब**—क्रिवि. या कारणास्तव–साठीं, अजीसबब पहा. [फा.]

**आजु**—क्रिवि. (गो.) आज 'आजुच संपलें पूण;'

**आजुनि–आजून**—अजून पहा.

**आजुरदा–आजुरा–आजुर्दा**—वि. खिन्न, दुःखी, श्रमी. अजुरदा पहा. 'रामा नापास झाल्यामुळें आज तो फार आजुर्दा आहे.'

**आजूद**—न (गो.) बस्ति, एनिमा; पिचकारी. आज्यूत पहा.

**आजूबाजू, आजूबाजूस**—क्रिवि. आसपास, भोंवताली, सभोंवतालीं; जवळपास; शेजारीं. 'बैल शेतांत नसला तर तेथेंच आजूबाजूस कोठें असेल पहा.' [बाजू द्वि.; फा. बाझू=हात द्वि]

**आजूळ–आजोळ**—अजूळ पहा. ०वंश–पु. मातामहाचा वंश.

**आजेगुरु**—अजागुरु पहा.

**आजेचीर–वाण**—अजेचीर पहा.

**आजेसासरा**—पु. सासऱ्याचा किंवा सासूचा बाप; बायकोचा किंवा नवऱ्याचा आजा; आजेसासूचा नवरा. [आजा+सासरा]

**आजेसासू**—स्त्री. सासऱ्याची किंवा सासूची आई; बायकोची किंवा नवऱ्याची आजी, आजेसासऱ्याची बायको. [आजा+सासू]

**आजोबा**—पु १ बापाचा किंवा आईचा बाप. २ वृद्ध मनुष्यास आदरार्थी म्हणतात. [आजा+बा]

**आजोरा**—पु. १ कटकट; त्रास (जास्त कामाचा वगैरे). अजोरा पहा. २ विनाकारण लागणारा खर्च. [फा. आझुर्दा]

**आजोवळ, आजवोळ**—न. (गो.) आजोळ. 'त्ये कां आजवोळ आसात्?'

**आजोळा–ला, आज्वळा–ला**—अजवला पहा.

**आज्माईश**—पु परीक्षा; प्रत्यय. अजमावणें पहा. 'एक वेळ आम्ही स्नेह म्हटला तेथें चाल कसी पडती याचा आज्माईश नबाब साहेब यांस अद्याप नाहीं.' –रा १९.१०१. [फा. आझ्माइश्]

**आज्य**—न. १ शेळीचें तूप. २ (सामा) तूप (गाय, म्हैस इ० चें). 'आज्य मी समिधा। मंत्रु मी हवि।' –ज्ञा ९.२६७. –वि. शेळीसंबंधीं. [सं. अजा]

**आज्याबा**—आजोबा 'मामाजींस म्हणसि, तें न म्हण आर्ये आज्याबा।' –मोआदि ३२.७२. [आजा+बा]

**आज्यूत**—न. (गो.) एनिमा; वस्ति. 'ताका दिसपट्टें आज्यूत घॅवपाची संवय आसा.' आजूद पहा

**आझान**—न (मशीदीच्या मनोऱ्यावर उभें राहून केलेलें) नमाझ पढण्यासाठीं बोलावणें, हाकामारणें. [फा. आवाझिदन्]

**आझुइ-आझुणी, आझूं-ई, आझूण-णु-न-नि, आझौनि**—क्रिवि. अजून; अद्यापि 'अगा! जी हृषीकेशी आझुइ किती चाळविशी।' -शिशु. ७८. 'आझूई उजगरा किती। कराल तुम्हीं।' -शिशु १२२. 'आझौनि सांडौनि अहंकारातें।' -दाव. ३७६. [अजून]

**आझोडणें**—क्रि. चांगलें झोडणें; ठोकणें; मारणें. 'विकारें विचारातें आझोडी।' -भाए १८२;१९५;४३७. [सं. आ=आम-मंतात्+म. झोडणें]

**आट**—स्त्री. अट पहा. १ हट्ट; हेका. 'नाहीं चाखून कोणी पाहिलें वृथा आट धरणें। इंद्रास पाहिल्यामुळें भगेंद्र भरणें.' प्रला. १९२. २ (ना.) मिजास; अभिमान; पीळ; ताठा; दिमाख. ३ वेढा; वळसा; पीळ. 'भीतरु भरला आटा। आदि शंखाचे या सेवटा' -ऋ. ९२. ४ अडचणीची जागा, आडवाट. 'मार्गे रोधिला देखोनी आट। मार्गस्थातें मांडिला अनर्थ।' -मुवन ७.१७९. [का. अड्ड; म. अट]

**आट**—पु. संताप; त्रास; अटअट पहा. [सं. आर्त; प्रा. अट्ट]

**आट**—स्त्री. १ घारगे मऊ होण्यासाठीं कण्या उकडून त्यांत पीठ घालून तयार करतात ती; शिजलेल्या तांदुळाच्या कण्या. २ -पु. आटवलेला पदार्थ. 'वेधाचा वळसा। चैतन्याचा आट भवे जैसा।' -शिशु५९५. ३ आटणी. ४ (ल.) नाश; शेवट. 'विकळ देखोनि दळभार। मागधवीरीं केला मार। आट भविन्नला थोर। हाहाकार उठिला॥' -एरुस्व १०.४२. [का अट्टु=शिजविणें; म. आटणें]

**आटक**—न. (कों.) करवंदासारखें एक फळ. हें पिकल्यावर आंत-बाहेर लालसर होतें.

**आटक**—न. (गो.) नारळाचा वाळलेला गोटा, पाणी आटलेला नारळ. [का. अट्टु=आटणें]

**आटक**—स्त्री. कैद; प्रतिबंध; अटक. पहा.

**आटकमाटक**—१ लहान मुलांचा एक खेळ. या खेळांतील गाणें-'आटकमाटक। चवे चाटक। चवे झाले गोड गोड। त्यावर बसला। रामजी पोर। रामजी पोराचे हातांत। तुळशी माळा एक एक हात फुलल्यो॥' =रांजणगांव म्हणून एक गांव आहे, त्याला लागून असलेल्या डोंगरावर उंबर व मत्तीसारखीं मोठालीं झाडें व चत्तीसारखीं व बाभुळीचीं लहान झाडें दाट उगवलेलीं आहेत. तेथें उन्हही पडतें. पाऊसहि थोडाबहुत पडतो. तर मग पीक कां बरें आलें नाहीं. -चित्रमयजगत् (डिसें. १९१६) कानडींत या खेळाला अंटकमंटक म्हणतात. [का. अत्ति=उंबराचें झाड; मत्ति=एक झाड]

**आटकळणें**—अटकळणें, अडखळणें पहा.

**आटका**—पु (क.) आठ बियांचें फळ. [अष्टक]

**आटंका, आटांका**—अटका पहा.

**आटकाटी**—स्त्री. (गो.) आडकित्ता. 'आटकाटेन मात्सा बॅडॉ कातरून दी'

**आटकांड**—न. (क.) ज्यांतील पाणी आटत आलें आहे असें डबकें. [का. अट्टु=आटणें+म. कुंड]

**आटंकाळ**—अटंकाळ पहा.

**आटकी**—स्त्री. १ अटकी पहा. २ आठ माणसांचा समुदाय; वजन; आठ माणसांनीं वाहून नेण्यासारखा पदार्थ. आठका-की पहा. [सं. अष्टक]

**आटकूल, आटुक**—न. १ (क.) आठ चिचोक्यांचा समुदाय. 'आटकूल कर,' 'आटुक झाला.' २ अटकी पहा. [सं. अष्ट+कुल; अष्टक]

**आटकें**—न. १ अच्छेर; अर्धा शेर; मापटें; पायलीचा अर्धा भाग. आठकें पहा. [सं. अर्धक] २ (वेंदुलाचा खेळ) अट पहा.

**आटखोर, आटणी, आटणें, आटताकाळ, आटदार, आटप-पणें, आटपता, आटपसार, आटपळ, आटपा-अटप**—अ मध्यें पहा.

**आटघन**—वि. (व.) अडून बसणारा; लवकर न वळणारा. [का. अड्ड]

**आटघाट**—अटाघाट पहा.-स्त्री. १ त्रास देणें; छळणें; कुतर-ओढ करणें. २ त्रस्तावस्था; श्रम; त्रास; छळ; खराबी, नाश. 'देशांत होईल खट आटघाट।' -दावि २११. [आटणें+घाटणें]

**आटछाट**—स्त्री. १ आग्रह; हट्ट; छांदिष्टपणा. २ फाजील टापटीप; बातबेत; व्यवस्थितपणा; कडक तंनोतंतपणा; चोखंदळपणा. (क्रि० करणें-धरणें-लावणें). ३ शेलक्या शेलक्या-निवडक वस्तु; मासलेवाईक (वाईट अथवा चांगले) पदार्थ. **-टीचा**-वि. १ मासलेवाईक, निवडक. २ बारीक पाहणारा; चोखंदल; कडक बातबेताचा, शिस्तीचा; शिष्टाचाराकडे फार लक्ष देणारा. [आटणें+छाटणें]

**आटण**—न. प्रवास; पर्यटन. अटण-न पहा. 'समस्त भरतखंडीं आटणें केलीं।' -सप्र ३.५.

**आटण**—अटणी पहा. ०**कळा**-स्त्री. उतरती कळा.

**आटणी**—स्त्री. अटणी पहा. १ नाश.'जन्म कर्माची आटणी।' -दा ३ १.२. २ नाश. 'हे महाभूतांची फुडी। आटणी देखा॥' -ज्ञा ६.२९०. ३ श्रम; त्रास. 'नेणतां सोसिली तयाची आटणी।' -तुगा १५३२. ४ आटविणें. 'त्याची जंव जंव आटणी कीजे। तंव रसपाक ते शर्करादि निपजे।'-रंयो ८.२८. ०**पडणें**-क्षीण होणें; व्यर्थ खर्ची पडणें.' एऱ्हवीं नरदेहाही येवढें। धन आटणीये पडे।' -ज्ञा १८.६१६.

**आटणें**—१ अटणें पहा. 'तैशी सुबद्ध आटली।' –ज्ञा ६. २२५. 'दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती।' –केका ५८ २ आटोपणें; मार्गे हटविणें; पराभव करणें. 'शिक्षोत्साह बळानें कोणी कोणासि त्यांत आटेना' –मोकर्ण ४७.५५. कमी होणें; नाश पावणें. ३ मरणें; मारणें; नष्ट होणें. 'वैरी एकदांचि आटावे।' –रावि ३१.२०९. 'अपराह्णीं बहु दारुण रण झाला, फार आटलें कटक।' –मोकर्ण १९ ३. 'कित्येक म्लेंच होऊन गेले। कित्येक फिरंगणांत आटले।' –दा १५.२.३. [का. अट्टिसु]

**आटतीपरी**—स्त्री. हट्टाची वागणूक, वर्तणूक. 'चित्तीं कष्टी होतसे भारी। आटती परी देखोनिया॥' [अट=अडणें+सं. प्रति=परी]

**आटप**—(गो.) अटपणें पहा. 'आटापां येना'=आटपत नाहीं. शिवाय आटोप पहा.

**आटप**—पु. उरक; अटप, आटोप पहा (कामाचा) ०**असणें**–कामाची माहिती असणें; उरक असणें.

**आटपणें**—अटपणें पहा. 'धीर धरोनी आटप म्हणुनी बाष्पें मजसाठीं।' –केका ४१.

**आटपता, आटपसार**—अ मध्यें पाहणें.

**आटपाट**—पु १ मुलींचा एक शिवाशिवीचा खेळ. या खेळांत एकीवर डाव असून तिनें इतर मुलींना शिवावयाचें असतें. या खेळांत डाव घेणारी मुलगी इतर मुलींना शिवावयास लागली तर त्यांनीं (खेळांत) बसावयाचें (छापापाण्याप्रमाणें) नसतें; पाठशिवणीचा खेळ. (क्रि० घेणें; खेळणें). –स्त्री. १ (ल.) गळ घालणें; गळीं पडणें; आग्रह, नेट धरणें. (क्रि० धरणें). २ ठामपणा; पक्केपणा. [आट+पाट. प्रा. अट्ट=फार]

**आटपाटनगर**—न. १ कोणतें तरी निनांवी, रहदारीचें गांव. [सं. अट्=गमने व पट्=गमने=आलेंगेलें गांव (राजवाडे)]. २ आठ पेठा असलेलें मोठें शहर. [सं. अष्ट=आठ+पट्ट=पेठ] ३ बाजाराचे आठ चौक असलेलें शहर. [अट्ट=बाजार+पट्ट=चौक; पेठ] ४ आठ मोठे राजरस्ते असलेलें गांव. [अष्ट+पथ=पाट; कोंकणांत गुहागर या गांवीं एका रस्त्याच्या दोन बाजूस सारखी वस्ती असून त्या वस्तीच्या दोन वेगवेगळ्या भागांस खालचा पाट व वरचा पाट अशीं नांवें आहेत.] कहाण्यांतून नेहमीं हा शब्द आरंभीं येतो. उ० आटपाट नगर होतें, तिथें एक ... वगैरे. [तुल० गु. पाडा=भाग, वस्ती, पेठ. उ० नवापाडा]

**आटपिरड**—(व) धुसफुस; वैमनस्य; रुसणें; फुगणें; रागावणें.

**आटपीठ**—अटापीटा पहा.

**आटफाट**—(गो.) आटपाट खेळ पहा.

**आटबाज**—अटबाज पहा.

**आटरणें**—अटरणें पहा.

**आटवणें-विणें**—क्रि. १ (सोनारी धंदा) सोनें, रुपें इ० धातूंचा रस करणें; अटण्याची क्रिया करणें. २ द्रव पदार्थ उष्णतेच्या साहाय्यानें घट्ट करणें, अटतील असे करणें ३ (ल.) कमी करणें, ठार मारणें. 'द्रौणिपराभवकाळीं त्यां कौरव सैन्य फार आटविलें।' –मोकर्ण ४०.३४. [अटणें प्रयोजक]

**आट(ठ)वल-ली-लें**—पुस्त्रीन. १ (कों.) तांदूळ किंवा तांदुळाच्या कण्या; यांत पाणी अधिक ठेवून त्यांचा पातळसर भात करतात तो; कण्हेरी; पेज. 'श्री महालक्ष्मि देविगि प्रातकालि आटवलिग्च्या उपहारागि दिधलें' –शक १३३५ चा बांदिवड्याचा शिलालेख [का. अट्टु=शिजविणें]

**आटवा**—पु. (ना.) दगदग; त्रास. [सं. आर्त; प्रा. अट्ट; म. अट]

**आटवाल**—(क) तांदुळाची कण्हेरी. आटवल पहा.

**आटविणें**—क्रि (ना) त्रासविणें; रडकुंडीस आणणें [आटवा]

**आटवी**—स्त्री. एक मादक वनस्पति; हीस पांढरीं फळें येतात.

**आटा**—पु १ (यंत्र) स्क्रूचा फेरा-दोरा-कंगोरा; पेंच २ वाटोळें कडें-वेढें (तबला, पींप व जुन्या काळच्या तोंडयाच्या बंदुकीच्या नळीस वळकटी येण्यासाठीं बसविलेलें.). ३ लहान मुलांचें खेळण्याचें लोखंडी कडें, जें मुलें रस्त्यानें पळवीत नेतात तें. ४ एखादा पदार्थ आवळून बांधण्यासाठीं द्यावयाचा दोरीचा वेढा; विळखा; वळसा. (क्रि० भरणें; बसणें). (सामा.) पीळ. ५ (कों. राजा.) छत्री, इरलें यांचा सांगाडा. [सं. अट=भ्रमणें, सं. अट्टन=चक्राकार शस्त्र]

**आटा**—पु. (हिं.) गहूं इ. धान्यांचें पीठ 'आमचाच आटा बंद जाला' –भाव १३०.

**आटा**—पु. (कों.) गाडीच्या दोन धुऱ्या (दांड्या) मधील तिसरें लाकूड. [अट]

**आटा**—पु. (का.) खेळ; नाटक सन १८४१ च्या सुमारास प्रथम कानडी नाटकमंडळ्या सांगली-मिरजेकडे आल्या, तेव्हां हा शब्द मराठींत शिरला. [का.]

**आटाआट-टी**—स्त्री. १ खटपट; श्रम; दगदग; अटअट; अटाअट; अटाट-टी पहा. २ धुमाकूळ, घोटाळा; नाश; गडबड. 'यादवांचेआं कटकां भीतरी। पारकां आटाआटी केली थोरी।' –शिशु ९८८. –एभा ३.८२४.

**आटाघाट, आटापीटा-टी-पिट, आटाळी**—अमध्यें पहा.

**आटाट-आटाटी**—अटाट-अटाटी पहा. 'निवासस्थानाची आटाटी। सर्वथा पोटीं न धरावी।' –एभा ७.४०. शिवाय १२.५९१. 'जर मराठी भाषा होतां होतां इंग्रजीच बनली तर आपल्या लोकांचा तींत ग्रंथ लिहिल्याचा आटाट सर्व केवळ व्यर्थ झालासें होईल!' –नि ६.

**आटाट्ट**—वि. ( माळवी ) अतिशय; फार. ' आटाट्ट जेवण झालें. ' [ हिं. अटाट्ट ]

**आटाणू**—पु. ढाल, तरवार बाळगणारा शिपाई. [ सं. अट्टन=ढाल ]

**आटाप**—पु. ( गो. ) व्याप; पसारा. ' ताणें लग्नाचो आटाप व्हॅड्लॉ धल्ला. ' [ आटोप ]

**आटापाणी**—१ पीठ व पाणी; दररोजची शिधासामग्री. २ जीविताचें साधन; अन्नाची वेगमी. [ हिं आटा+म. पाणी ] ०**बंद करणें**–तगादेदारानें कुळाच्या दारांत बसून कुळाचें जेवणखाण बंद करणें.

**आटापिटा–टी, आटापेट**—अटापीटा पहा. ०**पाडणें**–मेटाकुटीस आणणें. ' खऱ्याखुऱ्या पोटच्या पोराच्या लग्नांत त्या विहिणीचा बया किती आटापिटा पाडील तें एक देव जाणें. ' –फाटक ( नाट्यछटा ) १.

**आटाफंड**—पु. ( धान्याचा, पिठाचा ) मुष्टिफंड ( मूठभर धान्याची मागणी ). ' पंजाबांत आर्यसमाजाचे मिशनरी आटाफंडहि...गोळा करतात. ' –टि ४.५११.

**आटारा**—पु. ( गो. ) अटापिटा; श्रम; आटा. अटारा पहा.

**आटारोटा**—अटारेटा-रोटा पहा.

**आटालें–ळें**—न. ( कों. ) गुरांना पाणी पिण्याचें एक विशिष्ट आकाराचें लांकडी भांडें. [ ? ]

**आटास**—अट्टाहास पहा. ' हाक फुटली आटासे '–उषा१४१९ [ सं. अट्टाहस ]

**आटाळ**—पु. अडथळा. –शर. अडल पहा. [ अट–ड ]

**आटाळ–ळा–ळी–ळें**—पुस्त्रीन. माळा; गच्ची. अटाळा–ळी–ळें पहा. ' मोडिल्या गोपुर आटाळी । '–मुवन ३.५.

**आटिवेटी**—स्त्री. १ श्रम; कष्ट. २ ( ल. ) येरझारा. अटिवेटी पहा. ' तें अभ्र आल्यागेल्यापाठीं । सुर्यासि न पडे आटिवेटी ' –एभा २८.३३७. [ आटी द्वि. ]

**आटी**—स्त्री. १ श्रम; यत्न; खटपट. ( क्रि० काढणें ). 'तयातें इंद्रियबैलांची पेटी । न म्हणे अवसीं पाहाटीं । विषयक्षेत्रीं आटी । काढी भली '–ज्ञा १३.२९. ' चिंतिलें पावलीं जया कृष्णभेटी । एरवीं ते आटी वायांवीण । –तुगा ९८. २ मिटी. अढी पहा. 'प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रमदा घे आटी । '–ज्ञा १३.७८५. ३ ( गो. ) ( गोण वगैरे एकावर एक ठेवून केलेली ) उभी रांग; अढी. ' पांचव्या आटयेंतलॉ एक तांदलॉचॉ साक ( पोतें ) ताका दी ' [ अढी ] ०**चें रेशीम**–न. ( चांभारी धंदा ) जोडयास भरतात तें एक प्रकारचें रेशीम. अटी ( रेशमाची लड ) पहा.

**आटीक**—स्त्री.न. एक झाड व त्याचें फळ.

**आटीचा, आटीबाज, आटीव, आटोका, आटोपणें, आटोपता, आटोपसार, आटोपी**—हे शब्द अ मध्यें पहा.

**आटीव**—वि. पीळदार. अटीव पहा. ' जो आटींव जेठिया ऐसा ' –मुसभा ६.१५३.

**आटु–ट्ट**—पु. लय, आटणी; नाश. ' तंव शब्दाचा दिवो मावळला । मग तयाहि वरी आटु भविन्नला । '–ज्ञा ६. ३१४. ' आटु भवीनला यादवा '–उषा १६८८. [ आटणें ]

**आटु**—पु. हट्ट. अट पहा ' आटु वेगु विंदाणु । '–ज्ञा १३. २७१. [ का. अट्टु ]

**आटु**—वि. कष्टपूर्ण; वेदनायुक्त. ' आटु भवंडिला सिहा रिसाचा । एक पाडू या फिलिस्तेवाचा । '–खिपु १ २४.४५. [ प्रा. अट्ट; सं. आर्त; म. अट ]

**आंटुळणें**—१ ( व. ) आंकुचित होणें; आक्रसणें. ' कापड आटुळलें. २ ( व. ) हट्टून बसणें; रुसणें ' आटुळतोस तर आटुळ ' [ अटणें ]

**आटू**—वि. ( व. ) हट्टी; कुढणारा. आटु पहा.

**आटू**—वि. १ कोरडें. २ दुर्बोध. –शर

**आंटू**—पु. शरीराचा संकोच; आटुळणें. [ अटणें ]

**आटेजणें**—क्रि. आटणें; आळणे. अटणें पहा.

**आटेविटे; आठेविठे**—पु.अव. १ (गो.) आळेपिळे; आळोखेपिळोखे. [ का. अट्ट, म. अटी-ढी ] २ आढेवेढे. ३ ( गो. ) उबग.

**आटोकाट**—अटोकाट पहा. ' आटोकाट मिळाले आटोकाट स्वदृष्टिचा म्हणती । ' –मोअनु ३.८३. त्याचें आटोकाट ज्ञान व अपूर्व रचनाचातुर्य हीं लक्षांत येऊन मन अगदीं थक होऊन जातें ' –नि ५७६. [ सं. आ+कंठ ]

**आटोप**—पु. १ सामर्थ्य; आवेश. ' सूर्यउदयपर्यंत कोपें । प्राची जिंतिली आटोपें । ' –मुआदि २१.१२. २ पसारा; व्याप. ' व्यापेंविण आटोप केला । ' –दा १९.८.१५. ' सुखद सृष्टीचा आटोप । वेदांत्या अध्यारोप ! ॥ '–टिक १६२. ३ ' संघटना; सुयंत्रणा; व्यवस्था. ' गेले बहुत आटोपाचे । कार्यकर्ते । '–दा ३.९.५१. ४ बंदोबस्त; नियंत्रण; निर्बंधन; संरक्षण. ' गुरें शेतांत येतात तर आपले शेताचा आटोप करा. ' ५ अभिमान; गर्व; ताठा; डौल. ' आपलेनीचि आटोपें । धनित्वाचेनि दर्पे । '–ज्ञा १७.९५. ६ जोर, अतिक्रम; प्रभाव; क्षोभ. ' ज्वराचेनि आटोपें । रोगी भलतैसें जल्पे । '–ज्ञा १६.३६४. ७ आवर; उरक; आवरशक्ति. ' एवढा कारभार झेंपावयास त्याचे अंगीं आटोप नाहीं. ' ८ स्वाधीनता; ताबा. ' प्रकृतीचेनि आटोपें । वर्ततु असे ॥ ' –ज्ञा ३.१८४. ९ संधान. –शर. १० अटप पहा. [ सं. आटोप=व्याप, पसारा यावरून ताबा; म. अटपणें ]

**आटोपणें**—क्रि. अटपणें पहा. १ लहान करणें. 'आटोपी मूर्तिप्रति (स्वतःच्या) मारुति हा कविहि तद्विशाल कथा।' —मोवन ५.७२. २ आवरणें; मागें घेणें; गुंडाळणें; संपविणें; नाहींसें करणें. 'प्रभुवर तें विश्वरूप आटोपी'—मोउद्योग १०.२०. ३ (पुढें गेलेल्यास मागच्यानें) गांठणें. 'आटोपिलाचि गेला होता जरि भीमसेन दूरवर।' —मोऐषिक २.३. ४ ताब्यांत घेणें; व्यापणें. 'जै देहीं आटोपे पित्त'—ज्ञा १४.१९६. ५ उरकणें; सांभाळणें. 'आटोपसील संसारु।'—दावि २२. ०शुद्ध—वि. नीटनेटका; नेमस्त; आटोपसर.

**आटोळा**—अटवळा, अटाळा पहा.

**आटोळा**—पु. (नाविक) वल्हें अडकविण्यासाठीं नावेवर असलेला खुंटा. हा पेरजेस पाडलेल्या भोंकांत बसविलेला असतो. [अट; का. अड्ड]

**ऑट्ट**—न. (गो.) बाग; बगीचा. [पोर्तु. हॉर्टा]

**आट्टखुरी**—वि. गाभण (मेंढी वगैरे); आठ खुरी म्हणजे तिचे चार व कोंकराचे चार खुर धरून. [सं. अष्ट+खुर]

**आट्यापाट्या**—स्त्री. एक महाराष्ट्रीय खेळ. एकानें दुसऱ्यास ठराविक जागेंत—पाटींत—अडवावयाचें व दुसऱ्यानें त्याला हुलकावणी देऊन निसटून जावयाचें अशी खेळाची ठोकळ रूपरेषा आहे. यांत खेळणाऱ्यांच्या दोन बाजू असून दर बाजूकडे सुमारें आठ गडी असुन त्यांत एक सूरकरी व सात पाटी धरणारे गडी असतात. सुराचा उभा पट्टा असुन पाटीच्या आडव्या पट्ट्या असतात. [सं. अष्ट+पट्टिका; का. आटा=खेळ; पाट द्वि.]

**आठ**—वि. १ आठ ही संख्या. २ (ल.) अष्टसिद्धी. 'शिणल्या बहुत चौसष्टी। आठ जणी बहुत कष्टी।'—ह ३.४. [सं. अष्ट; प्रा. अट्ठ—अठ; ग्री. लॅ. ऑक्टो; झें. अस्तन्; फा. हश्त] म्ह० १ आठीं जेवणें, मठीं निद्रा=भिक्षा मागून (आठ जणांकडून) राहणें व कोठें तरी झोंपणें. उडाण टप्पू भटक्या माणसाला लावतात. २ आठ हात लांकूड, नऊ हात ढलपी=अतिशयोक्तीनें सांगणें, बोलणें. ३ आठ परदेशी, नऊ चुली (चौके) किंवा ४ आठ पटेल, नऊ चौधरी किंवा ५ आठशें लष्कर, नऊशें न्हावी=ज्या कामास थोडीं माणसें पुरतील तेथें विनाकारण जास्त माणसें लावणें. ०आणी—स्त्री. अर्धा रुपयाचें नाणें; अधेली. [आठ+आणा]

**आठऊ**—पु. आठव; स्मरण; आठवण. 'देहेबुधिचा आठऊ नाठवावा।'—राम १६९. [आठवणें]

**आठका**—वि. आठ संख्या किंवा तिनें युक्त; आठांनीं मिळून झालेला; आठांनीं बनलेला किंवा आठजण लागतील किंवा आठ जणांना योग्य असें; उ० आठ हमालांचें ओझें; आठ मणांची खंडी 'सुरती खंडी आठकी.' —पु. (ना.) आठ मणांचें माप (खंडी) [सं. अष्टक]



**आठकी**—स्त्री. १ आठका पहा. [अष्ट] २ आठवैलांमागें एका बैलाच्या जकातीची जी सूट जकातदार देतो ती. ३ सागरगोट्यांच्या खेळांतील एक प्रकार आठ खडे एका वेळीं गोळा करून वर उडविलेला नववा खडा झेलणें. अटकी पहा

**आठकें**—न. १ अटकें पहा २ अच्छेराचें माप. [सं. अर्धक]

**आठकें**—वि. (गो.) आठवें. 'हें वर्स आठकें आसा.' [अष्टक]

**आँठखणें-ओंठखणें**—क्रि. (गो.) अटकून (भिंतीस वगैरे) बसणें; टेकून बसणें. 'भिंतिक ऑटखॉन वसूं नाकां.' ओटंगणें पहा.

**आठंगुळ**—अठांगूळ पहा.

**आठघात**—पु. एक वाक्प्रचार. आठव्या महिन्यांत (गर्भाच्या) जन्मलेलें मूल जगत नाहीं या अर्थानें; याच्याच पुढें सातारें म्हातारें=सात महिन्यांचें मूल म्हातारें होतें असें म्हणतात.

**आठणी**—(गो.) अटणी पहा.

**आठतीस**—वि. (गो.) अडतीस. [सं. अष्टत्रिंशत्; प्रा. अट्ठतीस]

**आठनहाण-न्हाण**—न. लग्नानंतर आठव्या दिवशीं वधुवरास स्नान घालण्याचा एक सोहळा. या प्रथम महिन्यांत या प्रमाणें चार स्नानें असतात. जसें—आठन्हाण; दसन्हाण; सोळन्हाण; मासन्हाण इ० किंवा आठबंधन; दसबंधन; सोळबंधन; मासबंधन इ० 'वरात आणि आठनहाणें। कनकवस्त्रें नाना भूषणें'—कथा ३. ७.१९२. कोल्हापुराकडे **आठणाण** असें (अप.) रूप आढळतें [सं. अष्ट+स्नान]

**आठपाठ**—आटपाट पहा.

**आठबैली**—वि. आठ बैलांनीं ओढली जाणारी (मोट, नांगर इ०)

**आठभाव**—अष्टभाव पहा. 'आठाभावांची परवडी। उभवूनि स्वानंदाची गुढी।'—एरुस्व ५.७९.

**आठमुठ्या**—वि. अडमुठया; अडमूठ—ठ पहा.

**आठयो**—पु. (गो.) तांब्याचें जुनें नाणें.

**आठरणें**—अटरणें पहा.

**आठरा**—अटरा पहा. 'साही त्रिकुट आठरा रांडे तेहि वेडावलीं'—दावि १२३. ०आणेअबरू—स्त्री. मोठी कीर्ति. 'विलायतेंत आठरा आणे अबरू आमच्या प्रभूची असे'—होला १८५. ०नारू-अलुतेदार—पुअव. तेली, तांबोळी, साळी, सनगर, शिंपी, माळी, गोंधळी, डौरी, भाट, ठाकर, गोसावी, जंगम, मुलाणा, वाजंत्री, घडशी, कलावंत, तराळ किंवा कोरबू, भोई इ० —गांगा १४. अलुता—त्या पहा.

**आंठल**—स्त्री. (कों.) फणसांतील बी; अठळी. [सं. अष्टि प्रा. अट्ठि]

**आठव**—अठव पहा. (क्रि० करणें; देणें). 'अपराध नसे केला, स्मरण नसे काय? मन न आठव दे' –मोउद्योग ९.४३. ०**देणें**–आठवण करून देणें; स्मरण करविणें. 'उद्धवा तूं जाय मथुरापुरा। आठव देई यादवेंद्रा।' –ह २१.१९१.

**आठवगाठ**—स्त्री. एखाद्या गोष्टीचा विसर न पडावा म्हणून धोतरास गांठ देतात ती. [आठव+गांठ]

**आठवगात**—स्त्री. (गो.) फराळाची वेळ. (टिफिन टाईम) [आड+वखत]

**आठवगिरी, आठवडकरी, आठवडा–ड्या, आठवडेपाईक, आठवा–वें, आठली, आठांगळें, आठांगुळें–आठी**—अ मध्यें पहा.

**आठवडा**—पु. अठवडा पहा. तेथें दिलेल्या व्युत्पत्ती खेरीज पुढील विवेचन पहा. [१ नेमाडांत सात या संख्येला हाट म्हणतात. सात दिवसांची मजुरी देतात तिला हाटवटी म्हणतात. हाट=बाजार. बाजाराचे दिवशीं मागील सात दिवसांची मजूरी देतात. बहुधां या हाटवटी शब्दावरून हाटवडा=आठवडा असा शब्द निघाला असावा. २ (राजवाडे मत) हा शब्द अशिष्ट लोक अठावडा असा उच्चारतात व तोच उच्चार व्युत्पत्तिदृष्ट्या इष्ट आहे. अष्टावर्त (स्वार्थे क)–अट्ठावडअ=अटावडा=आठवडा. आठव्या दिवशीं ज्या कालमानांत त्या वाराची आवृत्ति अथवा आवर्त होतो तो आठवडा; दुधाचा आठवडा=दुग्धस्य अष्ट दिवसावृत्ति.' –भाअ १८३२.] –**डी कौल**–पु. (कों.) देवाजवळ आठ दिवस गुण मागण्याबद्दलचा प्रश्न; शकुन.

**आठवण**—स्त्री. १ स्मरण; सय; याद; आठव; पुन्हां लक्षांत किंवा ध्यानांत आणणें; स्मृति. २ आठवणीकरितां ठेविलेली वस्तु; यादगिरी. [सं. आ+स्थापन; प्रा. आठ्ठापण]

**आठवणीचा**—वि. ज्याची स्मरणशक्ति चांगली आहे असा. ०**धड–आटोकाट–बहादुर–खबरदार**–वि. चांगल्या आठवणीचा; स्मरणशक्ति उत्तम असणारा.

**आठवणूक**—स्त्री. १ दूर असलेला किंवा मृत झालेला जो आपला इष्टमित्र त्याची आपणास आठवण होण्यास कारण जी वस्त्र इ० वस्तु ती; आठवणीचा पदार्थ. २ त्या योगानें त्याचें जें स्मरण होतें ती. आठवण पाहा.

**आठवणें**—उक्रि. आठवण करणें, होणें; स्मरणांत, लक्षांत, ध्यानांत, मनांत येणें. 'बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडि घडी मला गे!।' –शारदा २२.

**आठवणेस**—क्रिवि. आठवणींत; जाणोपरी पहा.

**आठवता**—वि. आठवण करणारा. 'दास म्हणे ते दैवाचे। आठवत रघुरायाचे।' –दावि ५०३.

**आठवर**—वि. १ अठवर पहा. 'ज्यांचा विवाहयोग्यकालांत नुकताच प्रवेश झालेला आहे, त्यांना नव+वर–नोवरा–नवरी असें म्हणतात. विवाहयोग्यकाळ सुरू होऊन अर्धवट गेला तरीहि ज्यांचा विवाह झाला नाहीं त्यांना अर्धवट म्हणजे आडसर किंवा आठवर म्हणतात.' –मसाप १.२.८. २ (कातकरी) कुमारी –मसाप १.१.२.

**आठवल**—न. (गो.) मेथी, तांदूळ वगैरे घालून केलेली खीर. (बारश्यास नामकरणविधीच्या प्रसंगीं ही करण्याचा प्रघात आहे). 'तांगेर आज पाळण्यांत घालतात, आठवल बी खूब कॅलां.' आटवल पहा.

**आठवळा**—आटोळा पहा.

**आठवा**—पु. १ अठवें पहा. २ (गो.) अर्धीपड (माप); आठवो: पायलीच्या आठव्या भागाएवढें माप. 'ती पायली आनी तॉ आठवॉ मात्सॉ ताका आठवा व्हरून दी.'

**आठवा**—वि. क्रमानें मोजिलें असतां सातव्यानंतर येणारा.

**आठवी**—स्त्री. (व.) अष्टमी; विशेषतः आश्विन वद्य अष्टमीस म्हणतात; 'आठवीपासून दिवाळी आठ दिवस राहाते.' ०**मासळी**–स्त्री. (कों.) दुसऱ्या गांवाहून भरून आलेल्या सुक्या माशांच्या होड्यांवर ऐन जिनसी बसविलेली जकात.

**आठवेठ**—स्त्री. आठ दिवसांतून एक दिवस खोत प्रत्येक कुळाकडून फुकट चाकरी घेतो ती. [आठ+वेठ]

**आंठळ–आंठोळ–ळी**—अटोळी पहा.

**आठांग**—अष्टांग पहा. 'आठांगाचा हुडा झुंझते दिसे।' –भाए ८५८.

**आठांगुळें**—अठांगळें पहा. 'मग जीवांचेनि मेळें। निकरलेंपणाचें आठांगुळें केलें।' –शिशु ९०.

**आठॉळॉ**—वि. (गो.) आठव्या महिन्यांत प्रसूत होऊन झालेलें (मूल). 'आठॉळॉ चलॉ चढ करून वांचना म्हणतात.' **आठोळी बाळंत जावप**–आठव्या महिन्यांत बाळंत होणें.

**आठाळें**—अटाली, अटाळी पहा. 'आठाळेया वरी उभे ठाकावें।' –उषा १११८.

**आठिव**—वि. (कों.) आठ थर असलेलें (मधमाशांचें पोळें); सात थर असणाऱ्या पोळ्यास सातेरें म्हणतात. [सं. अष्ट]

**आठिळा**—स्त्री. (कों.) अठळी. अटोळी पहा. 'आठिळांची भाजी गोड लागते.' [सं. अष्टि]

**आंठी**—सर्व अर्थी अठी पहा. –स्त्री. १ अठळी; कोय. 'सकळ फळें फळल्या पाठीं। आम्रवृक्ष फळे शेवटीं। रसस्वादाचिया खोटी। पोटींची आंठी सांडिलिया॥' –एरुस्व १६.१४७. २ गांठ. 'गळवाच्या आंठींतून पू निघत आहे.' [सं. अष्ठि]

**आठी**—क्रिवि. (खा.) येथें; या ठिकाणीं. अटी पहा. 'मांगो दुला आठी कालदी उनता' =मांगो दुला काल येथें आला होता. [सं. अत्र]

**आंठी**—स्त्री. मिठी. अठी पहा. 'मग सुखेंसी घे आंटी। गाढ-पणें।' —ज्ञा ५.१३२. [का. अड्ड]

**आठीवेठी**—अठिवेठी पहा.

**आंठु**—आट्ठ पहा.

**आंठुरणें-आठारणें**—अटरणें पहा. —क्रि. १ (कों.) ओढून घेतलें जाणें; ताठरणें (अंगाचें कातडें किंवा अवयव) २ बांधणें; आवळणें. ३ (विप्र.) संकोचणें; आकसणें; आंखडणें. [का. अट्टु= आटणें]

**आठुवर**—अठवर पहा. **०पण**—न. निबरटपणा. 'नुजवेचि कव्हणें बोलें। आंगां आठुवरपण आलें।' —शिशु २०८.

**आठुळणें**—क्रि. बांधणें. आंठुरणें २ पहा. 'तो ऊर्ध्वीं आठुळैजे कंदु।' —ज्ञा १५.८८.

**आंठुळी**—अटोळी पहा. 'आंठुळी ते टाकणें कीं वरील साली काढणें।' —शिवरामकृत गीताचंद्रिका ५९.

**आंठें, आठोपहार, आठोफळीं, आठ्ठी**—अ मध्यें पहा.

**आठेविठे**—पु. (गो.) अठेवेठे. अढेवेढे पहा.

**आठो**—स्त्री. (व.) अष्टमी तिथि. [आठ]

**आठो**—स्त्री. आठवण; स्मृति. 'म्हणोनि निदकें निंदाचि करावी। तया तोचि जीवीं आठो असे।' —ब ५३६ [आठव]

**आटोक**—वि. रोखठोक. 'उपहार केला आटोक बोलणें।' —दावि १०१. [ठोक]

**आठोडिया**—वि. आठवड्याचा. 'पर्वकाळिं धर्म त्या न कवडी केलारे आठोडिया :' —देप ५८.

**आठोपार**—अष्टौप्रहर. अठोपहार पहा. 'ठांई ठांई नित लढाई होई आठोपार।' —ऐपो ३४१.

**आठोळा**—आठाळा पहा.

**आठोळा**—वि. (गो.) आठवा.

**आठोळी**—स्त्री. आठव्या महिन्यांत बाळंत होणारी स्त्री. आठाळा पहा.

**आंठोळी**—स्त्री. कोय; अटली; बी अटोळी पहा. 'असारें साली आठोळी।' —ज्ञा १८ २०४.—एभा १५ २४. **०पांगळी**—स्त्री. (व.) एक खेळ. यांत विशिष्ट आकाराचीं घरें पाडून त्यांत आंब्याची कोय ठेवून ती एका पायानें लंगडत ठेंच मारून बाहेर काढणें; ठिकरी. 'आठोळीपांगळी रोज चाले त्यांत डाव माझ्यावर येई.'

**आठौ**—आठव; आठवण पहा. 'जे आपणपां आठौ होये.' —ज्ञा १४.३१७.

**आठ्ठावन्न, आठ्ठावीस, आठ्ठेचाळीस, आठ्ठ्याण्णव, आठ्ठ्याहत्तर, आठ्ठ्यांशीं**—अ मध्यें पहा

**आड**—पु. बाटोळी, पायऱ्या नसलेली व लहान तोंडाची विहीर; कुवा; कूप 'असतां आयु, न हो कां क्षम पळ जलधीस आड वाराया।' —मोभीष्म. ७.४९. 'आडांत पडला मृगेंद्र। कीं सांपळयांत कोंडिला व्याघ्र। तैसा साचार गुंतलों मी।' [सं. अवट=खळगा; प्रा. अड=कूप; अअड = आड] **म्ह०** १ आडांत नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येणार? २ इकडे आड तिकडे विहीर= दोन मोठ्या अडचणींत, संकटांत सांपडणें. ३ आडांत घालून दोर कापणें=विश्वासघात करणें. 'सकळांसी आडामध्यें घालून। दोर कापून गेलासी।' —ह १७.१५१. ४ अर्ध्या आडांत सोडणें=संकटांत टाकून जाणें. ५ आडांतला बेडूक आणि समुद्राच्या गोष्टी सांगतो= अल्प ज्ञान असून मोठाल्या गोष्टी सांगणें.

**आड**—न. (ना.) घराचें आढें. 'आड बसलं की नाहीं.' [का. अड्ड] —स्त्री. १ (राजा.) दोन डोंगरांच्या मध्यें पाण्याजवळ असलेली वस्तीस योग्य अशी जागा; घळ; दरी; खोरें. [का. अड्ड]. २ विरोध; अडथळा; अटकाव. —स्त्री. ३ हट्ट; हेका, आग्रह. या सर्व अर्थी अड पहा. 'धरिली भाऊनीं आड।' —ऐपो १२६.

**आड**—अ १ हा शब्द उपपदाप्रमाणें कित्येक शब्दांना जोडून येतो. याची सविस्तर माहिती अडमध्यें दिलेली आहे. या शब्दाचे अर्थ—(अ) एकीकडे; एका बाजूस; दूर; मार्गाच्या बाहेर; रीतीवेगळा; सांधीकोंदींत. उ० आडमार्ग; आडबाजू. (आ) मधून; वरून; उलट; विरुद्ध, मार्गांत (प्रतिबंधरूपानें); उ० आडदंड; या उपपदांतील आणि अड उपपदांतील अर्थभेद 'अड' शब्दामध्यें पहा. २ एखाद्या पदार्थाच्या मागें; पलीकडे; पाठीमागें; पुढें, मागें, न दिसेल असा; एका बाजूला. 'जे नित्य मायापट आड लावी.' —सारुह १.५. 'मेघ आड आला म्हणजे चंद्र दिसणार नाहीं.' ३ (दृष्टिविरोध करण्याकरितां, प्रवेशप्रतिबंधाकरितां, आश्रय देण्याकरितां, संरक्षण करण्याकरितां) मध्यें येणारा; मार्गांत असणारा, मध्यंतरीं; मार्गें. 'आतां आड उभा राहें नारायणा। दयासिंधुपणा साच करीं।' —तुगा १५६८. ४ एखाद्याच्या छत्राखालीं, आश्रयाखालीं; उ० शेताआड चोरी (आपल्याला स्वत:चें शेत आहे तेव्हां दुसऱ्याचें चोरलें असा आरोप येणार नाहीं). दादल्या आड शिंदळकी; यावरून **आड करणें, आड दडणें**=आश्रय घेणें. ५ द्विरुक्तीनें आलेल्या शब्दांत आड शब्द आल्यास त्याचा अर्थ प्रत्येक दुसरा; एक टाकून एक असा होतो. जसें—साला आड साल; झाडाआड झाड; एकाआड एक. द्विरुक्ति नसतांहि आड या शब्दाचा असा उपयोग करतात. जसें— तासाआड बैल आणि दिसा आड बायको (मारावी म्हणजे ठीक). ६ (समासांत) विवक्षित कालाव्यतिरिक्त. जसें—आडवार; आडसाल;

आडदिवस=ठराविक दिवसांपेक्षां इतर दिवशीं. समासांत आड याचा अर्थ केव्हां केव्हां अकस्मात् असा होतो. कांहीं वाक्प्रचार– **०पडप**–(गो.) वामकुक्षीकरितां आडवें होणें. [पडणें] **०येवप**–(गो.) विरोध करणें; आड येणें. [येणें] **०लावून घेणें**–ओंवळ्या लुगड्यावर सोंवळें नेसतांना बायका मध्यें एखादें वस्त्र लावून घेतात तें किंवा नाहण्याच्या वेळीं लावून घेतात ती पडदणी; पडदा. 'नव्हे सपातळ आड लावणें।' –ज्ञा ६.११४. **०जाणें**–१ आडरस्त्यास, आडमार्गास लागणें; रस्ता चुकून भलतीकडे जाणें; २ जवळून जाणें. 'जया आड जातां पार्था। तपश्चर्या मनोरथा। पाखंडियाहि आस्था। समूळ होय।' –ज्ञा ६.१६७. **०पडणें**–१ नमस्कार करणें; विनवणी करणें. –शर. २ अडविणें 'तिये कडोन येतसे वारा। देखोनि धांवे सामोरा। आड पडे म्हणे घरा। बीजे कीजो।' –ज्ञा १३.३७५. ३ मुरकुंडी वळणें. 'गोपाळ हांसां आड पडतु।' –दाव २१७. **०घालणें**–१ मध्यें आणणें; रक्षण करण्यासाठीं कांहीं मध्यंतरी ठेवणें. 'तंव आड घातलें आणीकी वीरी' –उषा ६१६. २ उडी घालणें. 'कोणी आड घाली काय अथार्वी।' –ज्ञा ८.२४०.

**आंड**—अंड पहा.

**आडआरी**—स्त्री. (चांभारी धंदा) कातड्यास भोंक पाडण्याचें मध्यम हत्यार. अरी पहा. [आड+आरी]

**आडई**—स्त्री. (कों.) विश्रांतीसाठीं आडवें होणें. (क्रि० घेणें). 'अंमळ आडई घेतली तों किंचित डोळा लागला.' [का. अड्ड; म. आडवा]

**आडऊ**—पु. चाराचुरा; डबर; गाळ. 'आडऊ निघाला जो अपारु। तो महाभारतप्राकारु। भोंवता केला।' –ज्ञा १८.३६. [आड]

**आडऊड**—क्रिवि. १ एखाद्या वस्तूच्या मागें (लपून, दडून); छत्राखालीं. २ सांधीकोंदींत; आडबाजूस; आसपास. 'रस्त्यांत कांहीं आडऊड खांचखळगा नाहीं ना?' [आड द्वि.]

**आडक**—पु. त्रास; प्रतिबंध. 'अपमानाचिये आडके। देखोनि न फडके भयभीतू।' –एभा ११.४६४. [अडकणें]

**आडकंठ**—अडकंठ पहा.

**आडकडा**—पु १ कड्याचा मध्यभाग; अर्धा कडा; दुर्गम कडा. 'तपोदुर्गाचा आडकडा।' –ज्ञा ६.४७६. २ (ख्रि.) अडथळा. [आड=अर्धा+कडा]

**आडकण**—अडकण पहा.

**आडकणी, आडकथा, आडकर, आडकळणें, आडका, आडकाम, आडकित्ता**—अ मध्यें पहा.

**आडकाठी**—स्त्री. १ अडथळा; अटक; प्रतिबंध; हरकत; प्रत्यवाय. (क्रि० घालणें). 'परीणामी त्वां लाविली आम्हा आडकाठी। हें सांग काय म्हणउनीया नये सदनाशीं॥' –होला १२३. २ दाब; बंधन; ताबा; वचक. (क्रि० करणें, घेणें).

**आडकाष्ठा**—पु. १ कासोटा न सोडतां थोडा बाजूस खोंवून लघवीस बसणें. २ अडकाष्ठा पहा. [का. अड्ड+सं. कच्छ+पट्टिका; प्रा. कच्छुटिया]

**आडकीसुडकी**—स्त्री. (शब्दशः अर्थ अर्धे पटकूर लावणारी) एखादी क्षुद्र स्त्री. 'बसलास झाडावर एक आडकी सुडकी। न धरी मायेची द्वाही॥' –होला ५३. [आडकें=अर्धें+सुडकें=वस्त्र]

**आडकुचा**—पु. (क.) आडोसा.

**आडकुडता-चा**—पु.हाताचा केलेला आडवा चुळका;कुडता. (पाणी पिण्यासाठीं तोंडाजवळ आडवा हात धरतात तो). 'आडकुडता करून पी; आडकुडत्यानें पी. [का. आड+कुडत=पिणें; म. कुडता=बोटें जुळवून केलेला तळ हाताचा खळगा]

**आंडकुली, आंडकूल**—अंमध्यें पहा.

**आडकुशीचा**—वि. (लु.) एका बाजूस असलेला; मुख्य विषयांत नसलेला; मुख्य विषयास सोडून. [आड+कूस]

**आडकुशीस, आडकुशीं**—क्रिवि. (लु.) सरळमार्गापासून दूर; आजूबाजूस; एकीकडे; अडगळीच्या जागीं.

**आडकूट-ड**—न. अडोशासाठीं घातलेली भिंत, पडदा, कुंपण. २ (प्र.) अडखूळ; प्रतिबंध; अडथळा. (क्रि० करणें; लावणें; घालणें; लागणें, पडणें; येणें) [आड+कूड; सं. कुड्य]

**आडकूल**—अडकूल पहा.

**आडकूस**—स्त्री. आडबाजू. –वि., –क्रिवि. आडकुशीचा, आडकुशीस पहा.

**आडकोठा**—क्रिवि. (काव्य) कोपऱ्यांत; एकाबाजूस; एकीकडे. 'जैसा वृश्चिक अन्याय करूनि। बैसे लपोनि आडकोठा।' [आड+ सं. कोष्ठ]

**आडखप्या-खर्च-खळ-खळणें-खाणें-खाद-खुळणें-खूळ-खोल-गडा-गल्ली-गांव-गिऱ्हाईक-गिऱ्हाईकी-ग्राहकी-घोडा**—अ मध्यें पहा.

**आडखिळा**—पु. लगोरीची रचना; ज्यावर नेम धरावयाचा असें स्थळ; निशाण; लक्ष्य. 'आपणचि आडखिळा कीजे। तो कौतुकें जैसा विंधोनि पाडिजे।' –ज्ञा ११.४७८. [आड+सं. कीलक; प्रा. खिल्ल=खिळविणें?]

**आडखिळी**—स्त्री. १ दाराचा अडसर, कडी, खिटी. २ (व.) अडथळा; हरकत. [आड+खिळा–ळी–टी]

**आडखेडें**—न. (गो.) अडचणीच्या वाटेवर असलेलें खेडें. अडगांव पहा.

**आंडगडी**—अं मध्यें पहा.

**आडगत-गात**—वि. (गो.) आडगिऱ्हाईकी; आयता, तयार मिळालेला-ली-लें; वापरलेला. (इं.) सेकंडहँड. 'ह्यांवेंही आमीर आडगत घॅतल्या.' [आड+सं. गम्-गत]

**आडगळ**—स्त्री. १ (कों.) अडसर. [आड+गळणें] २ अडगळ पहा. ३ (कु.) वाडी; खेडेंपाडें. **-ळीचा**-वि. गांवढळ; खेडवळ; गव्हार; अप्रसिद्ध.

**आडगा**—अडगा पहा.

**आडगांठ्या**—वि. चुरशी, खुनशी; द्वेषी; तेढ उत्पन्न करणारा. [आड+गांठ]

**आडगाडी**—स्त्री. छकड्याहून मोठी पण गाडीहून ल्हान अशी गाडी. [अर्ध+गाडी]

**आडगात**—न. १ शरीराचा घेर. २ पलंग, बाज वगैरेंचें आडवें लांकूड. [आड+गात्र]

**आडगात-त्या**—वि. वक्र; कुटिल; तऱ्हेवाईक; विलक्षण; शंकेखोर; विरोधी बोलणारा. 'आडगात ना उभगात वाटेनें चालला गीत गात.' [आड=आडवें+गाणें]

**आंडगी**—स्त्री. (क.) (व्यापार) गठ्ठा. 'काल इरकलहून चार आंडगी लुगडीं आलीं.' 'आंडगींतलीं लुगडीं हिरव्या रंगाचीं होतीं.' [का. अडिंगे=अखें, अर्धे बैलाचें ओझें]

**आडगुड**—स्त्री. (चं.) पडदणी. [आड+गुंडाळणें]

**आडगु-गू-ण**—पु. १ (कों. गो.) भुतांखेतांचा जोर; भुतानें पछाडणें; कांहीं चिन्हांवरून दिसून येणारें भुतांखेतांचें दुखणें; बाहेरची बाधा. २ कुटुंबांतील मृतांच्या अवकृपेमुळें होणारी बाधा. [आड+गुण]

**आडगोखमा**—अडगोखमा पहा.

**आडघात**—स्त्री. अवेळ; अकाळ; बेहंगाम, गैरमोसम, अयोग्य संधि. [आड+घात]

**आडचा**—वि. छत्राखालीं, आश्रयाखालीं असणारा. [आड]

**आडचावट**—वि. कंटाळवाणें बडबडणारा; बडबड्या; बोलण्यानें त्रासदायक वाटणारा; वाचाळ. [आड+वाचाट]

**आडचोर**—वि. सांदीकोंपऱ्यांत पडलेल्या, किरकोळ वस्तू चोरणारा; उचल्या; भुरटा. [आड+चोर]

**आडछ, आडजुना, आडणा, आडणी, आडत, आडत्या, आडदांड, आडदाळ, आड धोतर, आडनळ, आडपंचा, आडपेठ, आडबंक, आडबांक, आडनाड, आडनीट, आडनीड, आडनेड, आडपन्हळ, आडफळें**—अ मध्यें पहा.

**आडजात**—स्त्री. मुख्य जातीखेरीज हलकी जात; तेली, तांबोळी, वगैरे. -वि. खट्याळ; हिरवट; द्वाड; खोडकर; त्रासदायक (मूल). [आड+जात]

**आडजाळ**—क्रिवि. अकल्पित, भलतें संकट. 'जैसें गगनीं आभाळ। ना तरी तरणीं मृगजळ। तैसें नाथिलें आडजाळ। तुज पडिलें हें।' -विपु ७.४५. [आड+जाल]

**आडजीभपडजीभ**—स्त्री. (व.) जिभेचा एक भाग; (सामा.) पडजीभ. म्ह० आडजिभेनें पाहिलें, पडजिभेनें वास घेतला=खाऊन मन तृप्त झालें नाहीं म्हणजे ही म्हण योजितात.

**आडझट**—न. लहानसें संकट; अडचण; बारीकसारीक त्राम; उमेद खचविणारी गोष्ट. एखाद्या नीच मनुष्यानें आणिलेलें संकट. [आड+झट]

**आडणी**—(कु.) अडणी पहा.

**आडणीसावकार**—पु. किरकोळ, लहान सावकार. 'व्याजाच्या आशेनें लहान रकमा कर्जाऊ देतात. जमीनी गहाण घेतल्या त्या गहाणदारांना किंवा इतरांना वटाईनें, खंडानें लावतात. त्रागा, शिव्याशाप देऊन कर्ज वसूल करण्याचा यत्न करतात. पण कुणबी शेतमाल त्यांच्या हातीं लागूं देत नाहींत. कांहीं दिवस अंदरबट्टा सोसून बहुधा मुद्दल रुपयांचे सहा ते बारा आण्यांवर आपले रोखे वाण्यांना वेचन करतात.' -गांगा १६१. [आडणी किंवा अडाणी+सावकार]

**आडणूक**—अडणूक पहा. 'परोपरीं सिकविणें। आडणुका सांगत जाणें।' -दा १९.१०.१५.

**आडणें**—अडणें पहा.

**आडताल**—पु कोणत्याहि तालाचें दीडपटीचें आवर्तन. अडताल पहा.

**आडतास**—न. जमीन नांगरतांना नांगरास पुष्कळ बैल असल्यामुळें शेताच्या बांधापर्यंत नांगर जाऊ शकत नाहीं अशी नांगराव-याची राहिलेली जमीन आडवी नांगरतात त्यास म्हणतात. [आड+तास]

**आडताळा**—अडताळा अर्थ २ पहा. 'परी हा सूक्ष्म आडताळा। वारी विवेकें वेगळा।' -दा ८.१०.६९.

**आंडद्रास, आंडदोरी, आंडधरणी**—अं मध्यें पहा.

**आडथळा**—अडथळा पहा.

**आडदंड**—पु. अडथळा. आडकाठी पहा. 'द्वारपाल आडदंड। घालूं न शकती महाभये।' -पांप्र ३.१५. [आड+दंड]

**आडदंडगी**—स्त्री. (बे.) (विणकाम) विणलेलें कापड मापांत व ठराविक उंचीवर येण्याकरितां ठेवलेलें आडवें लांकूड. याच्या पुढें आडसरावर कापड गुंडाळलें जातें व विणकरी त्यावर रेलून विणतो. [का. अड्ड=आडवें+दंडगी=काठी]

**आडदरा**—अडदरा पहा. 'येतां जातां नेणों काळाचा आडदरा।' -निगा ६६.

**आडदावा**—पु. गुप्त द्वेष; हेवा; खुनस. [आड+दावा]

**आडदिवस-दिस**—पु. १ ज्या दिवशीं कांहीं नेमधर्म किंवा आचारसंस्कार नाहीं असा रिकामा दिवस. २ एक सोडून एक दिवस; दिवसाआड दिवस; अधला मधला दिवस. ३ बिन हंगामी; अयोग्य दिवस. [ आड+दिवस ]

**आडनर**—पु. ( नळीस वगैरे ) आंतील बाजूस आटे पाडणारें यंत्र. [ आड+नर ]

**आडनळी**—अडनळी पहा.

**आडनाम**—अडनांव पहा. –न. टोपण किंवा औपरोधिक नांव. 'आडनामीं वर्मी बोलावितु। गोपाळ हांसां आड पडतु। तेवींची अमृतां पृष्ठीं नीववीतु । सवंगडेया तें।' –दाव २.१७.

**आडनांव**—न. १ अडनांव पहा. २ समाजांत एकाच नांवाच्या अनेक व्यक्ती सांपडतात. त्या अर्थी व्यक्तीचा निर्देश अधिक निश्चितपणें करतां यावा म्हणून त्याच्या वृत्तीवरून, गांवाच्या अगर देशाच्या नांवावरून जें त्याला विशिष्ट नांव लाविलेलें असतें तें; कुलनाम; उपनांव. 'अस्तमानाचें जयासी । आडनांव नाहीं।' –ज्ञा ८.९०. २ ( ल. ) व्यर्थ नांव; खोटें नांव. 'जीभ जै आरोगूं जाये। मग रसना हे होये। आडनांव कीं॥' –अमृ ६.६२. 'तैसें स्त्रीसंगें जें सुख। आडनांव मात्र देख।' –मुरंशु २८.

**आडनीत**—स्त्री. १ ( गो. ) अन्याय्य निवाडा. २ अन्याय्य कृत्य. 'तागली ही आडनीत हें कोणीय सांगत.' [ का. अड्ड= आडवी, वांकडी+सं. नीति ]

**आडपडदा**—पु. १ मध्यें सोडलेला–लावलेला–टांगलेला पडदा ( पलीकडचें दिसूं नये म्हणून ). २ ( ल. ) आच्छादन; गुप्तपणा; झांकण. 'येथें आडपडदा तरी आहे कां?' ३ मर्यादा; दाब; विनय; लज्जा. 'वडिलां देखत तपकीर ओढणें झालें तर एकीकडे तोंड करून ओढावी, इतका तरी आडपडदा असावा.' [ आड+पडदा ]

**आडपदर-पद्रा**—पु. १ पडदा (डोळ्यावरील, व्रणावरील). २ आडपडदा; गुप्तपणा; झांकण; संकोच; विनय; लज्जा. [ आड+पदर ]

**आडपाग**—न. मासे धरण्याचें मोठें जाळें ( हें बारा हात व्यासाचें असतें ). [ आड+पाग ]

**आडपाट**—स्त्री. पडशी(गोणी)च्या दोन्हीं तोंडाच्यामधील भाग–तरट. [ आड+सं. पट; म. पाट ]

**आडफट**—स्त्री. १ चीर; भेग (तक्तपोशी, दार वगैरेंतील). २ एकीकडचा कानाकोपरा; एकीकडची जागा; एकांत स्थळ. [ आड+फट ]

**आडफागुर**—पु. ( गो. ) एकाच्या खालीं एक असे डाहळीला मोड येणें, फुटणें; आडवे अंकूर फुटणें. [ आड+फागूर= अंकुर, फांदी ]

**आडफांटा**—पु. १ क्षुल्लक अडथळा; आक्षेप; हरकत; तक्रार; हुज्जत. अडफाटा पहा. २ अवचित अडथळा; विघ्न; संकट. ३ (कों.) भुतांखेतांची बाधा; भुतानीं पछाडणें. ०**भरणें**–आडमार्गानें जाणें; बहकणें. 'अहंकार मद्य पिऊनी। भ्रमती मायाघोरविपिनीं। आपली शुद्धि विसरोनि। आडफांटा भरले हो।' –ह ७.२२८. [ आड+ फांटा ] ०**ट्या**–वि. १ आडफांटा, अडचणी, अडथळा घालणारा; तक्रार करणारा; तक्रारी. २ लहरी; चिडखोर; तिरसट; छांदिष्ट.

**आडबंदर, आडबाप्या, आडबायको, आडमाप, आडमूठ, आडमुठा, आडमुठ्या, आडम्हातारा**—अ मध्यें पहा.

**आडंबर**—पुन. ( श्रीमंती, विद्वत्ता, पवित्रता इ० कांचा ) डौल; दिमाख; पोकळ बडेजाव; रिकामी ऐट. अवडंबर पहा. 'जैसें आडंबर स्वप्न भेदाचें। नाथिलेंचि।' –विउ ८.४५.( क्रि० घालणें; मांडणें ). [ सं. आ+डंबर ]

**आडंबा**—पु. ( कों. ) दारास, खिडकीस लावण्याचा आडसर [ का. अड्ड ]

**आडबाजू**—स्त्री. मुख्य मार्गाहून एकीकडचा प्रदेश. [ आड+ बाजू ] –क्रिवि. एका बाजूस; आड बाजूस; कोनाकोपऱ्यांत; नेहमींच्या जागेच्या पलीकडे. ०**चा**–वि. एकीकडचा; एकेबाजूचा.

**आडबारें**—न. ( गो. ) मंडपाच्या उभ्या मेढीवर जे बांबू अगर पोफळीचे सोट आडवे घालतात त्यांपैकीं प्रत्येक.

**आडबिदी**—स्त्री. आड गल्ली; आड रस्ता; लहान मार्ग. 'जेथ जैन मार्गाचिआं आडबिदी।' –शिशु ९७. [ का. अड्ड + बिदी=गल्ली ]

**आंडबुली**—अंडबुली पहा.

**आडबोली**—स्त्री. ( कों. गो. ) १ वांकडें बोलणें. २ संदिग्ध, अस्पष्ट, न समजण्यासारखें बोलणें. [ आड+बोली ]

**आडभंगड**—वि. ( व. ) मूर्ख; अडाणी. अडबंक पहा. 'रामा फार आडभंगड माणूस आहे.'

**आडभर-भारी**—स्त्री. १ अडचण; संकट. २ अडवेपणा. **आडभरीं भरणें**–१ ( गर्भात ) आडवें होणें, येणें. २ वांकडे जाणें. 'चित्त बहु निर्बुजलें। तेणें आडभरीं भरलें।' –दा ३.१.४०. [ आड+भरणें ]

**आडभित**—स्त्री. पडदी; दोन भाग करण्यासाठीं मध्यें घातलेली भिंत. अडभित पहा. **म्ह**० आडभिंतीची पडभित, पड भिंतीचा पोपडा=दूरचें नातें दाखविणें या अर्थी.

**आंडमळणी**—अंडमळणी पहा.

**आडमानई-आडमानाय**—पु. ( राजा. ) पोरगा; मुलगा; आडबाप्या. [ आड+माणूस ? सं. मान=माप ]

**आडमार्ग**—पु. आडवाट; आड वळणाचा, एका बाजूचा, दूरचा रस्ता. 'परमार्थ पंथ क्रमितां सांग। पाऊल पडलें आडमार्गे। [ आड+मार्ग ]

**आडमिळकत**—अडमिळकत पहा.

**आडमुद्दा**—पु. सबब; तक्रार; अडथळा; भलता विषय. [आड+मुद्दा]

**आडमेळा-ळें**—पुन. (गो. कों.) अकस्मात उत्पन्न झालेली अडचण; आडकाठी; प्रतिबंध; विघ्न; व्यत्यय; अपशकुन. 'तें काम करूंक हांव गेल्लों, इतल्यांत मर्दीच हें आडमेळें आयलें' [आड+मेळणें–मेळ]

**आडमोड**—स्त्री. मोडतोड; कापाकाप; नाश. 'तळीं रिचतां वोघें। पाताळादि विवरें वेगें। नाशूनिया पन्नगें। अंगभंगें आडमोडी करी।'—एभा ७.५२४. 'कवाडें करोनि आडमोडीं। पैशला अंत।'—कथा ४.३.१८. (तुल.) अडमड पहा. [आड+मोड]

**आडमोरा-मोहरा**—वि. १ एका बाजूस; समोर नाहीं असा; २ रस्त्यावर नाहीं असा. 'जाय पाहतां आडमोहरा। संत मुपथें चालविती।' मुविराट ७ १०३. [आड+मोरा–मोहरा=मुख] क्रिवि. मध्यें; आड मार्गांत; प्रतिबंध रूपानें. (क्रि० येणें; असणें; होणें, पडणें; घालणें; ठेवणें इ०); **–रीं**–क्रिवि. १ आडून; दडून; आडोशानें. २ कोनाकोपऱ्यांत; सांधीकोंदींत, बाजूला; एकीकडे.

**आडय**—स्त्री. एक पक्षी. [सं. आडि]

**आडय, आडव**—स्त्री. (कों.) आडवें होणें; कुशीवर निजणें, पडणें, टेकणें. (क्रि० घेणें.) [आडवा]

**आडरझांव**—न. (गो. कु.) अन्यायानें बोलणें. 'तागेलें हें केलीं आडरझांव!' [आड+पोर्तु. राझांव=न्यायीपणा]

**आडरात**—स्त्री. अर्धी रात्र; मध्यरात्रींनंतरची रात्र; भलतीच रात्रीची वेळ. [अर्ध+रात्र]

**आडरान**—न. अरण्य; आडवाट. 'ना तरी सेऊनि घोर आडरान।'—दावि ३९. अडरान पहा. **०घेणें**–वांकडें बोलणें. मुद्द्याला सोडून बोलणें; भलतेंच समजणें. 'ऐसा श्रोतयांचा अनुमान। श्रोतीं घेतलें आडरान।'—दा ९.३.७. या शब्दाचा उपयोग पुढील क्रियापदांशीं करतात. जसें–आडरानांत भरणें, जाणें, शिरणें, फिरणें, भरकणें, गुंतणें, भटकत फिरणें. **–नांत शिरणें**–जाणून बुजून अज्ञान दाखविणें; वेड पांघरणें. 'तर ते त्याचा अर्थवाद करून आडरानांत शिरतील काय?'—टि ४.४.६३.

**आडरानी**—वि. गांवढळ; खेडवळ; शहरांतील नव्हे असा (धंदा, रीत, माणूस, पदार्थ, व्यापार).

**आडल**—पु. आडहत्यारी. आडाऊ पहा. 'स्वार माणूस आडलाचे.'—थोमारो. १. ३२२. [अडला–ऊ पहा]

**आडला**—पु. विळी; विळा. अडला पहा.

**आडलॉ**—अ. (गो.) दांड टाकण्यापूर्वी टाकतो या अर्थी सावधगिरीचा इशारा.

**आडलागांजला-पिडला-भिडला**—वि. अडचणीत असलेला, आलेला, सांपडलेला. [अडणें+गांजणें]

**आडव**—न. १ (कु.) वेंग किंवा दोन हातांची कवळी. २ (ल.) एका कवळींत मावणारी भाताणाची पेंढी.

**आडव**—न. १ अरण्य; रान; जंगल. 'जी जीविताच्या आडवीं.'—ज्ञा १६.३४. –एभा १३.१३४. २ अड वर्णींचें ठिकाण. 'ते चोरांसी आडव होये।'—ज्ञा १८.७२४. [सं. अटवी]

**आडवंकी-गी**—अडवंकी–गी पहा. 'संकल्पाचीही आडवंगी। न करणें जें॥'—ज्ञा १६.२०३.

**आडवट**—अडवट पहा.

**आडवण, आडवाण**—न. १ (कों.) डोंगराचा मध्यभाग; शिखर आणि पायथा यांमधील भाग [सं. अर्धवत्] २ डोंगरावरील उताराची जागा; उतरण; उतरणीवरील जंगल. ३ अडवण पहा.

**आडवत**—न. (कों.) काकडीचा कीस तांदुळाच्या पिठांत शिजवून केलेलें एक पक्वान्न.

**आडवर्ण**—पु. आडजात [सं. अर्ध+वर्ण] **–चा**–वि १ आड जातीचा; संकरजातीचा (मनुष्य). २ भुताखेताच्या बाधेपासून झालेला (रोग, व्यथा). [आड+व्रण]

**आडवल**—स्त्री. (गो.) हिंदी पोषाखांतील (मजूर वर्गांतील) किरिस्तांव. –स्त्री.न. वधूला लग्नाच्या वेळीं हळदीचा रंग दिलेलीं वस्त्रें नेसविल्यानंतर त्यावर त्याच रंगाचें एक वस्त्र गुंडाळून हातांत धरावयास लावतात तें. [आड+सं. वलन=वेष्टन]

**आडवली**—स्त्री. (गो.) विळी. अडला–ऊ पहा.

**आडवस्ती**—स्त्री. १ एकाबाजूस, आड वळणास, किंवा खोलगट जागेंत वसलेलें गांव. २ वरील प्रकारच्या जागीं केलेली वस्ती, वसाहत, रहिवास. [आड+वसति]

**आडवस्त्र**—न. मुख्य वस्त्राशिवाय मध्यें पुरूष पंचा किंवा स्त्रिया पडदणी वगैरे नेसतात तें; सोंवळें नेसतांना मध्यें दुसरें वस्त्र नेसतात तें. [सं. अर्ध+वस्त्र; अंतः+वस्त्र]

**आडवळण**—अडवळण पहा.

**आडवा–आडवातिडवा, आडवेंउभें, आडसणें, आडसांगड–डी, आडहतेर–री–हत्यार–री**—अ मध्यें पहा.

**आडवांग**—न. एक बाजू. 'आपुलिया उसीसा कां आडवांगीं ठेउनि आपण पाइतयाकडे खालि नीजति।'—सूत्रपाठ (महानुभाव) [आडवें+अंग]

**आडवाट**—स्त्री. १ एका बाजूचा, आड वळणाचा रस्ता; आडमार्ग. २ मोठ्या रस्त्याच्या बाजूची वाट; रस्त्याची कड. [का. अड्ड+म. वाट; सं. अंतर्वाट (राजवाडे)] **–ट्या**–वि. भलत्या मार्गानें जाणारा; सरळ न वागणारा; एककल्ली; करनकऱ्या.

**आडवादंड**—पु. ( व्यायाम ) दोन खांब जमीनींत पुरून त्यांच्या शेवटास दोन भोंकें पाडून त्यांत आडवी गुळगुळीत पहार बसविलेली असते. ही पहार अधिक खालीं घेणें झाल्यास दोन्ही खांबांस समोरासमोर आणखी भोंकें असतात. या पहारेस दोन्ही हातांनीं धरून किंवा पाय अडकवून वेगवेगळया प्रकारच्या उडया घेतात. या उडयांचे अनेक प्रकार आहेत. ( इं. ) हॉरिझॉंटल किंवा सिंगल बार.

**आडवार**—पु. १ कोणत्याहि विशिष्ट दिवसाशिवाय किंवा नेमलेल्या दिवसाशिवाय इतर दिवस; अधलामधला दिवस. २ भलता, अयोग्य दिवस. [ आड+वार ]

**आडवारणें, आडवरणें**—अक्रि. ( प्रां. ) रेलणें; ( निजण्यासाठीं ) आडवें होणें. [ आडवा+आरणें=लोळणें; अहारणें ]

**आडवारा**—पु. अडथळा; प्रतिबंध. 'करितसे आडवारा। विश्वाभामु जो' –ज्ञा १५.४६. –एभा ११.११७१. 'जैसें सिंहाचिया आहारा । जंबुक करिती आडवारा।' –कथा ४.११.१२८. [ आड+वारणें ]

**आडवाव**—पु. आड रस्ता; अडथळा; मधला रस्ता. 'न फेडितां आडवावो।' –अमृ ७.२६५. [ आड+वाव=वाट ]

**आडवी**—स्त्री. अडवी पहा. ०**काडी**–स्त्री. अडथळा; प्रतिबंध. 'कामप्राप्तिसी आडवी काडी। होतां क्रोधाची पडे उडी।' –एभा २३.२५२.

**आडवीण**—अडवण पहा.

**आडवें**—अडवें पहा.

**आडवें**—न. अरण्य. 'अविद्येचें आडवें। भुजीत जीवपणाचें भवे।' –अमृ २.२. [ सं. अटवी ]

**आडवें**—अडवा–वें पहा.

**आडवेळ**—अडवेळ पहा.

**आडवोल**—न. (गो.) ओलें वस्त्र. [ आड+ओलें (वस्त्र) ]

**आडसणें**—अडसणें पहा.

**आडसंधि–सांध**—अडसंधि पहा.

**आडसर**—पु. १ दार किंवा खिडकी बंद करण्याकरितां लांकडी किंवा लोखंडी दांडी, गज, खीळ, अडणा, अड्ड; लांकडी अडसर. हा कोठें कोठें दाराच्या पाठीमागच्या भिंतीत भोंक ठेवून त्यांत बसविलेला असतो व दार बंद करतांना तो दोन फळयांच्या आड लावतात. [ आड=आडवें+सरणें ]

**आडसर**—नपु. ( कों. ) ज्यांत पाणी अधिक असून खोबरें थोडें झालें आहे असा कोंवळा नारळ; शहाळें. [ सं. अर्ध+सदृश ] २ डोंगराभोंवतीं असणारी वाट; ज्याचा खालचा भोंवतालचा भाग तुटल्यासारखा दिसतो असा डोंगराचा भाग; डोंगराच्या माथ्यावरची धार; डोंगराची बगल. 'आडसरामाजीं राहिले।' –दावि २५०. ३ गांवच्या शिवेचा दगड. ४ (विणकाम) उभा ताणा सारखा पसरलेला रहावा म्हणून वहीच्यापुढें ताण्याच्याखालीं आडवी काठी लावतात ती. ५ दांडगट, धटिंगण, आगडबंब मनुष्य. [आड+सं. सृ=सरणें] – क्रिवि. घट्ट; आवळ; ताठ. **आडसरासारखा पडणें–निजणें–पसरणें**–अव्यवस्थितपणानें रस्त्यांत वगैरे पडणें, निजणें, लोळणें.

**आडसाटी**—स्त्री. ( गो. ) पूर्ण नव्हे व अपूर्ण नव्हे अशी मधली स्थिति. [ अर्ध=आड+सं. स्थिति ]

**आडसाटो**—वि. १ ( गो. ) मध्यम स्थितींतील; पूर्ण किंवा अपूर्ण नाहीं असा; अर्धवट.

**आडसाटो**—पु. ( गो. ) आडसट्टा. अडसट्टा पहा.

**आडसाठा**—पु तात्पुरती एका बाजूस करून ठेवलेली, नेहमीं न लागणाऱ्या वस्तूंची रास, संग्रह. प्रायः सप्तमी विभक्तींत प्रयोग. जसें–आडसाठयांत. यावरून भलत्या ठिकाणीं ठेवलेलें, टाकलेलें. [ आड+सांठा ]

**आडसार**—पु. (हेट) पूर्ण न झालेला नारळ. आडसर पहा. 'आडसार खाउक गोड लागता.' [ सं. अर्ध+सदृश ]

**आडसाल**—न. १ एक वर्ष टाकून एक वर्ष; वर्षाआड वर्ष. २ ( शेती ) विवडाचें साल. जसें–ज्या जमिनींत एक वर्षीं जोंधळयाचें पीक केलें तीत पुढील वर्षीं बाजरी इ० दुसरीं पिकें करणें. –**ल्या ऊंस**–पु. अठरा महिन्यांनी होणारा म्हणजे एक वर्षाआड येणारा ऊंस.

**आडसांग, आडांख, आडांखताळा, आडांखा, आडाणचोट – पट्टी – वस्ती – आडाणा–णी – आडाणीजात–आडाणी कबाडी, आडात, आडातुडी, आडाथ, आडाव, आडावा, आडून**—अ मध्यें पहा.

**आडळ**—न. ( कों. ) गोरवी कटगी या नांवाचें झाड.

**आडळ**—आढळ. आडळू पहा.

**आडळ**—पु. स्पर्श. 'कामक्रोधादि त्यां नाहीं आडळ.' –रंयो १.५२५.

**आडळ**—पु. १ विकल्प. 'कवणे विखीं आडळु। ने घे चित्त।' –ज्ञा १३.३५८. २ अडथळा; प्रतिबंध. 'मग घरींचाचि ठेवा। जेवीं डोळ्यां दावी दिवा। तरी घेतां काय पांडवा। आडळु असे।' –ज्ञा १८.८९२. ३ यत्किंचित्. 'जळीं जळावेगळ। कापूर न दिसे आडळ।' –अमृ ३.२७. अडळ पहा.

**आडळणें**–क्रि. अडखळणें. अडळणें पहा. 'तरी उजूचि कां आडळिजे। जयापरी।' –ज्ञा १.२४७.

**आडळणें**—क्रि. आढळणें; प्राप्त होणें. 'एऱ्हवीं हा योगियां नाडळे' –ज्ञा ४.१३.

**आडळी**—स्त्री. एक पक्षी. अडल पहा. [ सं. आडि ]

**आडळीभ्रमणी**—स्त्री. ( व. ) अंधुक पूर्व कल्पना; संभव. 'आडळीभ्रमणी नसतां तो वारला.' [ अटकळ+भ्रम ]

**आडळू**—पु. आढळ. 'जेणेसीं होतां आडळू। पुरे जिणें।' –गीता १.४३४.

**आडा**—पु. १ ( कों. ) शेतास केलेलें कांटेरी झाडाझुडपांचें किंवा निवडुंगाचें कुंपण. [ का. अड्ड ] २ ( गो. ) घराभोंवतालचें दगडी कुंपण. 'ताणें पोर्साभोंवतीं आडों केलों.' ( सामा. ) कांपाउंड; आडोसा. ३ ( कु. ) दरवाजा बंद करावयाचा आडसर. ४ ( हेट. ) गलबताच्या व कलमीच्या आधारासाठीं एकाखालीं एक असलेलीं दोन मोठीं लाकडें. ५ ( हेट. ) घराचें आढें. [ का. अड्ड ] ६ रेषा; रेघ. 'भालप्रदेशीं चंदनाचा आडा लेखिती।' –पूजावसर ( महानुभाव. ) [ का. अड्ड ]

**आडा**—पु. एका जातीचा पक्षी, बगळा. [ सं. आडि ]

**आडाआडी**—स्त्री. धडपड; खटपट; श्रम; आटाआट. 'करूनि आवडीच्या कावडी। या रामेश्वरीं येती भाविक कापडी। क्षणिक आयुष्य जाणुनि तांतडी। आडाआडी पावले।' –ह १५.१४०. 'एवढी जिवाची आडाआडी करून तुम्ही साधणार काय?' अट-अट पहा.

**आडाऊ**—पु. बंदूक, तरवार या शिवाय हलकें हत्यार वापरणारा–पायदळ शिपाई; आडहत्यारी. 'आडाऊ पार्यीचे चालत।' –मुआदि १९.१०. अढाऊ पहा.

**आडांख–खा, आडाखा**—अ मध्यें पहा.

**आडांगपण, आडांगाय**—न. ( गो. ) वात्रटपणा; खोडी; मस्ती; आडदांडपणा. 'ता गेलीं आडांगपणा चढल्यांत.' [ आड+अंगी ]

**आडांगी**—वि. ( गो. ) वात्रट; आडदांड; दांडगा; भांडखोर; मस्त. 'भारी आडांगी जाला तॉ चलॉ!' [आडबंगी; आडवें+अंग]

**आडाचौताल**—पु. (संगीत) एका तालाचें नांव; यांत मात्रा चौदा व विभाग सात असतात. [ आडा+चौताल ]

**आडाडी–आडाणचोंट, आडाणा–णी, आडाणीजात, आडात–थ, आडांबरी**—अ मध्यें पहा.

**आडांत्री**—क्रिवि. (कु.) नाजूक स्थानीं किंवा मर्मस्थानीं. (क्रि० लागणें; पडणें; मारणें. ) [ आड+आंतर् ]

**आडांबॉ–बो**—पु. (गो.) कडी, आडसर. 'दाराक आडामॉ ( आडांबॉ ) घाल.'

**आडामोडा**—पु. उंसाच्या रसानें भरलेलीं ( चरकाजवळील ) भांडीं चुलाणाकडे नेणारा. –कृषि ४७३.

**आडाव**—पु. १ आड हत्यारी. अढाऊ–व पहा. 'मावळे आडाव इटेकरी, पट्टाईत... यांची संजगणी करून हशम मेळविले.' –मराआ ६. २ धाडसी, शूर शिपाई.

**आडाव**—न. ( कर्ना. ) ( कडब्याच्या ? ) पांच पेंढया. अडव पहा.

**आडांव**—न. (कों.) चालू कामापुरती खणलेली, न बांधलेली विहीर. [ आड+सं. वापी; म. बाव ]

**आडाव–वु**—वि. ( क. ) आडगिऱ्हाइकी; जुनाट ( वस्तू ). 'आडाव वस्तु घेतली म्हणजे स्वस्त मिळते.' [ आड ]

**आडावण**—अडवण पहा.

**आडावणी**—स्त्री. ( नाविक ) अडवणी पहा. अडवण पहा.

**आडावणें**—क्रि. ( कु. ) बंदरांत आगबोट दूर उभी असतां उतारू उतरून घेण्यासाठीं आगबोटीस पडाव लागणें. [ अडविणें प्रयोजक ]

**आडावतपाग**—न. ( कों. राजा ) बारीक मासे पकडण्याचें 'रोंगो' नांवाच्या जाळयाहून लहान जाळें. आडपाग पहा. [ अर्धवत्=अर्धवट+पाग=जाळें ]

**आडास**—पु. ( गो. ) आडोसा; आच्छादन; छाया; अंधार. [ आडोसा ]

**आडास**—स्त्री. (शेती) जमीन एकदा उभी नांगरल्यावर तीच पुन्हां आडवी नांगरणें. पहिल्या नांगरणीस तास म्हणतात. [ आड+तास ]

**आडासन**—न. कंबर. 'आडासनी दोनी दोनी ष(ख)गें।' –उषा ८२४. [ सं. अर्धासन ]

**आडाळणी**—स्त्री. (कु.) पेरणीच्या दुसऱ्या दिवशींची नांगरणी.

**आडाळा–ळो**—पु ( कु ) विळी. अडला पहा.

**आडाळी**—स्त्री. ( कु. ) मातीच्या भिंतीचें कुंपण.

**आडि**—स्त्री. ( गो. ) एक लहान मासा; खर्वा बांगडा. [ सं. आटि–डि ]

**ऑडिट**—न. हिशेबाची अखेर तपासणी ( सरकारी किंवा नियोजित हिशेबतपासनीसाकडून ) [ इं. ]

**ऑडिटर**—पु. हिशेबतपासणी करणारा; अधिकृत हिशेबतपासनीस. [ इं. ]

**आडिंबा**—पु. (कों.) अडसर; अडवट; अडणा. [ अड्ड ]

**आडी**—स्त्री. एक पक्षी; बगळी. [ सं. आडि ]

**आडी**—अढी पहा. –स्त्री. १ ( कों. ) रहाट–गाडग्याच्या चाकाला परिघाच्या बाजूनें अक्षाशीं समांतर अशीं रव्यावर मारलेलीं लांकडें, एका रहाटास अशा बारा आडया असतात. [ का. अड्ड ] २ धार काढतांना गाईनें लाथ मारूं नये म्हणून तिच्या सभोंवार बांधावयाच्या काठ्या. ३ ( मल्लशास्त्र ) कुस्तींत प्रतिपक्ष्यास पायांत घालावयाची आढी. ४ (सामा.) आढी ( आंब्याची, गवताची, कपाळ, पाय इ. ची ). अढी पहा. ५ ( कों. गो. ) जनावराचा पाय मोडला असतां तो नीट करण्यास दोन बाजूंस लांकडें

बांधतात ती. ६ ( गो. ) घराच्या भोंवतालचें दगडी कुंपण, गडगा. ७ ( कर्ना. ) नदी उतरून जाण्याचा लांकडी पूल. ८ आडकाठी; अडथळा; प्रतिबंध. 'जन्मसहस्रांचिया आडी।' –ज्ञा ६.४६५. 'मार्गी कांहीं पडली आडी । दूत तांतडी पाठविले ।' –एरुस्व १४.६७. ९ शंका. १० ( कासारी धंदा ) भांडीं घडविण्याच्या उपयोगी असलेलें दगडी, चपटें आरपार भोंक असलेलें उखळ. ११ (नाविक) गलबताच्या झाडीच्या वरील लांकडी तक्त; उतारूंना बसावयासाठीं केलेली जागा; होडीवरील बसण्याकरितां असलेली फळी. १२ ( गो. ) काना. १३ ( गो. ) अडसर

**आडी**—स्त्री. ( संगीत ) गानप्रकार, आदिपरंपरा. ( गाणें. ) 'आडी गातांतीं देवांगणां.' –दाव १६५ [ सं. आदि ? का. आडु= गाणें ]

**आडी**—स्त्री. ( कु. ) भोंपळ्याची कापलेली फाक; तुकडा.

**आंडी**—स्त्री. ( प्र. ) अंडेर. ( खा. ) मुलगी. [ सं. अंड, अंडीर =पूर्ण वाढीचा माणूस ]

**आडील**—वि. आडचा; आश्रयाखालील; छत्राखालील; आच्छादनाखालील; आडोशाचा. [ आड. का. अड्ड+ल प्रत्यय ]

**आंडील, आंडुकली**—अं मध्यें पहा.

**आडीसरी-श्री, आडुक, आडुमाडु, आडुळसा, आडून**—अ मध्यें पहा.

**आडू**—१ स्त्री. ( कों. ) घाटांतील सडकेच्या (डोंगराच्या बाजू-शिवाय दुसऱ्या ) बाजूस असलेली दगडी अर्धी भिंत, बांध. २ ( पाथरवट काम ) दगड फोडण्याचें पोलादी हत्यार; मोठा हातोडा. अडू पहा. [ का. अड्ड ]

**आडूक**—वि. ( गो. कर्ना. ) कडवट. 'हॉ रोस आडूक जाला.' [ का. ]

**आंडूगांडू**—वि. षंढ; बुळा; कुचकामाचा; मुर्दाड (माणूस). 'चार आंडूगांडू मिळाले म्हणून न्याय होतो काय ?' [ गांडू द्वि. ]

**आडे**—क्रिवि. ( खा. ) बाजूस; पलीकडे; आड. 'नग आडे जाले झाडी बहुत।' –दावि ७७८.

**आडें**—वि. (कों.) आडवें; कलतें. ( क्रि० घेणें ). [ का. अड्ड ]

**आडें**—न. १ ( कों. ) आढें ( घराचें ). अढें पहा. २ उंबरा; उंबरठा. 'ग्रामद्वारींचें आडें। नोलांडी कोण।' –ज्ञा १३.६९९. ३ दोन माणसांनीं कापण्याची करवत; आढया करवत. ४ ( नाविक ) नावेचा कणा; एक जाडें लांकूड; हें नावेस बोडतांच्या दुरमीणावर बसवितात. यानें आंतल्या बाजूस मजबुती व काठीस टेकावा मिळतो. ५ उंसाच्या चरकाचा आडवा दांडा (ज्यास बैल जोडतात तो ). ६ (कर्ना.) घरावरील छप्पर; माळ्यावरचा भाग. [सं. अट्ट= माडी. का. अड्ड ] ७ तागडी; ताजव्याची दांडी. –शर [ का. अड–इ ] ०करी–वि. तागडी वाला.

**आंडें**—अंडें पहा.

**आडेकरी**—वि. १ आड, आडवा येणारा. २ ( ल. ) वाट-माऱ्या. [ आड+सं. कृ–कर ]

**आडेचाँ**–क्रिवि. ( कु. ) वरकरणी; ढोंगीपणानें. –वि. ( गो. ) तात्पुरता; वेळेपुरता.

**आडेचें**—वि. ( गो. ) चालू; हल्लींचा. [ सं. अद्य ]

**आडेपाडें**—न. शेतांतील दरएक खळ्यांतून कांहीं धान्य घेण्याचा पाटलाचा हक्क. अढेपारडें पहा. [ सं. अर्ध+( पाड=माप, किंमत.) म. परडें ]

**आंडेर**—अंडेर पहा.

**आंडेल**—पु ( गो. ) ताडाएवढा वाढलेला पण ठोंब्या असा मनुष्य. [ अंडिल; सं. अंडीर=पूर्ण वाढलेला माणूस ]

**आडो**—न. (गो.) शेत, बाग, घर इ०चें दगडी कुंपण; तट; गडगा; आडा पाहा.

**आंडोर**—अंडोर पहा.

**आडोरा**—पु. व्यभिचार; बलात्कार. 'फिरला पापकर्मे डांगोरा। विध्वंसिला यज्ञ सारा। मांडिला स्त्रियांसि आडोरा। प्रगटपणें।' कथा. ६.५४३. . [ दे. आडोलिया=रुद्ध: रोखलेलें. दे. अडाड= बलात्कार. ]

**आडोशीपाडोशी, आडोसा**—अ मध्यें पहा.

**आडौणें**—( गो. ) अडविणें. पहा.

**आडौनि**—क्रिवि. बाजूस; आडवें. 'आगाअे वीर हो आडौनि सरा । उजू हातिअेरूं धरा।' –शिशु ५६४. –शअ. आडून. 'पूर्णे चंद्राडौनि आभळु काढिलें.।'–शिशु ७२० अडून पहा.

**आड्डा**—पु. ( दारू काम ) चंद्रज्योती लावण्याकरितां एका कळकाला लोखंडी फूल ( अटा ) लावतात तो. [ अट, अड्ड ]

**आड्याळ**—न. ( माण. ) नांगराचें रुमणें. अड्याळ पहा.

**आढई**—स्त्री. ( कु. ) वगळी. [ सं आढि ]

**आढक**—वि. ओढून धरणारा; आढ्यतेचा. [प्रा. अडिढ्य. म. ओढणें. ]

**आढक**—पु. आठ पौंड, चार शेर किंवा पायलीचें माप. बंगालमध्यें दोन मणांचें माप. [ सं. आढक=एकचतुर्थांश द्रोण=१६ कुडव=७ पौंड, ११ औंस ]

**आढकस**—वि. १ मजबूत; घट्ट. अटस पहा. २ ( ल. ) धाडसी. [ अटस ]

**आढगळा**—पु. मांग लोकांचा सरपंच –गांगा. ३०.

**आढणी**—स्त्री. तिवई. अडणी पहा. 'रत्नजडित दीप ठेविले जवळी। जडित आढण्या त्या तळीं।' –ह २४.११९.

**आढन**—पु (व.) गाय, म्हैस इ० ची कांस. अडण पहा.

**आढमूढ**—वि. विस्तृत; अफाट; बफाम. अडमूठ पहा. 'आरामवाटिकेंत आढमूढ वाढून, आकाशास हात घालणाऱ्या वृक्षाची योजना' –टि १.१५२. [ सं. अर्ध+मूढ. का. अडमुट्ट ]

**आढवारा**—पु. छळ. –शर. –शुभानंद उद्योगपर्व. १२.२८. आडवारा पहा.

**आढळ, आढा, आढाऊ, आढाल**—अ मध्यें पहा.

**आढळणें**—अढळणें पहा.

**आढळून जाणें**—भेदून जाणें. ‘ तिलाहि तो आढळून जात असे. ’ –खरा देशभक्त २५९.

**आढाल**—न. शस्त्र; अडला. ‘ उगाउगीच भांडतो । उगाउगीच तंडतो । उगाउगीच ढाल घे । उगाउगी आढाल घे । ’ –दावि ७७६. [ सं. अड्ड=हल्ला करणें ] **०ढालाची**–वि. ढालगज; धीट. ‘ आढालढालाची पै थोर । अभावभावें अति सुंदर । दाटोनि रिघों पाहे घर । वशीकरण मज करील । ’ –एरुस्व ५.४५.

**आढाव, आढांव**—आडाऊ, आडाव पहा.

**आढावा**—अडावा पहा.

**आढाळ**—न. डोंबारी खेळ करतांना दोरीवरून चालतांना तोल सांभाळण्यासाठीं हातांत घेतात तो वेळू. ‘ ब्रह्मगोळकाचें आढाळ करी । ’ –भाए ६०५. [ का. अड्ड; आड+ल ]

**आढी, आढें, आढेकड, आढेवेढे**—अ मध्यें पहा.

**आढी**—स्त्री. फळें गवतामध्यें थरावर थर रचून पिकविण्याची योजना. अढी पहा. ‘ यासी शुकमुख लागलें । आवडीचे आढिये मुराले । संतजन सेवितां धाले । आनंदले परिपूर्ण ॥ ’ –ह १९ २२५ [ का. अड्कु=ढीग करणें. ]

**आढें**—न. घराच्या किंवा छपराच्या दोन पाख्यामधील लांब लाकूड. ‘ गृहा पांच वांसे असें येक आढें । ’ –कचेसुच २ –एभा ८ २३३ **०खांब**–( कों. ) खांबणी; आढें व तुळई यांस जोडून असलेला खांब. ( इं. ) किंग पोस्ट. **०आढ्याचें ताक**–न. ( क. ) आढें ज्यांत दिसेल इतकें पातळ ताक. ‘ आढ्याचें ताक व पोहे तो नेहमीं खातो. ’ [ आढें+ताक ]

**आढ्य**—पु धनिक; श्रीमान; संपन्न; युक्त सामाशब्द धनाढ्य; बलाढ्य; गुणाढ्य, गर्वाढ्य. ‘ आढ्य कुलीनजनाचें दावी औदार्य जें वितरणीं तें ’ –मोभीष्म ५.४५. [ सं. ]

**आढ्यता**—स्त्री. १ गर्व; ताठा; शिजासखोरी; प्रतिष्ठितपणा डौल. ‘ तुला निरोप पाठविला म्हणजे तूं यावें; तुम्हीं आला तरच येईन इतकी आढ्यता कशास पाहिजे. । ’ २ श्रीमंती. ‘ आढ्यु आतुडे आडवीं । मग आढ्यता जेवीं हारवी । ’ –ज्ञा १३.२०५. ( क्रि० धरणें; बाळगणें, मिरवणें. ) [ आढ्य+ता ] २ ख्याति; प्रसिद्धि ( निंदाव्यंजक ) [ सं. ]

**आढ्याकरवत**—पु. अढ्या करवत पहा. दोन माणसांनीं चालवावयाचा करवत.

**आढ्याचाखोबळा**—पु. उंसाच्या चरकाच्या लाटां( खुंटां ) पैकीं मधल्या लाटेच्या ( नराच्या ) डोक्यावर बसविलेली इंग्रजी U च्या आकाराची लोखंडी पट्टी. हींत चरक फिरविण्याचें जोखड बसवितात [ आढें+खोबळा ]

**आढ्यामारणें**—क्रि. १ ( व. ) धडपड करणें. ‘ पहिल्यानें स्वस्थ बसले आणि आतां आढ्या मारतात. ’ २ ( ना. ) हेलपाटे घालणें.

**आण**—स्त्री. १ शपथ. ‘ श्री विठ्ठलाची आण ’ –शक ११९५ चा चौऱ्यांशीचा शिलालेख. ( क्रि० घालणें; वाहणें; घेणें. ). माझ्या गळ्याची आण; देवाची आण वगैरे प्रयोग आहेत. ‘ कां भीमकाची आण । हे चंद्रकिरण । ’ –शिशु ८२२. ‘ धाडी बळें वृकाच्या घालुनि हरिणीस आण गेहाला । ’ –मोविराट १.५३ [ सं. आज्ञा; प्रा. आणा; सि. गु का. आण; ते आन ]

**आण**—स्त्री. ( कों. ) मिठाची रास ( माप ), कांहीं बंदरांत तीन खंडीची तर कांहीं बंदरांत अडीच खंडीची रास असते.

**आण**—उअ. १ आणिक; आणि; व. [ सं. अन्य ] –वि. अन्य; दुसरें; निराळें. ‘ आण करूं नये बापा । ’ –उषा १०९८ ‘ तुजसम वीर नाही आण । ’ –मुशांति ३०.१५६. [ सं अन्य; प्रा. अण्ण ]

**आंण**—न. ( गो. ) अंड; वृषण.

**आणआणूं**—क्रिवि. एकमेक; परस्पर. ‘ मग बोलतीं निपनवसां आणआणूं । ’ –शिशु ८१. [ सं. अन्योन्य ]

**आणको**—पु. ( गो. ) टोमणा; वाक्प्रहार. ( अव. आणके. ) [ आण ]

**आणक्रिया**—स्त्री. शपथक्रिया; प्रतिज्ञा; आणभाक. [ म. आण+सं. क्रिया ]

**आणखी, आणखीन्**—अणखी पहा.

**आणणावळ, आणवाई**—स्त्री. सामान वगैरे वाहून आणण्याची मजुरी. [ आणणें ]

**आणणें**—उक्रि. १ घेऊन येणें. जावून आणणें. २ बहुतेक; जवळजवळ या अर्थी. आणणें हें सहाय क्रियापद ईत प्रत्ययांत कोणत्याहि क्रियापदास जोडलें असतां त्या क्रियापदानें दर्शविलेली क्रिया बहुतेक पूर्ण झाली आहे असा अर्थ होतो. ‘ किल्ला बांधीत आणला होता; शत्रूची फळी फोडीत आणली होती. ’ [ सं आ+नी; प्रा. आणि सिं. आणणु; फ्रें. जिप्सी. अन ]

**आण ने**—स्त्री. १ ( एखादी वस्तु ) वारंवार इकडून तिकडे नेणें आणि आणणें. २ ( ल. ) उपद्व्याप; दगदग; कुतरओढ. तारंबळ [ आणणें+नेणें ]

**आणप्रमाण**—स्त्री. शपथ; शपथक्रिया; आणभाक. [ आण+प्रमाण ]

**आणभाक-ष**—स्त्री. १ शपथेनें दृढ केलेला करार किंवा वचन ‘ लटकें जाहलिया आणभाकेसि ’–एभा १२.२५६. [ आण+सं. भाषा म. भाक] २ लग्नांत कंकणबंधनाच्या वेळीं घ्यावयाची शपथ. या करारामुळें दोन्ही पक्ष ठरावाप्रमाणें वागण्यास बांधले जातात.

**आणशपथ**—स्त्री. वचन; शपथ. [ आण+शपथ ]

**आणा**—पु. १ रुपयाचा सोळावा भाग, हिस्सा. १ जमीन मोजणींत ७.५६२५ चौरस यार्ड म्हणजे एक गुंठ्याचा $\frac{1}{16}$ किंवा एकराचा $\frac{3}{640}$ भाग; गुंठ्याची साखळी १६ कड्यांची किंवा आण्यांची असते; २$\frac{1}{16}$ फूट लांब रेषेचें माप, प्रमाण. ३ कोणत्याहि वस्तूचा $\frac{1}{16}$ भाग. [ अणू–आणक=लहान; हलकें. सं. अंकनक; किंवा (कार्ष–आपणक – आअणअ – आणा ( राजवाडे ) तुल० आपण=बाजार आपणक) ] **आणे पैचा हिशेब**–पु. तंतोतंत हिशेब. **आणेवारी**–स्त्री. पाटीलकुळकर्णी वगैरे सारा आकारण्यापूर्वी उभ्या पिकाची पहाणी करून अंदाज करतात तो.

**आणा**—उखाणा. आहणा पहा.

**आणाआण**—क्रिवि. लागोपाठ घाईघाईनें सामानसुमान आणणें इकडून तिकडून सर्व बाजूंनीं –दिशांकडून आणणें, जमा करणें; जुळवाजुळव. [ आणणें द्वि. ] **०आणाआणीचा संसार**–घरचें उत्पन्न ज्यास अगदींच नाहीं अशा मनुष्यानें बाहेरचें मिळवून केलेला संसार. **आणा आणा मागें लागणें अथवा पाठीस लागणें**–१ हें पाहिजे, तें पाहिजे असा घरचा तगादा मागें लागणें. २ ( ल. ) लग्न करणें; कुटुंबवत्सल होणें; पुष्कळ माणसांचा प्रपंच चालविणें; अडचणींत येणें. ' भाऊराव, तुमच्या मागें आतां आणा लागला आहे, व्यवस्थित वागा हां ! '

**आणा–दोन आणे**–वि. थोडा तरी; किंचित; १६ आण्यांपैकीं कांहीं अंश ( १६ आणे गुण=पूर्ण गुण ). ' रोग्यास आणा दोन आणे तरी गुण दिसला पाहिजे.

**आणा, आणिखी, आणी, आणीक, आणीद्रा, आणी बाणी**—अ मध्यें पहा.

**आणापट्टी**—स्त्री. प्रत्येक बिघा, नांगर, मनुष्य इत्यादिकांगणिक घेतलेला एक आणा जादा कर.

**आणि, आण्, आन्(अन्)–न–नि**—क्रिवि. आणखी या अर्थी मराठीत कित्येक वक्ते पुढील प्रयोग करितात–१ अशा प्रकारची व्यवस्था आणि सरकारनें केली. २ तो आणि तसा वागेल हें संभवत नाहीं. ३ ब्राम्हण नि दारू पिईल हें होणार नाहीं. या स्थळीं आणि नि हे शब्द हन्त, हान या शब्दांचे अपभ्रंश आहेत. [ सं. हन्त=( ज्ञाने. ) हान–हानि–आणि–णि–आन्–न–नि. हान शब्द ज्ञानेश्वर असाच योजतो. –राजवाडे ( १८३२ ) ' म्हणौनि उदकीं हान रसु । कां पवनीं जो स्पर्शु । ! ' –राज्ञा ७.३२. ]

**आणि**—उअ. आणखी; व; शिवाय; आणिक. [ सं. अन्य ]

**आणिक**—उअ. आणि. –वि. अधिक; निराळा; वेगळा. अणिक पहा. ' मग आणिकु उपचारु केला तेहीं । तो सांगिजैलु आतां । ' –शिशु ७७२. –एभा ३.६९८. [ सं. अन्यत्क; प्रा. अणिक्क ]

**आणिकचि**—अ. भलतेंच; विलक्षण. ' आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे । ' –ज्ञा ६.३७१.

**आणियाळें**—वि. तीक्ष्ण; टोंकदार. अणियाळें पहा. ' अत्यंत सूक्ष्म आणियाळें । तांदुळां वेळिलें सोज्वळें । ' –एरुस्व १४.१२३.

**आणियाळीदृष्टि**–स्त्री. कटाक्ष; नेत्राच्या कोंपऱ्यांतून पाहणें; वांकडी दृष्टि. ' आणियाळिया दृष्टी । ' –भाए ३६५ [ सं. अणि ]

**आणी**—स्त्री. एक आणा किमतीचें चांदी, निकल इ० धातूंचें नाणें. आणा पहा.

**आणी**—स्त्री. ( चांभारी धंदा ) जोड्यास शोभा आणण्यासाठीं ठोपरामधून आणलेली शेंडी, टोंक. अणि–णी पहा. [ सं. अणि ]

**आणीशिवणें**–( चांभारी धंदा ) तजाच्या मध्यें टोंकास रेशीम भरणें.

**आणीक**—अणिक, आणिक पहा. ' हरिरहित सुखाचा हेतु आणीक नेणे । ' –सारुह २.६७.

**आणीकसारखा**—पु. दुसरा कोणीतरी; भलताच. 'आणीकसारखा असता तर चांगला चोप देता. ' [ अन्यत् + क + सदृश ]

**आणीया**—पु. अफूच्या ( खसखशीच्या ) पिकावरील एक रोग –कृवि ५०७.

**आणेक**—पु ( गो. ) टोमणा.

**आणेगा**—स्त्री. १ अधिकाऱ्याच्या द्वाहीनें ( एखादी गोष्ट ) बंद करणें. २ प्रतिबंध; मनाई. ३ द्वाही; दुराही. ४ शपथ; आण. अनेगा पहा. ( क्रि० घालणें; करणें; मोडणें; मानणें ). [ आण ]

**आणेआन**—वि. भलतेंच. ' एऱ्हवीं होईल आणेआन । ' –उषा ६५०. [ सं. अन्य द्वि. ]

**आणोजें**— न. अंकुर. ' देहीं कर्माचें आणोजें । ' –ज्ञा १४. ३२७. [ सं. अणि ]

**आण्कुमाण्कुल्यो**—स्त्री. ( गो. ) लहान मुलांचा एक खेळ.

**आत**—स्त्री. १ आत्या; बापाची बहीण. (मूळ संस्कृतांत स्वतःची वडील बहीण हा अर्थ असून बापाची बहीण हा अर्थ पुढें मराठींत रूढ झाला ). २ मामी; सासू ( या अर्थी कुणबी लोकांत कोंकणांत वापरतात). हा शब्द हाल–गाथा सप्तशतीमध्यें या अर्थी येतो. मराठे लोकांत मुलीची सासू म्हणजे तिची आत–बापाची बहीण–असते; तेव्हां आत म्हणजे सासू. [ दे. अत्ता=सासू, मामी (गाथासप्तशती); का. अत्ते=सासू, आई; ते. अत्त; द्रा. आत्त=आई; हिं. अत्ता; सं. अत्ता, अत्तिका=वडील बहीण. ]

**आत**—न. (कों. गो.) सीताफळ, (गो ) आंत. [सं. आतृप्य= सीताफळ; बं. आता; पोर्तु. आत; मलायी आत ]

**आंत**—शअ. क्रिवि. १ आंतल्या बाजूस; अंतर्भागांत. [सं. अंतर्] २ ठराविक मुदतीच्या पूर्वी; अगोदर. ' माझे पैसे महिन्याच्या आंत परत दे. ' ३ मध्यें; मिळून; धरून; संबंधांत किंवा संबंधानें;

ारोबर; ( गौणपणें ) एकांत एक; जसें–कामांत काम, खर्चात खर्च; गोष्टींत गोष्ट, उदीमांत उदीम करणें; पोटांत पोट चालविणें. इ० म्हणजे पुष्कळ, गोष्टी किंवा कामें हातांत घेणें किंवा करणें, किंवा मुख्य काम अगोदर करून त्याच्या अनुषंगानें इतर कामें करणें. ०मध्यें– अशुद्ध प्रयोग परंतु सामान्य लोकांत रूढ ) अंतर्भागांत. आंतल्या ाजूस ०बाहेर करणें–किंवा पाहणें–मागचा पुढचा विचार करणें ०येणें–खालावणें; न्हास पावणें; एखादा धंदा तोटयांत येणें; ाधनसामग्रीचा अभाव होणें. म्ह० आंत असें जसे, बाहेर पडे ासें=चांगलें आंत असेल तरच चांगलें बाहेर येईल.

**आंत**—न. आंतडें; आंत्र. ' एकार्ची लोंबतीं आंतें । घार्यी कोतें ाडकलीं । ' –एरुस्व १२.२२. [ सं. अंत्र; प्रा. अंत ]

**आतई, आतांई**—पु. (व.) आतेचा नवरा. ' माझा आतई ोथे राहतो. ' [ सं. अत्तिका+पति ]

**आंतउतां–तीं**—शअ. ( काव्य ) आंत; अंतर्भागीं; अतोत–तां ्हा. ' सांग जाई गृहाआंतउतां । ' [ सं. अंतर् ]

**आतंक**—पु. १ भीति; धाक. ' तयाच्या आतंकें द्विजतिलक ोथें चळवळी । ' –सारुह ७.२. २ रोग; व्याधि. [सं.] ०**निग्रह**– याधिनाश; रोगहरण.

**आंतकडीं–किटीं–किडीं**—स्त्री.अव. ( गो. ) आंतडीं. ' तॉ ल्या आंतकडेक कसलें दुर्येस जालां ख ? ' [ सं. अंत्र ]

**आंतकोनाडा**—पु. मोठया कोनाडयांत राखलेला लहान ोनाडा.

**आतखानी**—वि. मत्सरी; द्वेषी; असहिष्णु. [ आंत+खाणें ]

**आतगी**—स्त्री (वाणी जातींत ) आत; आत्या; बापाच्या हिणीस बहुमानार्थी म्हणतात. [ आत+गी–गे ]

**आंतचा**—वि. आंतील; आंतला. [ आंत. ]

**आंतचाल**—स्त्री. ( ज्योतिष ) एक मुहूर्त. सूर्य नक्षत्रापासून दिन क्षत्रापर्यंत होणाऱ्या नक्षत्रांपैकीं आरंभींच्या चार नक्षत्रांचा काल. ा मुहूर्त गाय, म्हैस नेण्या–आणण्यास शुभ मानतात. वरील एकं र नक्षत्रांत क्रमानें प्रथमच्या चार नक्षत्रांस आंतचालीचीं व त्या- ढील तीन नक्षत्रांस बाहेर चालीचीं अशी संज्ञा आहे. [ सं. अंतर्+ ? ]

**आंतडी, आंतडें**—स्त्री.न. १ आंत; अंत्र; नलाकृति अन्न ार्ग; पोटांतील नळी. २ तातीचें चर्म. [ सं. अंत्र. तुल० (इं.) न्ट्रेल; ग्री. एन्तेरोन् ] **आंतड्याला पीळ बसणें**–खरी कळ- ळ, काळजी वाटणें. **आंतडीं कुंपणावर घालणें**–(क ) अति- य त्रास देणें. शिवाय अंतडी–डें पहा.

**आतणें**—क्रि. १ होणें; पावणें. ' बकाच्या ऐसे आतलें वळ । ' –मुआदि १९.७७. ' असो जळीं लवण• विरोनि गेलें। रे क्षारतेसीं होतें उरलें। तेंहि हळु हळु मधुरता आतलें। या नांव ज्ञान स्थिति । ' –स्वानु ११.१.८५. २ दडपणें. ' परि कैसा भारें आतला पिकें । दैवाचेनि । ' –ज्ञा ६.१४५. ३ देणें; अर्पण करणें. ' प्रसन्न होऊनि वरदानास । साबरी विद्या आतुली । ' –नव ७.३. ४ व्यापणें. 'विचित्रता भूतांचियां । आपण आंतोनि ठिकरिया । '–ज्ञा १८.५३९. ५ स्पर्शणें; शिवणें. आतळणें पहा. [सं. आप्=मिळणें]

**आततायी–आतत्याई–यी**—वि. अपराधी; गुन्हेगार; खुनी, विष घालणारा, चोर, आगलाव्या, दुसऱ्याची• जमीन बळका- वणारा व दुसऱ्याची स्त्री हरण करणारा या सहांपैकीं एक; आत- ताई मनुष्याचे हे सहा प्रकार शुक्रनीतींत दिले आहेत. ' अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारापहारी च षडेते आततायिनः । ' ' शुक म्हणे कुरुनंदना । यादव टेंकले आत्ममरणा । ते मारावया रामकृष्णा । आततायी जाणा लोटले । ' –एभा ३०.१५८. २ (ल.) साहसी; हेकड; मूर्खपणाचें धाडस करणारा. [ सं. ]

**आतप**—पु. ऊन; सूर्याचा प्रकाश, ताप. ' सांगें वातवर्ष आतपु धरे । ' –ज्ञा ५.११४. [ सं. ]

**आतपत्र, आतपत्राण**—न. छत्री किंवा अबदागीर; ऊन निवारण करण्याचें साधन. ' छत्रातपत्रचामरयुग्म । ध्वजीं उत्तम गरुडलांछन । ' –एभा १५.१७३. ' निजबोधाचें आतपत्र । शिरीं तन्मयाचें छत्र । ' –एरुस्व १५.९६. [ सं. आतप+त्र ]

**आतपमूर्च्छा**—स्त्री. ज्या रोगांत कडक ऊन किंवा उष्ण हवेचा परिणाम शरीरांतील मज्जातंतूंवर प्रथम होऊन त्यामुळें हृदय व श्वसनेंद्रियें यांची क्रिया बिघडते व त्यानें मूर्च्छा व ताप येतो तो रोग. ( इं. ) सन्स्ट्रोक.

**आंतबट्टा**—पु. १ निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांची अदला- बदल, देवघेव करतांना मूळ रकमेंत येणारी तूट; बाहेरबट्ट्याच्या उलट [ आंत+बट्टा=घट ]. २ नफा अपेक्षित असतां नुकसान होणें; खोट; तोटा. ३ ( ल. ) बुडता धंदा. ' आंतबट्ट्याच्या या अजा- गळ सट्टयाला आंधळ्या श्रद्धेची साक्ष आणि अनोळखी ईश्वराची जामिनकी. ' –प्रेमसंन्यास. **–ट्याचा व्यापार**–पु. नुकसान सोसून केलेला–चालविलेला व्यापार–धंदा.

**आतबड**—आधवड; कातडें; अधोड पहा. ' बारा आतबडीचा जोडा ' –ऐपो ५७.

**आतर**—पु. उतारा; नावेंतून नदी उतरून जाण्याचें भाडें; नोर. ' तुम्हींच मग आतरास्तव मला सुदीना विका ' –केका २२. [ सं. आ+तृ–तर ]

**आंतर**—वि. आंतला; आंतल्या बाजूचा; मधला. [ सं. ] ०**त्वचा**–स्त्री. झाडाची आंतली साल. ' या आंतरत्वचा भवद्रुमा । वल्कलें म्हणावया महिमा । ' –एभा १२.४३९. ०**राष्ट्रीय**–वि. भिन्न भिन्न राष्ट्रासंबंधीं; परस्पर राष्ट्रांमधील; सार्वराष्ट्रीय ( व्यव- हार ). (इं.) इंटर नॅशनल. ०**विवर**–न. (प्राणि.) पोकळी. ( इं. ) व्हॅक्युओल. **-रास्तर**–न. (प्राणि.) गर्भपिंडाचें एक आंतील आव- रण. ( इं. ) हिपोब्लास्ट.

**आंतर्भाव**—पु. प्रीति; प्रेम; लक्ष. 'आंतर्भाव ते सासुरवाडीं। मायबापें राहिलीं बापुडीं।' -दा ३.२.३८. [सं. अंतर्+भाव]

**आंतर्वक्र पृष्ठ**—न. (ज्यो.) आंतील बाजूनें गोलाचें पृष्ठ पाहिलें असतां दिसणारा गोलाचा भाग. [सं.]

**आंतला**—वि. आंतील बाजूचा; अंतर्भागासंबंधीं. [अंतर्]

**आंतलीखूणगांठ**–स्त्री. मनांतील गुप्त हेतु; मतलब. **आंतलीचाल**–(राजा.) आंतचाल पहा. **आंतलीपाळ**–स्त्री. कानाच्या आंतील कड–बाजू–मांसल भाग; याच्या उलट बाहेरील पाळ.

**आंतल्या आंत**—क्रिवि. १ अंतर्भागांत; आंत; मध्यें. २ गुप्त रीतीनें; मनांतल्या मनांत; मुकाट्यानें. ३ आपआपसांत; घरांतल्या घरांत; आपल्या मित्रमंडळींत.

**आंतल्याकडचा–कडला–कडील–धडचा**—वि. आंतल्या बाजूचा; आंतील; मधील.

**आंतल्याकडेस–धडेस**—क्रिवि. आंतल्या भागावर; आंतल्या बाजूनें; आंतून.

**आंतल्या गांठीचा**—वि. खोल मनाचा; ज्याचे हेतू–बेत गुप्त आहेत असा; गुप्त मसलत्या; गुप्त कारस्थानी; मिस्किल; मतलबी.

**आतवता**—आतौता पहा.

**आंतवर–वार**—न. १ (चि. कों.) स्वयंपाक घर; माजघर; घराचा मध्यभाग; याच्या उलट बाहेरवार. 'आम्ही पुरुष बाहेर निजूं बायकांस आंतवार जागा पाहिजे!' [सं. अंतर्+वर्ती]

**आतश–ष**—पु. अग्नि. [फा. आतिश् = अग्नि; तुल० सं. आतप] ०**खाना**–पु. तोफखाना. 'किल्लयांत अबदुल अहदखानाचे आतशखान्यांत रहावें.' -दिमरा १.८६. ०**बाज**– वि. प्रेक्षणीय दारूकाम करणारा. -ऐटि १.४३. [फा. आतिश्+बाझ] ०**बाजी**–स्त्री. १ अग्निक्रीडा; शोभेचें दारूकाम; दारूची लंका. 'रात्रीं नाच रोशनी आतशबाजी जाली।' -रा ७.१४५. २ (ल.) चैन; करमणूक. [फा. आतिश्+बाझी] ०**बेहराम**–पु. पारशी लोकांचें अग्निमंदिर; [फा. आतिश्+बेहराम] अग्यारी पहा.

**आतस**—स्त्री. (कों. कुण.) आत; आत्या. [सं. अत्ता]

**आतसबाजी**—आतशबाजी पहा.

**आतळणें**—उक्रि. १ (काव्य.) संसर्ग होणें; स्पर्श करणें; शिवणें; भेटणें. 'ते कर्मी तरी वर्तती। परी कर्मफळा नातळती।' -ज्ञा २.२७८. -एभा २.४८०. आतणें पहा. २ पावणें; लाभणें. 'तुजहूनि शाल्व पवित्र भला। नाहीं अंबेसी आतळला।' -मुसभा ११.४९. ३ धारण करणें; पावणें; प्राप्त होणें. 'अगाध महोदधीचें जीवन। आतळे धवळ दुग्धवर्ण।' -मुआदि ४.११०. [सं. आप्= मिळणें]

**आतां**—क्रिवि. १ सांप्रत; या वेळेस; एव्हां 'एवढा वेळ घरीं होते, आतां बाहेर गेले.' अतां पहा. २ यापुढें; चालू क्षणानंतर. 'आतां पारा कैसा सोधावा'–वैद्यक बाड ७८. ३ ग्रंथ, विषय यांचें आरंभप्रतिज्ञेचें द्योतक. 'आतां शब्दाचे प्रकार सांगतों.' 'आतां वंदू कवीश्वर।' ४ सांप्रत; सध्यां. [वै. अधा, सं. एतर्हि, अथ; आत्तः (इतोपीत्यर्थे); आतां काय म्हणतोस (=इतोपि किं भणसि) आतः = आता, आतां. -राज भाअ. १८३४.]

**आॅतॉ**—पु. (गो.) भात शिजतांना येणारा कड, ऊत.

**आतांघटके**—क्रिवि. (कुण.) या घटकेस; यावेळीं. [आतां+घटिका]

**आंतॉड**—न. (गो.) बांबूचें बेट, बन.

**आताता**—उद्गा. अतत पहा.

**आताशीं–शें–सां**—अ. यावेळीं; हल्लीं; सांप्रत; आजकाल; अलीकडे. [आतां+असा]

**आति**—क्रि. होय; आहे. 'तुज सर्वज्ञा विचारितां धर्मे। कांइ संसारा आति।' -ऋ ४४. 'काइसे रचिति ते त्यासि सामर्थ्य आति।' -चक्रसिद्धांतसूत्रें १७.३. [सं. अस्ति; म. आहति]

**आतित**—अतित पहा.

**आतित्य**—आतिथ्य पहा. 'आलयाचें करावें आतित्य।' -दा ४.७.२५.

**आतिथ्य**—न. अतिथीचा सत्कार, सन्मान, पूजन, आदर; पाहुणचार; पाहुणेर. [सं.]

**आतिथ्य, आतिथेय**—वि. अतिथीला योग्य असें; पाहुण्यासंबंधीं, आदरसत्कार, पाहुणचार यासंबंधीं.

**आंतिमधारण**—न. (वास्तु.) अखेरचा जोर; दाब. (इं.) अल्टिमेट स्ट्रेस.

**आतिशय**—अतिशय पहा.

**आतिसो**—पु (काव्य) पुष्कळ; फार. अतिशय पहा. -वाक्यवृत्ति ४५७६. (-शर)

**आती**—स्त्री. (गो.) आत; आत्या. [सं. अत्ता]

**आती**—वि. आर्त; त्रस्त. 'आती रक्षावेआं।' -दाव ३३८. [सं. आर्ति]

**आंतील**—वि. १ आंतील बाजूचा; मधील; अंतर्गत. जसें–आंतील फितूर, दंगा, फूट, भेद. [सं. अंतर्] २ गुप्त; अंतर्गृहांतील. जसें–आंतील जाच–जुलूम–यातना–संताप–खातें–पत्र–हिशेब–वही इ. ०**आंख**–पु. व्यापारी लोक मालावर किमतीचा गुप्त आंकडा घालतात तो, किंवा कांहीं खूण. [सं. अंतर्+अंक] गुप्त याअर्थी इतर उपयोग–आंतील खातें–पत्र–याद–वही–हिशोब इ० ०**करारनामा**–पु. खाजगी रीतीनें घेतलेली वचनचिठ्ठी, करार. ०**जामिनकी**–स्त्री. आंतील जामीनदाराचें काम, धंदा. ०**जामीनदार**–पु. सरकारी रीतीनें

मोंगलाईत सरकारी वसूल करण्यासाठीं शेतकऱ्याच्या उरावर धोंडा ठेवीत असत यावरून ). सक्ति करणें; 'कोणी तुमच्या उरावर धोंड ठेवली होती ?'—नाकु ३.१५. **उरावर बसणें**–१ छातीवर बसणें. २ ( ल. ) टाळतां न येणारें काम अंगावर येऊन पडणें; त्यामुळें असहाय्यता येणें. ३ मागें लागून निकडीनें काम करून घेणें. ४ पुरुषानें एखाद्या स्त्रीवर बलात्कार करणें; स्त्रीसंभोग करणें. **उरावर हात ठेवणें-लावणें, ठेवून-लावून-सांगणें-बोलणें**–जोरानें वचन देणें; एखादयाबद्दल खात्रीनें सांगणें. 'या श्लोकाचा अर्थ मला समजला आहे, असें मी उराला हात लावून तुला सांगतों' **उराशीं धरणें**–१ आलिंगन देणें. २ नम्रपणानें प्रार्थणें. ३ कांहीं झालें तरी ( हातीं घेतलेलें काम ) शेवटास नेण्याचा निश्चय करणें; सतत (गोष्ट) स्मरणांत ठेवणें. ४ स्वीकारणें; पतकरणें; आपलें म्हणणें; न सोडणें. **उरावर शेगडी**–अतिशय दुःख; विवंचना; त्रास. **उराला हात लावणें**–सत्यता, आत्मविश्वास, निश्चय, धमक दाखविण्यासाठीं छातीस हात लावणें. **उरास लावणें-उरीं पोटीं धरणें**-दादाबाबा करणें; मन वळविणें. उराशीं धरणें पहा. **उराची-शिंप-शिंपी**–स्त्री. ( निंदाव्यंजक ) खोल छाती; छातीचा खळगा. **उराचा तख्ता**–पु. भरदार छाती. **उराचा पांजरा-पिंजरा**–पु. क्षीणतेमुळें छाती वरील सर्व हाडें दिसणें; छातीचा सांपळा. **उरावरचा गोहो-धगड**–पु. १ ज्या व्यक्ती-अगर वस्तूविषयीं एखाद्यास सतत भीति वाटते ती वस्तु; उरावरील दडपण; धोंड. २ नवरा; जार. [ कों. गोहो=नवरा ] **उरीं डोंगर घेणें**–कठीण काम स्वीकारणें; अतिशय दगदग करणें. **उरीं डोंगर पुरीं काट्या घेणें**–( छातीवर पर्वत घेणें व नदीच्या पुरांतून काटेकुटे ओढून काढणें ) पोटासाठीं अतिशय दगदगीचे काबाडकष्ट करून सर्व तऱ्हेचे उपाय करून पाहाणें. **उरीं पोटीं करणें**–अतिशय श्रम करणें उरापोटीं करणें पहा. **उरीं फुटणें**–ऊर फुटणें पहा. 'इतका अभ्यास करून उरीं फुटायचं आहे का काय ?'—मी ( आपटे ). **उरीं भरणें**–१ दमणें. 'उरीं भरली ऊरपोट । केली चळवळ झाली घाबरी ॥'—पला २. 'तो सक्तमजुरी करून उरीं भरला.' २ स्त्रियांच्या स्तनांचा उद्गम होणें; ऊर भरणें. **०तूट**–स्त्री. ( उराशीं धरण्यांत, मिठी मारण्यात अडथळा, प्रतिबंध, व्यत्यय यावरून ) वियोग; विरह. ( क्रि० करणें; होणें ). **०दुखी**–स्त्री. १ उरांतील दुःख. २ ( ल ) मत्सर; हेवा. **०पाकीट**–न. (क. शिवण) छातीवरचा खिसा. [ ऊर+इं. पॉकेट=खिसा ] **०फोड**–स्त्री. उरस्फोड; अतिशय दगदगीनें व संकटमय काम; श्रम; उद्योग. –वि. असे श्रम पडणारें, फार मेहनतीचें ( काम ) **०भेट**–स्त्री. छातीस छाती लावणें; मिठी मारून भेटणें.

**ऊर**—स्त्री. १ उरलेलें; जास्त झालेलें काम, पदार्थ, गोष्ट; बाकी; शिल्लक; शेष. 'इतकें आवण एवढ्या खांचरास पुरणार नाहीं असें वाटत होतें; परंतु पुरून ऊर आली.' 'या उरींत ( उरलेल्या कापडांत ) एक जाकीट बसेल.' २ तूट; उणीव; उरता या अर्थी. [ उर्वरित सं. उत्+ऋ ] **०न पूर**–स्त्री. उरणें न पुरणें; प्रसंगीं कामाला न पुरण्यासारखें किंवा पुरून न उरण्यासारखें सामान, सामग्री; उणीव, तूट कमतरता. **०पूर**–स्त्री. पुरून उरण्याइतकी सामग्री; भरपूर; समृद्धि; आधिक्य. [ उरणें+पुरणें ] **०सूर**–स्त्री. १ शिल्लक; बाकी; अवशेष [ ऊर द्वि. ] –वि. शिलकी; उरलेलें; राहिलेलें.

**ऊर**— न पु. ऊत; ओर; नदीचा पूर. [ सं. पृ-पूर् ; प्रा. ऊर ]

**ऊरु, ऊर**—न. खेडेंगांव. ग्रामनामवाचक सामासिक शब्दांतील अन्त्य भाग म्हणून येतें. उ० जसें देव+ऊर=देवूर, चंद्र+ऊर=चंदूर. [ सं. पुर, प्रा. ऊर; का. ऊरु ]

**ऊरु**—पु.स्त्री. गुढघ्याच्या वरचा भाग; मांडी. 'तरी ऊरु या जघनासी । जडोनि घाली ॥'—ज्ञा ६.१९२. [ सं. ] **०कर्म**–(नृत्य.) मांड्यांनीं केलेले अभिनय; नृत्यामध्यें ऊरुकर्मे पांच आहेत–स्तंभन, कंपन, वलन, विवर्तन, उद्वर्तन. **०उद्वृत्त भौमिचारी**–१ ( नृत्य ) टांच बाहेरच्या बाजूस येईल असें चवड्यावर उभें राहून व जंघा वांकडी करून वरच्यावर फिरविणें. २ ( करण ) उजवा हात फिरवून मांडीच्या मागें वांकडा करून ठेवणें व पोटरी वांकडी करून वर उचलून बाजूस वळविणें, म्हणजे मांडी वर होऊन जरा वळली जाते. **०मूल-संधि**–न.पु. १ मांडीचा कमरेशीं संलग्न असलेला भाग. २ जांघ; वंक्षण; कटिसंधि; आडसंधि. **०स्तंभ**–पु. एक वातरोग; वातानें खालचें अंग जाणें; पुष्कळ दिवसांचा मांड्यांचा पक्षघात.

**ऊरूफ**—ऊर्फ पहा.

**ऊरूबरू**—क्रिवि. समक्ष; समोर. उरुबुरु पहा. [ फा. रूबरू ]

**ऊर्ज**—पु. हिंमत; शक्ति; ताकद; तेज. [ सं. ऊर्जस् ]

**ऊर्जा**—स्त्री. उस्तवारी; संरक्षण. 'उरजा' पहा. [ सं. ऊर्जस् ]

**ऊर्जित**—न. उत्कर्षाचा काळ; चढती कळा; बढती; भरभराट; कल्याण. [ सं. ] –वि. शक्तिमान्; चढता; उत्कर्षाचा. **०कळा-काल**–स्त्री.पु. भरभराटीचे दिवस.

**ऊर्ण**—न. लोंकर; तंतू; धागा. [ सं. ] **०तंत**–पु. कोळ्याच्या ( किड्याच्या ) जाळ्याचा धागा; 'हस्त ( हत्ती ) बांधीजे ऊर्णतंतें । लोभें मृत्य भ्रमराते.'—दा २.१०.१५. **०नाभी**–पु. कोळी; किडा (याच्या शरिरांतून लोकरीसारखा धागा निघतो ). ऊर्णनाभी पहा. 'ऊर्णनाभीचा तंतुसुत्रीं । जरि उचलिजेल धरित्री ॥' [ सं. ]

**ऊर्णा**—स्त्री. १ लोंकर ( मेंढी, ससा, उंट इ० चे केस ). २ लोंकरीचें कापड. (शाल, घोंगडी ). ३ दोन भुवयांमधील नाकाच्या मुळाशीं असलेले केस. या ठिकाणीं भोंवरा असणें हें सार्वभौमत्वाचें लक्षण समजतात. [ सं. ऊर्ण ]

**ऊर्ता**—स्त्री. ( व. ) वाट पाहणें, थांबणें. अरुता पहा. ' माझी ऊर्ता नको, तुम्ही लग्न जुळवा. ' [ अरुता ]

**ऊर्ध, ऊर्ध्व**—क्रिवि. वरती; उंच; वर. –वि. १ वरील; उंचावरचा. २ ( गणित ) उभा; लंब. ( इं. ) व्हर्टिकल. [सं. ऊर्ध्व] **ऊर्ध्वगति**–स्त्री. वर चढणें; उंच उडणें, जाणें; आकाशांत भराऱ्या मारण. 'विचारें ऊर्ध्व चढती । तयासीच ऊर्ध्वगति ॥ ' –दा १७ ३. २२. **०मुख**–वि. वर तोंड करून पहाणारा. –क्रिवि. वर तोंड करून ' ऊर्धमुखें भेद तुटतो. ' –दा २०.३.२२. ' चिंतूनियां चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें । ठेलीं सकळिक पाहतचि॥ ' –तुगा ४२.

**ऊर्ध्व**—पु. १ मरण्यापूर्वी लागलेला श्वास; घरघर. २ एक रोग; श्वास; दमा; छाती भरून येणें. ३ खस्वस्तिक. [सं.] **०गति**–वि. उंच जाणारा, उडणारा. **०जानु (आकाशीचारी)**–(नृत्य.) एक पाय आकुंचित करून गुडघा वक्षस्थळाइतका उंच करणें व दुसरा पाय तसाच ठेवणें. **०जानु करण**–न. ( नृत्य ) उजवा पाय कुंचित करून गुडघा उंच करणें, डावा हात वक्षस्थळावर व उजवा हात उजव्या पायाप्रमाणें कुंचित करून वर उचलणें. **०दृष्टि**–विं. वर किंवा आकाशाकडे, वरच्या दिशेकडे नजर लावलेला ( माणूस ); वरडोळ्या; दूर दृष्टीचा; उदात्त हेतूचा; गर्विष्ठ; महत्त्वाकांक्षी; थोर मनाचा. –स्त्री. १ आकाशाकडे असलेली नजर. २ ( ल. ) कपट; महत्त्वाकांक्षा; अभिमान; उच्च हेतु. **०देह**–पु. मरणोत्तर आत्म्याला प्राप्त होणारा देह. **०देहिक**–न. उत्तरक्रिया. और्ध्वदेहिक पहा. **०नाडी**–स्त्री. वर जाणारी नाडी; सुषुम्ना. इडा पहा. **०पंथ**–पु. ( काव्य ) वरचा मार्ग; वरची दिशा; स्वर्गास किंवा आकाशांत जाण्याचा रस्ता. ' जों जों वाढे पर्वत । मैनाक नामें अद्भुत । तों ऊर्ध्वपंथ आडवा येत । हनुमंतासी ते काळीं ॥ ' **०पातन**–न. पाणी अथवा इतर द्रव पदार्थ यांची आंच लावून वाफ करणें व त्या वाफेचें पुन्हां द्रवपदार्थांत रूपांतर करणें, या सर्व क्रियेस ऊर्ध्वपातन क्रिया म्हणतात. ( इं. ) डिस्टिलेशन. या क्रियेनें पदार्थाचा अर्क काढणें. **०पान**–न. ( सांकेतिक ) दारू पिणें अथवा मादक पदार्थ सेवन करणें. **०पुंड्र**–पु.कपाळीं लाविलेला चंदनाचा उभा टिळा; उभें गंध. 'ऊर्ध्वपुंड्र भाळ। कंठीं शोभे माळ। कांपिजे कळिकाळ तया भेणें॥' –तुगा २२१४. **०बाहु**–पु. सतत वर हात ठेवणाऱ्या वैराग्यांचा एक पंथ. **०मस्तक**–न. डोक्यावरची कवटी. **०मुखी गोम**–स्त्री. (घोड्याच्या अंगावरील) गोमेसारखा केसांच्या अग्रांचा वर वळलेला झुबका. हा अशुभकारक समजतात; याच्या उलट अधोमुखी गोम. **०मूळ**–वि. वर मुळें असलेला; उलटा १ ( ल. )देह; शरीर. २ प्रपंच जगत्. **०मंडल**–न. (नृत्य) दोन्ही हात वर करून वाटोळें फिरणें. **०रेखा-षा**–स्त्री. १ तळहातावरील किंवा तळपायावरील वर जाणारी सरळ रेघ. ' ऊर्ध्वरेषा पाया असली म्हणजे राज्य किंवा तीर्थयात्रा.' २(गणित) लंब रेषा; उभी रेषा. **०रेतस्क-रेता**–पु. हनुमान, भीष्म इ० चिरब्रह्मचारी. –वि. नैष्ठिक; आमरण ब्रह्मचारी; ज्याचा कधींहि वीर्यपात होत नाहीं असा. ' तेथ वसती सनकादिक । ऊर्ध्वरेते देख महायोगी । '–एभा २४.२१७. ' तो राघवप्रिय विरक्त । ऊर्ध्वरेतस्क वज्रदेही ॥ ' ' ऊर्ध्वरेत मुनीश्वरांसी । ' –गुच १३.६९. **०लोक**–पु. १ स्वर्ग; इंद्रलोक. २ स्वर्गातील अनेक लोक ( चंद्रलोक, ब्रह्मलोक इ० ). **०वात-वायु**–ऊर्ध्व अर्थ १ व २ पहा. **०वाट**–स्त्री. स्वर्गाची वाट; ऊर्ध्वपंथ. ' प्राणाशीं दुजायींच्या दाउन ऊर्ध्ववाट माघारे फिरती।'–ऐपो २६९. **०स्वस्तिक**–न. खस्वस्तिक. **०संस्थ ( बाहु )**–( नृत्य ) पाहणाराच्या मुखाआड न येतां, लोंबत सोडलेले बाहू वर नेणें.

**ऊर्ध्वाधर**—वि. खस्वस्तिक व अधःस्वस्तिक यांच्याकडे टोकें असलेला; लंब, सरळ रेषेंत उभा. [ ऊर्ध्व+अधर ]

**ऊर्ध्वासन**—न. ( योग. ) चौऱ्यायशीं आसनांपैकीं ताठ उभें राहणें हें एक आसन. [ सं. ऊर्ध्व + आसन ]

**ऊर्ध्वी**—स्त्री. ऊर्ध्वनाडी पहा. ' मग ऊर्ध्वीचिया रिगानिगा। पुढती तेचि शक्ति पै गा । ' –ज्ञा १८.३३७. [ सं. ऊर्ध्व ]

**ऊर्फ**—वि. नांवानें लोकांमध्यें माहीत असलेला; प्रसिद्ध नांवाचा; सामान्यतः; दुसऱ्या नांवाचा; टोपण नांवाचा; अथवा; म्हणजे. उर्फ पहा. ' माहे मोहरम ऊर्फ चैत्र. ' –मोल. ' बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडनीस. ' [ अर. उर्फ्=नांवाचा; प्रख्यात. ]

**ऊर्मि-र्मी**—पुस्त्री. १ लाट; उसळी; उकळी; तरंग; लहर (पाण्याची). ' तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय । ' –तुगा ४०१६. ' आली ऊर्मी साहे । ' –तुगा. २ वेग; प्रवाह. ३ (ल.) आकस्मिक उत्कंठा; इच्छा; आग; वृत्ति (मनाची). ' कि क्रोधऊर्मी दारुण । सद्विवेकें आवरिजे । ' [सं. ऊर्मि]

**ऊर्मिका**—स्त्री. ( लहरीप्रमाणें चमकणारी ) अंगठी. ' उद्योत तो उत्कट ऊर्मिकांचा । ' –सारुह ८.१५२. [ सं. ऊर्मि = लाट ]

**ऊर्वी**—उर्वी पहा.

**ऊषर**—स्त्री. खाजण; खारी जमीन. [ सं. ]

**ऊष्मवर्ण, ऊष्मा**—पु. ( व्या. ) श, ष, स, या अक्षरांस ही संज्ञा त्यांच्या उच्चारावरून लावतात. हे उष्म म्हणजे उष्णता उत्पन्न करणारे अथवा प्रखर उच्चाराचे म्हणून यांना हें नांव आहे. कोणी ऊष्मवर्णांत ' ह ' चाहि समावेश करतात. [ सं. ]

**ऊष्मा**—उष्मा पहा.

**ऊस, ऊंस**—पु. साखर, काकवी, खडीसाखर, गूळ इ. ज्याच्या रसापासून तयार होतात अशी एक ५–६ हात उंचीची वनस्पती; ऊंस हिंदुस्थानांत सर्वत्र होतो. याचे पांढरा, तांबडा, काळा, पुंड्या, पटरी वगैरे प्रकार आहेत. तसेंच १ साल्या=दरसाल गाळला जाणारा; याच्या गुळाचा उतार कमी असतो. २ आड(ढ)साल्या=दीड वर्षानें गाळला

जाणारा; याचा गूळ कसदार व रुचकर असतो. ३ खोडवा=जमिनी पासून वीतभर बुंधा राखून तोडतात व त्यास धुमारे फुटून होणारा; याचा गूळ चिकीचा असतो. उसाचा कोणताहि भाग फुकट जात नाहीं. हा समशीतोष्ण आहे. रस थंड असतो. वेडा ऊंस म्हणून एक औषधोपयोगी प्रकार आहे. २ उंसाचा फड; उभें पीक. 'उसांत जाऊन वाढें शोध किंवा आण.' [सं. इक्षु; प्रा. इक्खु, उच्छु; हिं. ऊख.] ०म्ह १ ऊस गोड लागला म्हणून मुळासकट खावा ? ; =एखादी गोष्ट चांगली असली म्हणून आपल्या फायद्याकरितां तिचा हवा तसा उपयोग करावा काय ? ऊंस गोड पण मुळया खोड=एखादा उदार भेटला म्हणून आपण त्याला साराच लुबाडूं नये. ऊस मुळासकट खाल्ला तर मुळापासून दातांना त्रास होऊन रक्त येतें, त्याप्रमाणें एखादा देणारा भेटला व त्याचा फार फायदा घेतला तर तोही त्रासतो. २ (व.) उसापोटीं काऊस=सूर्यापोटीं शनैश्वर ३ उसांत जाऊन वाढें शोधी, किंवा आणणें. **उंसांनलें वाड**-१ उसाचा शेंडा, वाढें. २ (ल.) हुषार, होतकरू मुलगा. ०**खतविणें**-उसास खत घालणें. ०**साळणें**-**सोजळणें**-उसाचीं पानें-पाती सोलणें.

**ऊस**—स्त्री. एक प्रकारची खारी माती [सं. ऊष-र. प्रा. ऊस= खारी माती]

**ऊसदार**—न. पुढील दार; त्याच्या आसपासची जागा; शेजारचा प्रदेश. परसदार याच्या उलट. [उजूदार]

**ऊह-हु**—पु. १ तर्क; अजमास; अंदाज; तर्कज्ञान. २ परिस्थित्यनुरूप बदल केलेला (शास्त्रवचनांत वगैरे). उह्यु अर्थ १ पहा. [सं.] ०**चाळणें**-प्रतिपादन करणें. 'अर्थी असत्याचा वडिवारू। सद्भावें केला जो सद्गुरु। त्यासि मिथ्या नास्तिक विचारू। एकांतीं नरू ऊहु चाळी।' -एभा २३.२२७.

**ऊहापोह**—पु वाटाघाट; साधकबाधक विचार; शहानिशा; विचारपूर्वक करावयाची योजना; काळजीपूर्वक चर्चा, विवरण. 'त्या तत्त्वांचा पूर्ण ऊहापोह करून आमच्या ऋषींनीं मागेंच निर्णय केला आहे.'-टि ४.१२५. [सं. ऊह=तर्करूप ज्ञान+अपोह=विपरीत तर्क.]

**ऊहापोहणें**—क्रि. चर्चा करणें; वाटाघाट करणें. 'आतां व्यापकु कीं एक देशी। हे ऊहापोही जे ऐसी।' -ज्ञा ६.८९.

**ऊंहूं**—उद्गा. छे ! नव्हे ! नको (असंमतिदर्शक). [ध्व.; ऊं+हुं= हुंकार.]

**ऊळ**—स्त्री. कांद्याचें रोप; पातीच्या कांद्याची गड्डी. [का. उळ्ळि=कांदा]

---

# ऋ

**ऋ**—मराठी वर्णमालेंतील सातवें अक्षर. हें अक्षर इ. स. च्या ६ व्या शतकांत उष्णीषविजयधारणीच्या ताडपत्रांत प्रथम आढळतें. वर्तमान नागरी ऋ याच आकृतीपासून बनला आहे. यानंतर १० व्या शतकांतील एका नेपाळी हस्तलिखित पुस्तकांत व ११ व्या शतकांतील कांहीं लेखांत ऋ दिसतो.

**ऋक्**—पु. चार वेदांपैकीं पहिला वेद; ऋग्वेद. -स्त्री. ऋग्वेदांतील ऋचा, मंत्र; सूक्तांतील एक भाग. ०**संहिता**-स्त्री. ऋग्वेदसंहिता; ऋग्वेद ग्रंथ; ऋग्वेद पहा. [सं.]

**ऋग्वेद**—पु. चार वेदांपैकीं पहिला वेद. या वेदाचीं १० मंडलें असून तीं निरनिराळ्या ऋषींच्या नांवांवर आहेत. कांहीं ऋचांचें एक सूक्त व कांहीं सूक्तांचें एक मंडल अशी याची गणना आहे. याची दुसरी गणना म्हणजे आठ अष्टक व ६४ अध्याय ही होय. कांहीं ऋचांचा एक वर्ग, कांहीं वर्गांचा एक अध्याय, आठ अध्यायांचा एक अष्टक व असे आठ अष्टक म्हणजे ऋग्वेद. ही विभागणी अलीकडील आहे. ऋग्वेदाचीं एकंदर सूक्तें १०२८ असून एकंदर ऋचा १०५८०॥ व अक्षरसंख्या ४३२००० आहे. चारी वेदांत ऋग्वेद मोठा आहे. ऋग्वेद हा हौत्रवेद असून यज्ञांतील होता नामक ऋत्विजानें यांतील मंत्र म्हणावयाचे असतात [सं.]

**ऋग्वेदी**—पु. ऋग्वेदास अनुसरणारा ब्राह्मण; ज्याच्या कुलपरंपरेंत-उपनयन, विवाहादि संस्कार ऋग्वेदांतील मंत्रांनीं होतात असा ब्राह्मण; ब्राह्मणवर्गांतील एक शाखा. [सं.]

**ऋचा**—स्त्री. १ ऋग्वेदसूक्तांतील एक मंत्र, श्लोक. 'बोलती निषेधनियमें। जिया ऋचा यजुःसामें।' -ज्ञा १५.१६६. २ वेदांतील मंत्र. 'ऋचा श्रुति स्मृति। अधेय स्वर्ग स्तबक जाती।' -दा १२.५.४. 'ऋचेंतल्यां...स्वरांची संथा घेत स्टेजवर नाच करतो.' -नाकु ३.१२. [सं.]

**ऋजु**—वि. १ सरळ; प्रत्यक्ष; उजू. २ (ल.) प्रामाणिक; निष्कपटी; साधा; अकृत्रिम; सच्चा. [सं.]

**ऋजुभुजक्षेत्र**—न. (गणित) बहुकोणाकृति; सरळरेषाकृति. [सं. ऋजु+भुज+क्षेत्र]

**ऋण**—१ कर्ज; देणें; रीण; परत द्यावयाच्या बोलीनें (सव्याज किंवा तसेंच) घेतलेलें द्रव्य, इ०. २ (ल.) उपकार; माणसाला पुढील तीन ऋणें असतात असें समजलें जातें-देवऋण; ऋषिऋण; पितृऋण; कोणी मनुष्यऋण असें चौथें ऋण मानितात. ऋणत्रय पहा. 'हें माझें पूर्वील जुनें ऋण। देवापाशीं जाण ठेविलें होतें।' -एभा २३.४५२. 'ऋण फेडावया अवतार केला। अविनाश आला आकारासी।' -तुगा १०. २ (अंकगणित) बाद किंवा वजा करावयाचा अंक, रक्कम. ३ (बीजगणित) वजाबाकीचें चिन्ह; उणें चिन्ह; उणी संख्या; वजा करावयाची संख्या; याच्या उलट धन. ४ (पदार्थविज्ञान) विजेचा एक प्रकार; (इं.) (निगेटिव्ह) अपसारक विद्युत्; धनविद्युत्च्या उलट ऋणविद्युत्; जवळ असलेल्या दोन पदार्थांपैकीं एकावर ऋणवीज असेल तर दुसऱ्यावर धनवीज उत्पन्न

होते. [ सं. ] ०करणें-१ कर्ज काढणें. २ कर्ज करणें. ०काढणें- कर्ज काढणें. ०फिटणें-कर्जमुक्त होणें; उपकाराची फेड होणें. 'मेलों रणांत म्हणजे तुमचें याचेंहि सर्व ऋण फिटलें।' -मोभीष्म ११. ७४. म्ह० १ ऋण काढून सण करणें=अनुकूलता नसतांहि उसन्या पैशांवर लौकिक, हौस संभाळणें. २ ऋणं कृत्वा घृतं पिबेत्=प्रसिद्ध नास्तिकाग्रणी चार्वाक याच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या पुढील श्लोकांत हा चरण आहे. 'यावज्जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः।' (अर्थ-जीवांत जीव आहे तोंपर्यंत चैन करावी ऋण काढून तूप प्यावें. कारण या देहाचा भरंवसा काय? जळून गेलेला देह पुन्हां मिळत नाहीं). ०करी-वि. १ कर्ज देणारा; सावकार; उत्तमर्ण. २ कर्ज घेणारा; देणेदार; ऋणको; अधमर्ण. ३ ज्यापासून कांहीं उपयोग नाहीं पण ज्याला उगीच पोसावें लागतें असा, कुचकामाचा माणूस; आळशी, आयत खाऊ अशास निंदेनें म्हणतात. ४ ज्याच्याकडून आपल्याला नेहमीं मदत होते व जो सारखा आपल्यावर कृपा करीत असतो अशा माणसास कृतज्ञतादर्शक बुद्धीनें म्हणतात. ०ग्रस्त-वि. कर्ज-बाजारी; कर्जांत बुडालेला ०घातकी-वि. (ना.) अवसानघातकी; ऐन वेळेवर मागें घेणारा. ०चिन्ह-न. (गणित) उणें चिन्ह, (-) ऋण अर्थ ३ पहा. ०त्रय-न. देवऋण, पितृऋण, ऋषिऋण; ऋण अर्थ १ पहा. 'मी ऋणत्रयापासून त्रिशुद्धि। मुक्त झालों भगवंता।' 'प्राचीन ग्रंथांतून ऋणत्रयाची कल्पना आढळते.' -टि ४.१४८. ०दार-वि. देणेदार; ऋणकरी; ऋणकरी अर्थ २ व ३ पहा. ०धन-न.१ कर्जाऊ, उसना घेतलेला पैसा. २ उणें अधिक चिन्ह. ०ध्रुव-पु. (पदार्थ विज्ञान.) (चुंबकाच्या किंवा विजेच्या) दोन टोकांपैकीं एक टोंक. (इं.) निगेटिव्ह पोल; कॅथोड याच्या उलट. ०पद-न. वजा करावयाचा राशि, पद; ऋण अर्थ ३ पहा. ०बंध-बंधन-पुन. कर्जाचें बंधन; कर्जाची अटक; कर्जाचा जाच. ०बद्ध-वि. कर्जानें बांधला गेलेला; ऋणग्रस्त. ०मुक्त-वि. कर्जमुक्त झालेला; अऋणी. ०मुक्ति-मोक्ष-मोचन-शोधन-स्त्री.पुन. कर्जाची फेड; कर्जाचें वारण; कर्ज देऊन टाकणें. ०मोचित-वि. १ ऋणमुक्त. २ (कायदा) धनकोनें कर्ज निवारिलें असतां जो धनकोचा नोकर होतो तो. ०वई-पणा-वि.पु. ऋणी; ऋणीपणा. 'निळा म्हणे ऋणवई-पणा। होतसां नारायणा उत्तीर्ण।' -निगा १९०. -नागा ६३५. ०विद्युत्-स्त्री. विजेचा एक प्रकार. (इं.) निगेटिव्ह इलेक्ट्रिसिटी; ऋण अर्थ ४ पहा. याच्या उलट धनविद्युत्. ०हर्ता-वि. (ऋण फेडणारा.) परमेश्वराचें एक विशेषण. ख्रिस्ती वाङ्मयांत प्रयोग.

**ऋणको**—पु. कर्ज असलेला; कूळ; अधमर्ण; ऋणकरी; धन-कोच्या उलट. [ ऋण ]

**ऋणवैपण**—न. ऋणवईपणा पहा. 'तें ऋणवैपण देखोनि अंगीं। मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं।' -ज्ञा ८.१३१. [ ऋण ]

**ऋणाईत, ऋणाईतस्वरूपी, ऋणायतस्वरूपी, ऋणायी-तस्वरूपी**-पु. १ (सामा.) ऋणकरी. २ कांहीं उपयोग नसतां पोसावा लागणारा ऋणकरी. 'उगीच ऋणायतस्वरूप्यासारखें डोक्याला हात टेकून चार चौघे येथें येतात तेथें बसूं नका.' -मोर ४. ३ देणे-दार; कर्जदार. 'एक म्हणे हा माझा ऋणायित। भला सांपडला येथ।' -एभा २३.५२१. म्ह० सगळी साळ्याची, अर्धी माळ्याची धनीण तेल्याची अन् ऋणाईत ब्राह्मणाची (बायको).

**ऋणादान**—न. १ सावकारीचा धंदा; पैसे उसने देण्याचा व्यवसाय. २ कर्जवसुली; उग्राणी. ३ कर्जफेड. [ सं. ऋण+आदान ]

**ऋणानुबंध**—पु. १ चालू सुखदुःखाचा पूर्वजन्माशीं ऋण-संबंध; इष्टानिष्ट फल देणारा पूर्वसंबंध; प्राक्तन; योगायोग; ईश्वरी-सूत्र. 'हा परमेश्वराच्या घरचा ऋणानुबंध.' २ स्नेहसंबंध; घरोबा; मैत्री. 'जन हो? मजपासुनिया सुखदुःखाशा मुळींच वर्जावी। सरला ऋणानुबंधचि ईशस्मरणींच वेळ योजावी॥' -वनवासी फूल-टिक. [ सं. ऋण+अनुबंध ]

**ऋणिया**—वि. १ कर्जदार; देणेकरी; ऋणको. 'परी मेचु ये होइजेल। ऋणिया तुज॥' -ज्ञा १८.३०१. २ धनको; सावकार. 'जैसा समर्थु आणि ऋणिया। मार्गीं आला बाइणिया। न लोटे तैसा प्राणिया। पडे तो भोगु॥' -ज्ञा १८.२५२. [ ऋण ]

**ऋणी**—वि. १ ऋणासंबंधीं. २ देणेदार; ऋणको. 'आमुचा तू ऋणी ठायींचाचि देवा। मागावया ठेवा आलों दारा॥' -तुगा १२१९. ३ (ल.) उपकारबद्ध; उपकृत. 'त्याचे आपण ऋणी नाहीं काय?' -टि ८.१४८.

**ऋत**—न. सत्य; खरेपणा. [ सं. ]

**ऋतु**—पु. १ विशिष्ट कालावधि, हवामानाप्रमाणें मानलेला वर्षाचा एक भाग; हवामानांत नियमानें होणारा फरक; भारतीयकाल-गणनेप्रमाणें दोन महिन्यांचा काळ. हे वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत व शिशिर असे सहा ऋतु कल्पिले आहेत. यूरोपांत वसंत, ग्रीष्म, वर्षा व शरद असे चारच मानतात. 'ते ऋतुकाळींचा मारुत्। ज्ञानवनांतू जे रिघे॥' -एभा १२.१. २ स्त्रियांचा मासिक विटा-ळाचा काल; स्त्रियांचा रजोदर्शन काल. ३ (ल.) हंगाम; मोसम (झाडावरील फुलां-फळांचा). ४ गर्भधारणेचा काळ फळण्याचा काळ (पशुपक्ष्यांचा); ज्वानी. ५ सहा संख्येचा गट, षट्पंचक (ल.) सहा ही संख्या. [ सं. ] ०काल-१ गर्भधारणेचा काल हा रजो-दर्शनापासून १६ दिवस असल्यामुळें संभोगास व सुप्रजाजननास योग्य समजला जातो. 'हेंही वेदें नेमिलें जाण। स्वदारागमन ऋतु-काळीं।' -एभा २१.१९६. २ ऋतुपरत्वें येणारा काल; ऋतु चालू असलेली वेळ; हंगाम; मोसम. 'ऋतुकाळें फळें येती पूर्ण। त्यासि दृष्टिभेटी हाटीं जाण।' -एभा २३.९८. 'ऋतुकालोद्भव पुष्प-फळ।' ०गण-पु. ऋतूंचा समुदाय; सारे ऋतू. ०त्रय-न. तीन ऋतू;

उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा. 'पैं ऋतुत्रय आकाशें । धरुनियाही जैसे ॥' –ज्ञा १४.२९१. [सं.] ०**दर्शन**–न. रजोदर्शन; स्त्रियांस प्रथम प्राप्त होणारा ऋतु, विटाळ; नहाण; ऋतुप्राप्ति. ०**दान**–न. संभोग; स्त्रीसमागम. ' 'अर्धरात्रीनंतर भार्येस ऋतुदान करावें.' –सुसु १७. ०**पति**–पु. वसंतऋतु. 'जेसें ऋतुपतीचें द्वार । वनश्री निरंतर । वोळगे फळभार । लावण्येसी ।' –ज्ञा ३.१००. (जुनें अप. रूप ऋतिपति. 'फुलबडवा ऋतिपति । बोलिका बृहस्पती ॥' –शिशु ५१. ०**पर्याय**–पु. ऋतूंचें परिवर्तन; अनुक्रम; ऋतूंचें पुन्हां-पुन्हां येणें; ऋतूंत बदल. ०**प्राप्ति**–स्त्री. रजोदर्शन, ऋतु प्राप्त होणें; नहाण; विटाळशेपण. 'मुख्य मुख्य स्मृती आणि सूत्रें हुएनसांगच्या वेळीं प्रचारांत असून पूज्य मानीत असत. या ग्रंथातून मुलीचा लग्नाचा काळ आठ वर्षांपासून ऋतुप्राप्तीपर्यंत सांगितला आहे.' –टि ४.११५. ०**मती**–स्त्री. (अप. रूपें–ऋतुवंती–वंता–वती.) १ विटाळशी; प्रथम ऋतु प्राप्त झालेली कन्या; न्हाणोली. २ विटाळ प्राप्त झाल्यापासून १६ दिवसपर्यंत गर्भसंभव होण्यास किंवा गर्भधारणेस योग्य स्त्री; विशेषतः चवथ्या दिवशीं ती अशी अवश्य भोग्य समजतात. 'व्रत व श्राद्ध सांग होऊन ऋतुमतीची इच्छाही पूर्ण होईल.' –सुसु १७. ०**शांति–शांत**–स्त्री. प्रथम रजोदर्शनसमयीं अनिष्ट मासादिकांचें दूषित फलनाशार्थ करावयाची शांति; गर्भाधानविधि. 'कारण पुढें शुक्राचा अस्त आहे म्हणून कुटुंबाची ऋतुशांति करून घ्या.'–कफा ९. ०**संपादणें**–ऋतुदान करणें; संभोगणें. 'दिवस पांचवा ऋतु संपादून मग जा गुणराशी ।'–पला ९२. ०**स्नाता–त**–वि. १ विटाळशेपणानंतर स्नान करून शुद्ध झालेली. २ (चुकीनें) विटाळशी; ऋतुमती; रजस्वला. 'ऋतुस्नात भार्या, जिला चतुर्थ दिवस त्याच दिवशीं एकादशी ...... आली असेल तर ...' –सुसु १६. ३ संभोगयोग्य; उपभोग्य. 'कां शुनी जैशी ऋतुस्नात । तिसीं भोगूं यती श्वान बहुत.' –एभा १०.५२२. [सं. ऋतु+स्नाता; ऋतुस्नात चुकीचा प्रयोग]

**ऋतूद्भव–द्भावक**—वि. आर्तवजनक; ऋतु प्राप्त करून देणारें (औषध वगैरे). [सं. ऋतु+उद्भव]

**ऋत्विज**—पु. यज्ञयाग, होमहवन इ० कर्मे करणारा, त्यांत भाग घेणारा; यजमानानें याची योजना करावयाची असते. यज्ञयागांत व होमहवनांत ऋत्विग्वरण नांवाचा एक विधि असतो. यांत यजमानानें आपल्या घरीं करावयाच्या यज्ञकर्मात विशिष्टकामीं त्या त्या ऋत्विजाची योजना करून त्याचें पूजन करावयाचें असतें. ऋत्विज अव्यंग, तरुण असावा वगैरे लक्षणें सूत्रग्रंथांतून (आश्वलायन गृह्यसूत्र १.२३.) दिलीं आहेत. [सं. ऋतु+इज्=पूजा करणें]

**ऋद्धि**—स्त्री. १ ऐश्वर्य; संपत्ति; भरभराट; समृद्धि; लक्ष्मी. 'का तपोबळें ऋद्धी । पातलिया भ्रंशे बुद्धी ॥' –ज्ञा १.१८८. २ ऐश्वर्याचा, भरभराटीचा काळ. [सं.] ०**सिद्धी**–स्त्री.अव. १ गणपतीच्या दोन दासी, परिचारिका; सामान्यतः ऋद्धि. 'ऋद्धिसिद्धिसहित महागणपतिभ्यो नमः।' (विरू.) रुद्धिसिद्धि पहा. २ ऋद्धि आणि सिद्धी (अष्टमहासिद्धी); संपत्ति आणि यश.

**ऋषभ**—१ बैल; पोळ; वसु. २ (संगीत) (शुद्ध) सात स्वरांपैकीं दुसरा स्वर; सा, रे, ग, पैकीं रे हा स्वर. स्वरसप्तक पहा. –वि. श्रेष्ठ. उ० पुरुषर्षभ. 'व्यथा न देती पुरुषा हे जया पुरुषर्षभा।' –गीता २.१५. [सं.]

**ऋषि**—पु. १ तपश्चर्यादि पुण्यकर्माचे ठिकाणीं ज्याची सतत पूर्ण निष्ठा असून ज्याचीं वचनें ईश्वरवचनाप्रमाणें लोक मानतात असा साधु; ऋषींमध्यें कश्यप, अत्रि इत्यादि सात ऋषी प्रसिद्ध आहेत. ऋषींमध्यें कांहीं वेदमंत्रद्रष्टे (मंत्ररचना करणारे) आहेत. ऋषींचे पुढील सात प्रकार आढळतात–देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि हे तीन मुख्य आहेत. महर्षि परमर्षि, श्रुतर्षि व कांडऋषि हे चार कोणी मानतात. (सामा.) तपस्वी; मुनि; योगी. २ सात्त्विक माणूस; देवमाणूस; शुद्ध आचरणाचा, धार्मिक माणूस. [सं.] **म्ह०** नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ पाहूं नये (केवढीहि मोठी नदी असली तरी तिचा उगम एखाद्या ओहोळापासून झालेला असतो, तसेंच पुष्कळ ऋषींचा जन्म जारज किंवा हीन कुळांत झाला असल्याच्या महाभारत वगैरे ग्रंथांतून कथा आहेत, म्हणून त्यांचें मूळ शोधूं नये, कारण तें अनादरास कारण होतें). एखाद्या गोष्टीचा अधिक छडा लावीत न बसतां चालू गोष्टीकडे लक्ष द्यावें या अर्थी उपयोग. ०**ऋण**–न. मनुष्यप्राण्याला असलेल्या ऋणत्रयांपैकीं एक ऋण; दुसरीं दोन–देवऋण व पितृऋण होत. ऋषितर्पण व वेदाध्ययन यांनीं ऋषिऋण फिटतें. ०**धान्य**–न. मुख्य अठरा धान्यें खेरीज करून सावे, वरी, देवभात वगैरे किरकोळ धान्यांपैकीं धान्य. ०**पंचमी**–स्त्री. भाद्रपद शुद्ध पंचमी; या दिवशीं अरुंधतीसह सप्तऋषींची पूजा करतात. हें व्रत सर्व स्त्रियांनीं, विटाळशी असतांना चुकून घरांत कांहीं वस्तूस स्पर्श झाल्यास तो दोष नाहींसा होण्यासाठीं करावयाचें असतें. या दिवशीं स्त्रियांनीं बैलाच्या कष्टानें तयार झालेला कोणताहि पदार्थ खावयाचा नसतो ०**मार्ग**–पु. शास्त्रविहित आचार, वर्तन; शुध्द, सात्त्विक वर्तन; निषिध्द, अन्याय्य कर्मे लाभ होत असतांहि सर्वथा न करणें. ०**मार्गी**–वि शुद्ध वर्तन ठेवणारा; ऋषिमार्गानें जाणारा. ०**यज्ञ**–पु. पंचमहायज्ञांपैकीं एक यज्ञ; ब्रह्मयज्ञ. इतर यज्ञांमध्यें प्रत्यक्ष अवदान किंवा बलिदान असतें परंतु या यज्ञांत ऋषिप्रीत्यर्थ वेदाध्ययन करणें हेंच हवन होय. ०**संख्या, संख्याक**–वि. सात ही संख्या, सात ऋषींवरून ही संज्ञा पडली आहे. 'खदिरवृक्षांचे शास्त्रसंख्याक । पळसांचे ऋषिसंख्याक । ऐसिया-परि सम्यक । यज्ञक्रिया अवलंबिली ॥' –जै ९२.४९.

**ऋषेश्वराचा कारभार**—पु दिरंगाईचा, सावकाशीचा, अव्यवस्थित चालणारा कारभार. [शुध्दरूप ऋषीश्वर]

**ऋष्टि**—स्त्री. लढाईचें एक शस्त्र; तलवार किंवा भाला. –हिंलइ २२. [सं.]

**ऋक्ष**—पु. अस्वल; रीस. –न. एक तारकापुंज. [सं.]

# ऋ, ऌ, ॡ.

हे तीन स्वर आरंभीं असलेले शब्द मराठी भाषेंत येत नाहींत, संस्कृतमध्यें येतात.

---

# ए

**ए**—मराठी वर्णमालेंतील अकरावें अक्षर. अक्षरविकास—याच्या पांच अवस्था आहेत १ गिरनार शिलालेख; २–३ सहाव्या शतकांतील ताडपत्री ग्रंथ व बुद्धगयेचा लेख; ४ धार शिलालेखांतील काव्य (११ वें शतक). शेवटची पांचवी अवस्था त्यानंतर लवकरच प्रचारांत आली. –ओझा १.

**ए**—उद्गा. परिचयांतील माणसास हाक मारण्यासाठीं योजावयाचें संबोधन; अरे ! अग ! 'ए रामा, इकडे ये.' [सं.]

**ए**—सना. हा, ही, हें, या. 'जो मजशीं जुंझे अे भूतळीं। रायां माजी ॥' –शिशु ८९०. 'तरि तैंही ए सुंदरी। मुखस्थंभु केला ॥' –शिशु ८०३. (कातवडी भाषा) 'ए बालानी सोय किशी कराबा.' –मसाप २.३१. [सं. एतत्; प्रा. एअ]

**ए**—क्रि.(द्वितीय–तृतीयपुरुषी एकवचनी) ये, येते, येतो. ये पहा. 'वैरी सरिसा जीअे । तरि निद्रा कैसेनि अे ॥' –शिशु ४७०. क्रियापदांतील व त्याच्या रूपांतील ये बद्दल ए येतो. उ० एओ, एऔनी अशा तऱ्हेचीं येवो, येवून वगैरेचीं रूपें होतात. 'अवदशा यां पांडवा। एओ नेदावी ॥' –शिशु ४९१. 'वेघें एऔनि वृंदावनां.' –दाव १६५. [सं. आ+इ; प्रा. ए; म. येणें]

**एं**–(**अें**)—तृतीयेचा एकवचनी प्रत्यय; नें; एं; शीं यांपैकीं दुसरा. 'परागें धुळवाडी खेळिजे। जाउडे याचेनि पाणिअें सिंपिजे ॥' –शिशु २७५. [प्रत्यय]

**ए॥**—(संक्षेप) एकूण.

**एअर**—स्त्री. (इं.) हवा; वायु; वारा. [इं.] ०**गन**–स्त्री. वातनलिका; हवेच्या दाबानें उडणारी बंदूक. ०**टाइट**–वि. वातप्रतिबंधक; बाहेरून हवेचा प्रवेश न होणारा. ०**पंप**-पु (पदार्थविज्ञान) वाताकर्षक यंत्र; वारा काढून घेण्याचा पंप. [इं.]

**एउतें**—क्रिवि. इकडे. 'आतांची भणतु होतें। सापें नारद न एति एउतें ॥' –शिशु ११६. [सं. अत्र, प्रा. एत्थ]

**एक**—वि. १ आद्यसंख्यावाचक; सर्व संख्यांमध्यें पहिली संख्या. २ एकटा; अद्वितीय; कोणी बरोबरीचा नसणारा. 'ब्रह्म जें आहे तें एक आहे.' ३ कोणी तरी; अमूक; एखादा. ४ विवक्षित एक; सर्वांत वरचढ. उ० एक शहाणा; एक लबाड; एक शिनळ. 'तो एक वीर आहे.' ५ सारखें; एकरूप; एकच. म्ह० 'तुम्हीं आम्ही एक कंठाळीस मेख. ६ अतिशय किंवा एकसारखा; अव्याहत. जसें–एक पाऊस=न थांबणारा, एकसारखा पडणारा पाऊस; एक घोळ; एक गोंधळ; एक गहबज; एक अनर्थ; एक रड वगैरे. ७ (संख्यावाचक अथवा प्रमाणवाचक शब्दाबरोबर योजतात) अजमासें; जवळजवळ; सुमारें; कमजास्त. जसें–येथून कोसएकभर समुद्र आहे; शंभरएक रुपये शिल्लक असतील; पांच एक; वीस एक इ०. ८ न फिरणारें; अन्यथा न होणारें; सतत एक. 'तुम्ही थोर तुमचें वचन एक असावें.' उ. एकवचनी; एकवाणी; एकपत्नी. ९ दुसरा; निराळा; वेगळा; भिन्न; एक नव्हे असा. 'हें औषध एक तें एक, एकसारखा गुण कसा येईल ?' 'केलें एक आणि झालें एक.' [सं. एक; प्रा. एक्क; फा. यक्; लॅ. एकुअस; फ्रेंजि. येक; हिं. एक, यकः सिं. एकु, दिकु, हकु; पं. इक्क; पपं. हेक्क, हिक्क] एक या शब्दाशीं दुसरे अनेक शब्द जोडून वाटेल तसे वाक्प्रचार करतात त्यांतील कांहीं पुढें दिले आहेत (आपल्या ठिकाणीं) ०**म्हणविणें**–स्वतः बद्दलचा अभिमान किंवा मोठेपणा राखणें, प्रस्थापित करणें; आपण कोणी मोठे आहोंत असें मानणें. ०**असणें–होणें–पडणें**–एकजूट करणें; एकत्र असणें;एकी असणें. ०**धरून बसणें**–विशिष्ट गोष्टी संबंधीं हेका धरून बसणें; हट्ट धरणें. **एक करतां बेक होणें**–इच्छित न घडतां भलतेंच होणें, एक करावयास जातां दुसरें कांहीं तरी होणें. **एकाचे दोन करणें**–एकाचे बेक करून सांगणें. **एकाचे एकवीस पांचाचे पंचवीस करणें**–फुगवून सांगणें; पदरचें घालून सांगणें; तंतोतंत खरें न सांगणें. **एक नाहीं दोन नाहीं**–मौन स्वीकारणें; कोणाच्या अध्यामध्यांत नसणें, तुल० हरा नाहीं शिवा नाहीं. (तटस्थवृत्ति स्वीकारलेल्या माणसाबद्दल योजितात.)

**एकउंटी**—वि. (बुद्धिबळ क्रीडा) आपला एक उंट शिल्लक ठेवून प्रतिपक्ष्यावर प्यादेमात करणें; जसें–एक उंटी हुचमळी (उंटमात).

**एकएक, एकक**—वि. प्रत्येकजण; एकएकटा; एकामागून एक; एकेकजण; निरनिराळा; स्वतंत्र; वेगळा. म्ह० एकएक बात सव्वा सव्वा (नऊ नऊ) हात=लांबलचक गप्पा; भरमसाट, अवाच्या सवा बोलणें.

**एकएकटा, एकएकला, एककटा, एककला**—वि. १ एकएक पहा. २ एकला; स्वतःच एकटा; बरोबर कोणी नसलेला; सोबत–मदत पाहिजे असलेला; दुसऱ्याची जरूर असलेला.

**एककट–टूट, एककूट–टूट**—क्रिवि. एकगट पहा.

**एककतार**—उद्गा. कवाइतीमधील एक हुकूम, बोल (इं. फॉल इन् यास प्रतिशब्द). हा हुकूम मिळाल्यावर सर्वांनीं एका सरळ रेषेंत एकमेकापासून ६ इंच अंतरावर आणि सर्वांत उंच मनुष्याच्या डाव्या हाताला, उंचीच्या प्रमाणांत एकाखालीं एक असें उभें राहावें. –संव्या ५.

**एककरपद्धति**—स्त्री. ( अर्थशास्त्र ) सर्व कर काढून टाकून फक्त जमिनीच्या उत्पन्नावरच कर बसविण्याचें तत्त्व, म्हणजे सर्व करांचें एकीकरण; ( इं. ) सिंगल टॅक्स. या तत्त्वाचा हेन्री जॉर्ज ( १८४९–९३ ) या अमेरिकन अर्थशास्त्रज्ञानें प्रथम पुरस्कार केला.

**एककली-ल्ली**—वि. १ हेकेखोर; संकुचित मनाचा; एकाच ठराविक मतांना, संवयींना, पद्धतींना किंवा गोष्टींना अगदीं हट्टानें चिकटून राहणारा; प्रसंगानुसार वागण्याचें ज्ञान नसलेला; कोत्या मनाचा. २ ( पाठ करणें, तर्क करणें, हिशेब करणें. कवन करणें इ० पैकीं ) एकाच विषयाकडे स्वाभाविक कल किंवा बुद्धि असलेला; एकांगी; एकदेशीय. [ एक+कल ]

**एककांद्यालसूण**—पु.स्त्री. एकच कुडी असलेला; एक प्रकारचा लसूण. ( हींत निरनिराळया कुड्या, बिया नसून, एकच गड्डा असतो ) [ एक+कांदा+लसूण ]

**एककानी**—वि. एक काना असलेली ( बंदूक ). [एक+काना]

**एककामी**—वि. एकच काम करण्यास लायक; हरकामीच्या उलट.

**एकंकार**—पु. १ जुळणी; जोडणी; मिसळणी. २ गर्दी; गुंतागुंत; गोंधळ; गोलंकार. एकाकार पहा. –वि. एकरूप; समान; एकसारखा; एकाकार. 'राव रंक समसमान उंचनीच एकंकारी.' –पला ६५. [ शुध्द रूप एकाकार ]

**एककालिक, एककालीन**—वि. समकालीन; एकाच वेळचें; एका वेळीं झालेलें, आलेलें; समवयस्क; समशिक्षित; ( इं ) कॉंटेम्पोररी. [ सं. ]

**एकखटा**—क्रिवि. (नागपुरीरूप एकखट्टा) एकत्र; एका ठिकाणीं करून; आखबंद; घाऊक; ठोक; वट. [ सं. एक+कृत–च ]

**एकखती-खंती**—वि. दुसऱ्या, विजातीय रंगाची एकेरी छडी, रेघ, सळई उठविलेला ( रेशमी खण, लुगडें ). [ म. एक+अर. खत्त=रेषा, रेघ. ]

**एकखांबी**—वि. १ एकाच खांबावर उभा असलेला ( तंबू, घर वगैरे ). २ ( ल. ) एकटाच कर्ता पुरुष असलेलें ( कुटुंब, घर ). [एक+खांब] म्ह० एका खांबावर द्वारका=ज्या कुटुंबांत फक्त एकच कर्ता माणूस राहिला आहे त्यास लावतात.

**एकखेप**—क्रिवि. एकपाळी; एकवार; पुन्हां एकदां. [एक+खेप]

**एकंग**—पु. काठीचा खेळ. 'एकंग लकडी, फरीगदका, लाठीचे हात व कवाईत ... (विद्यार्थ्यांकडून) करवून घ्यावी.' –संव्या ५२.

**एकगजब**—पु. एकगर्दी; गोंधळ; हलकल्लोळ. गजब पहा. [ एक+अर. घज़ब् ]

**एकगजर**—स्त्री. एकत्रित जोराचा आवाज, ओरड; आरडाओरड; कल्ला; गलका. [ एक+गजर ]

**एकगट-गट्ट**—क्रिवि. १ एकत्र; एका ठिकाणीं; सर्व मिळून. २ एक जुटीनें; सर्व एकत्रित होऊन; संघ करून. [ एक+गट ]

**एकगेळी**—वि. अखंडखुरी; खूर विभागले नाहींत असा (घोडा) 'त्याच्या (घोड्याच्या) पायाचा आकार मूळचाच चांगला असून एकगेळी पसरट खुराच्या योगानें पाय फार सुंदर दिसतात.' –मराठी तिसरें पुस्तक ( १८७३ ) १०६. [ एक+गेळ ]

**एकगोत्री**—वि. सगोत्री; एकच गोत्र असलेले; परस्पर. [ एक+गोत्र ]

**एकचपक**—वि. केवळ एक; अगदीं एक; निव्वळ एक; दुसरें जोडीला नाहीं असें. 'माझें एकचएक पागोटें तें तुला देऊन काय करूं?' [ एक द्वि. ]

**एकचढ**—वि. वरचढ; एकाहून एक श्रेष्ठ. ०एक–एकावर एक ताण. 'काय एकाचढीं एक कारटीं निपजलीं आहेत.' –भा ४४. [ एक+चढणें ]

**एकचर**—वि. एकलकोंडा; एकटा फिरणारा; तुटक राहणारा; याच्या उलट अनेकचर. [ सं. एक+चर ]

**एकचाकी गाडी**—स्त्री. एक चाक असलेली गाडी; ढकलगाडी; रस्त्यांतून माल विकणारांची गाडी.

**एकचार**—पु. १ ( गो. ) एकी. २ ( गु. ) संकर; मिश्रण. [ एक+आचार ]

**एकचाल-ली**—वि. १ एका चालीचा; संवयीचा; रागाचा ( गाण्यांत ). धाटणीचा. २ एकमार्गी; एखाद्या ठराविक मतांना, संवयींना, पद्धतींना चिकटून बसणारा; एककली. ३ सरळ; प्रामाणिक; छक्केपंजे माहीत नसणारा. [ एक+चाल ]

**एकचित्त**—वि. १ एक मताचें; एकमेकांशीं जुळणारें; सर्वसंमत. २ एकाग्र; सावधान; लक्षपूर्वक. –न. १ एकाग्र असणारें चित्त; ऐकमत्य; सर्वांची एकदम तयारी. २ ( ल. ) जेवणास बसलेली मंडळी उठतांना सर्व एकदम जेऊन उठतात त्यावेळीं सर्वांचें जेवण झालें काय या अर्थी एकचित्त झालें काय? असें विचारतात. 'सर्वांचें भोजन संपलें असें पाहून नैमित्तिक गोठगस्ते कामदार यांनीं एकचित्त जाहल्याबद्दल हात जोडून श्रीमंतांस कळविलें म्हणजे श्रीमंत खाशा स्वाऱ्या हात धुऊन ऐनेमहालाच्या बाहेर जातात –ऐरापु २.१७. [ सं. एक+चित्त ]

**एकछत्री**—वि. एकाच राजाच्या किंवा मालकाच्या ताब्यांतील, अधिकारांतील; एकतंत्री, एकसत्ताक (कारभार, राज्य इ०) ०राज्य–न. १ एका सार्वभौमाच्या सत्तेखालचा अंमल, प्रदेश; ज्या प्रदेशावर दुसऱ्या कोणाची सत्ता नाहीं असा प्रदेश. 'हें भरतखंड इंग्लिश लोकांच्या एकछत्री राज्याखालीं आहे.' –के. २ (ल.) एकजण करील ती पूर्वदिशा. [ सं. एक+छत्र ]

**एकजती एकमती**—स्त्री. एकमत; एकी; एकोपा ( अनेक व्यक्तींमध्यें ); पूर्ण मतैक्य; अविभक्तता. 'एकमती असल्यावांचून

आम्ही गहाण ठेवणार नाहीं. ' –क्रिवि. एकमतानें; एकजुटीनें. 'हा रोखा एकमतीं लिहून दिला सही.' जतीमती पहा. [एक+जथणें;+मत]

**एकजथा**—पु. एकत्व; संहति; एकोपा ( जातीचा किंवा कुळाचा ); एककुटुंब; एकजात. –क्रिवि. ( गु. एकजथे ) एक गठ्ठा; घाऊक; ठोक. [ एक+जथा ]

**एकजन्मी**—वि. १ सबंध आयुष्यभर पुरणारें; अतिशय टिकाऊ; पुष्कळ काळ चालणारें. २ आयुष्यांत एकदांच केलेलें; ज्याची जन्मांत पुनरावृत्ति होत नाहीं असें. ३ जें करण्याला, पार पाडण्याला सबंध आयुष्य लागतें असें. [ सं. एक+जन्म ]

**एकजरा**—क्रिवि. अणुमात्रहि; यत्किंचितसुद्धां. 'यास तफावत एकजरा न करणें. –रा ८.१५९. [ फा. यक्+झर्रा ]

**एकजात**—वि. १ एकाच जातीचा, नमुन्याचा; एकसारखा. ' एकजात पक्कीं पानें घेऊन ये, म्हणजे हिरवें एकहि नसावें. ' २ (ल ) सजातीयांत निर्भेळ; चांगलें; ' अरे वाण्या ! हें तूप वाईट दिसतें ? नाहीं महाराज एकजात तूप आहे. ' ३ सुंदर. ' मुलगी मात्र एकजात आहे.' ४ सजातीय; एकापासून उत्पन्न झालेले ( बंधु, बांधव ). –क्रिवि. निव्वळ; केवळ; सर्व एकच. [ सं. एक+जाति ]

**एकजातीय**—वि. एक प्रकारचें, तऱ्हेचें, जातीचें, वर्णाचें. एकजात अर्थ १ पहा.

**एकजिन्नस-सी**—वि. एकाच प्रकारचा, तऱ्हेचा; एकजात. ( माल, वस्तु वगैरे ). [ एक+जिन्नस ]

**एकजीव**—वि. पूर्ण मिसळलेलें; पूर्ण एक झालेलें. (क्रि० होणें). ' नारळाचा चव उकळत्या दुधांत घातला म्हणजे त्या दोहोंचा एक जीव होऊन जातो. ' [ एक+जीव ]

**एकजूट**—स्त्री. एकी; मिश्रण; एकोपा; एकजथा, –क्रिवि. एकमतानें; एकोप्यानें. [ एक+जूट ]

**एकझडपी**—वि. एकच फळी किंवा झडप आहे असें ( दार, खिडकी ). [ एक+झडप ]

**एकट–एकटका**—क्रिवि. एकटा; दुसरा कोणी बरोबर नसतांना; एकला. ' झालिया राज्यलोट । चोराकुळित होईल वाट । कोणी नवजावें एकट । अवघी एकवाट करावी । ' –एभा ३०.३५९. ' सदनीं एकट कनकलता । राघवराणी ते सीता ।' –निमा ( निर्वोष्ट-राघव ) १.४. ' हिंडे मार्गे भ्रमोनि एकटका । ' –मोआदि ३१.३६. [ एक+ट प्रत्यय ]

**एकटक–एकटंक**—क्रिवि. सतत; एकसारखें; खळ न पडतां ( पाहणें, रडणें, वर्षणें ). टक पहा. [ एक+टक ]

**एकटणें**—उक्रि. १ एकवटणें; एकत्र करणें; वेंचणें; गोळा करणें; (फुलें, धान्य इ. ). २ (व.) जीव एकटणें (एकादून येणें); कासावीस होणें; गुदमरून येणें. एकाटणें पहा. ३ गर्दी होणें; एकत्र होणें; सरमेसळ होणें; मिसळणें. [ एक+ट ]

**एकटदुकट**—क्रिवि. एकटाच (बहुतेक एकटा, क्वचित् दुकटा); एखाददुसरा. 'या वाटेनें एकटदुकट चोर फिरतात–फिरतो. ' [ एकटा+दुकटा ]

**एकटप्पी-प्या**—वि. एक टपाचा; आंतील किंवा खालचा टप ( कलंद्रा ) आणि वरील टप यांपैकीं कोणता तरी एक टप असलेला ( तंबू ). [ एक+टप ]

**एकटा**—वि. एकला; दुसरा कोणी बरोबर नाही असा; सोबत नाही असा. म्ह० एकटयाची एकवाट=एकटा असला म्हणजे चाहील तो किंवा एकचएक मार्ग राहतो; एकटा कांहींहि करण्यास स्वतंत्र असतो अशा अर्थानें. [ एक+ट प्रत्यय. ]

**एकटाकी**—वि. १ एका आकाराचा, घाटाचा, रंगाचा; (सामा.) एका स्वरूपाचा. २ एकाच मनुष्यानें एकाच टाकानें लिहिलें असतां सारख्या वळणाचें दिसणारें ( अक्षर ); किंवा अशा अक्षरांचा ( लेख, पुस्तक). ३ एकच टाका दिलेला (द्रोण इ.) [ एक+टंक ] ०मोर्तब –पु. हात न उचलतां लिहिलेला मोर्तब. ' हा शब्द एकटाकी मोर्तबानें लिही. '

**एकटांग्या**—वि. ( व. ) १ एक पाय असलेला; एका दिशेनें जाणारा. २ ( ल. ) एककल्ली ( मनुष्य. )[ एक+टांग=पाय ]

**एकटादुकटा**—क्रिवि. एकटयादुकटयाचा, एकटयादुकटयानें अशीं रूपें आढळतात. एकटदुकट पहा.

**एकटा टिकोजी, एकटा प्राणी, एकटा एकसुरा**—पु. १ फटिंग; एकलकोंडा; एककल्ली; माणूसघाण्या. २ ब्रह्मचारी; प्रपंच नसणारा मनुष्य.

**एकटिका**—क्रिवि. एकट, एकटका पहा. ' तो गातां तरि एकटिका । परि स्वरें पुरुतां नीका ॥ ' –शिशु १६८. [ एक+ट+क ]

**एकठय, एकठांय, एकठावण, एकठे**—क्रिवि.(हेट.कु.गो.) एकाच ठिकाणीं; एका स्थळीं; एकत्र (क्रि० करणें). [ एक+ठाय–व; गु. एकठूं; हिं. एकठा ]

**एकठोक**—क्रिवि. १ सर्व एकत्र; सरसकट; एकदम. २घाऊक; एकसट्टा; ठोकळ; किरकोळ नव्हे असें. [ एक+ठोक ]

**एकडकाठी**—स्त्री. (विणकाम) हातमागावरील ओव्या किंवा वह्या ज्याला टांगावयाच्या अशी धनुकली किंवा गज; ढेंकणी; कपाळकाठी. [ एक+ट+काठी ]

**एकडा**—पु. एक; एकाचा आंकडा. [ एक ]

**एकडाल तान**—स्त्री. ( संगीत ) स्वरक्रमांत बदल न करतां मंद्र अथवा मध्य सप्तकांतील स्वरापासून आरंभ करून निदान सात स्वरांची घेतलेली तान. [ एक+डाल+तान ]

**एकडोळसा**—न. ( कु. ) एक जातीचा मासा. [ एक+डोळा ]

**एकडोळा**—पु. १ एक डोळा. २ ( ल. ) एकुलता एक मुलगा. म्ह० ' एक डोळा तो कां डोळा म्हणावा ? '=एकच मुलगा असला तर त्याला संतति म्हणतां येईल काय ? –वि. एकच डोळा असलेला,

**एकडोळी करोटी-करवंटी**—स्त्री. एक डोळा ( भोंक ) असलेली, शेंडीकडील बाजूची, करवंटी, नरोटी.

**एकतंड**—क्रिवि. (व.) एकसारखा; सतत. एकतंत पहा. ' एकतंड पंधरा दिवस ताप आला. ' [ सं. एक+तन् ]

**एकतंत**—क्रिवि. अखंड; एकसारखा; सतत ( वेळ, जागा, क्रिया इ० ) [ एक+तन्–तंतु ]

**एकतंत्र**—क्रिवि. एकदम; एका वेळीं; एकाच साधनानें; एकसूत्री; एकसाधनी ( अनेक गोष्टी करणें ). –वि. एकसत्ताक; एकसूत्री; एकमुखी. एकतंत्री पहा. ' सर्व कारभार एकतंत्र करण्याची जी इंग्रजी कामगारांची हौस आहे... ' –टि १.१२२. [ सं. एक+तंत्र ]

**एकतंत्री**—वि. १ एकाच सत्तेनें, साधनानें अनेक कामें पार पाडणारें; एकाच तंत्रानें चालणारें; एका हातीं; एक मार्गी; एकतंत्र. २ ( ल. ) ( चांगल्या अर्थी ) सुरळीत; व्यवस्थित. ३ (ल.) ( वाईट अर्थी ) अनियंत्रित; स्वैर; जुलुमी. [ एक+तंत्र ]

**एकतत्त्ववाद्**—पु. अद्वैत; जगांत एकच सत्य स्वरूप आहे, मग तें भौतिक असो अगर आध्यात्मिक असो असा सिद्धांत; प्लोटिनस, स्पिनोझा, शॉपेनहार हे एकतत्त्ववादाचे पुरस्कर्ते आहेत, याच्या विरुद्ध द्वितत्त्व–बहुतत्त्ववाद. [ सं. एक+तत्त्व+वाद ]

**एकतत्त्वीं**—क्रिवि. एका बाबतींत; एका गोष्टींत; एका ठिकाणीं; एका मुद्यावर ( जीव धरणें, मन लावणें, अनुसंधान धरणें, चित्त देणें इ० ). [ एक+तत्त्व ]

**एकतया**—क्रिवि. एकाग्रपणें; एकचित्तानें. ' त्यांचीं नामें कोण कोण । तेंही ऐके एकतया । ' –मुआदि १४.३५. [ सं. ]

**एकतरफा**—वि. १ एक धन्याचा, राजाचा (प्रदेश). २ एका बाजूचा; पक्षपाती; एकदेशीय ( विधान ). –क्रिवि. १ एका बाजूस, एका भागीं. ' एकतरफा वस्ती आहे. ' ' एकतरफा फौज उभी आहे.' २ एक बाजूचा; प्रतिपक्षी हजर नसतांना ( न्याय ). [ सं. एक+ अर. तर्फ=तालुका, पेटा; फा. तरफ=बाजू, दिशा. ]

**एकतरफी, एकतर्फी**—वि. एका बाजूचा; पक्षपातीपणाचा; एकतरफा पहा. **०इन्साफ–निकाल**–पु. प्रतिपक्षी हजर नसतां किंवा त्याची बाजू पुढें न येतां एका बाजूनें दिलेला निकाल. सामाशब्द– एकतरफी कज्जा–चौकशी–जामीन–पंच–पंचाईत–पाटिलकी–पुरावा फैसला–बोलणें–मजकूर–मोकद्दमा–वाद–साक्ष–साक्षी–हिस्सा–इ० ' या दुसऱ्या मुद्याकडे प्रकृत निबंधांत फारसें लक्ष दिलें नाहीं त्यामुळें हल्लींचा लेख जरा एकतर्फी झाला आहे. ' –टि ४.११७. [ एक+ अर. तर्फ ]

**एकतऱ्हा**—स्त्री. एक ( विचित्र, चमत्कारिक, नवीन ) प्रकार, रीत, धाटणी, पद्धत. ' बोलण्याची एक तऱ्हा आहे. ' [ सं. एक+ अर. तर्ह; फा. तऱ्हा. ]

**एकतऱ्हेचा**—वि. वेगळया प्रकारचा; चमत्कारिक; विचित्र; विक्षिप्त. [ एक+तऱ्हा ]

**एकता**—स्त्री. एकोपा; एकी; ऐक्य; एकरूपता; सारूप्य. ' न भिन्न तनु त्या भले भजति एकता पाहुनी. ' –केका १०८. [ सं. ]

**एकताटी–ट्या**—वि. १ एकाच ताटांतील; एकाच ताटांत जेवणारे. २ ( ल. ) एकाच जातीचे; समानधर्मी; समान आचाराचे. **एकताटीं जेवणें**–क्रि. १ एकाच ताटांत जेवणें; एका ठिकाणीं जेवणें. २ (ल.) अगदीं सलोख्यानें असणें; भेदभाव न ठेवणें. **म्ह०** एक ताटीं जेवणें आणि घांस मोजणें=वरवर प्रेम दाखवून आंतून मत्सर करणें. [ एक+ताट ]

**एकतान**—वि. एकाग्र; लक्षपूर्वक; एकाच गोष्टीकडे मन लागून असलेलें. जसें–गायनैकतान; शृंगारैकतान; भजनैकतान; अध्ययनैकतान; विषयैकतान; परमार्थैकतान; सत्कर्मैकतान. [ एक+तान ]

**एकतानता, एकतानपणा**—स्त्रीपु. एकाग्रता; अनन्यवृत्ति. ' वेळ आपल्या गतीनें एकसारखा एकतानपणें जातच असतो. ' –वज्राघात २१३.

**एकतार, एकतारा–री**—वि. १ एका–एकेरी तारेचा; एकधाग्याचा; दोन धागे पिळून दुहेरी न केलेल्या धाग्याचा ( विणलेला पितांबर, वस्त्र वगैरे ). २ एका नमुन्याचें, फर्म्याचें, मजकुराचें; एकसारखें; एकाच प्रकारचें. ' मग केसा केला विचार । पत्रें लिहिलीं एकच तार । '–ऐपो १०६. ३ एकचएक; तेंचतेंच; कंठाळवाणें. [ एक+तार ]

**एकतारा–री**—पुस्त्री. विण्यासारखें एक तंतुवाद्य. याचा भोपळा गोल व चापट असतो, दांडी कळकाची असून इंच–सव्वा इंच व्यासाची व दोन तीन फूट लांबीची गोल असते. भोपळा एका बाजूनें कातडयानें मढविलेला असतो. घोडी भोंपळयाच्या मध्यभागीं लावतात. दांडीला एक खुंटी लावून तिला एक तार गुंडाळलेली असून ती षड्जांत लावलेली असते. ती घोडीवरून भोपळयाच्या बुडाशीं जो दांडीचा भाग असतो त्यास लावलेल्या बारीक खुंटीस खिळवितात. भजनी लोक, गोसावी, भिकारी, वगैरे गातांना या वाद्याचा उपयोग करतात. [ सं. एक+तार; गु. एकतारु ]

**एकताल**—पु. एका तालाचें नांव; यांत मात्रा बारा व विभाग सहा आहेत. ' मंगलाचरणाला एक जीवाचा एकताल आणि भरतवाक्याला रुद्रताल हा ठरलेला. ' –भा ३८. [ सं. एक+ताल ]

**एकताल–ली**—वि. १ (संगीत) एक तालाचा (ध्रुपद इ०). २ ज्यांतून एकच नाद निघतो असें वाद्य. (तास, झंगट इ० ).

**एकताळामण**—पु. ( व्यापार ) एक माप; या मणाचें वजन सुर्ती १५४० रुपये भार असतें. –मुंव्या ६. [ एक+ताला+मण ]

**एकताळीस**—( हिं. ) एकेचाळीस पहा.

**एकतीस**—वि. ३१ संख्या. [ सं. एकत्रिंशत्; प्रा. एकतीस, एक+तीस. तुल० सिं. एकतिह ]

**एकतुक**—वि. एकटा; एकला; एकाकी. 'अशीग मी संसारी एक तुका। खर्च नाहीं केला रुका।'–पला ४.२०. [एकटका अप. ]

**एकतुका**—वि. सारखें; समान; सदृश. 'ऐसें एकतुकें पांच-भौतिक। पडती बहुवस टांक।' –ज्ञा ७.२५. [ एक+तुकणें ]

**एकतोंडी**—वि. एका बाजूस तोंड असलेला, मोकळा असलेला· दुतोंडीच्या उलट. –क्रिवि. एका बाजूनें; विरुद्ध बाजूस कोणी नसतांना; एकांगी (वाद, तक्रार, पुरावा, कैफीयत). **एकतोंड करणें**–तोंड देणें; समोर होणें; रुजवात करणें.

**एकत्र**—क्रिवि. १ एका जागीं; एका ठिकाणीं, मिळून. २ अविभक्त (बंधु इ० नीं संसारांत); भागीदारीनें. ३ एकीकडे, एका-बाजूस. 'एकत्र केशव वसे अपरत्र वैरी। अन्यत्र पर्वत शतक्रतु भीत भारी।'–नीतिशतक १८. [सं.] ०**कुटुंब**–न. (कायदा) मूळ एखाद्या पुरुषापासून जो वंशविस्तार झालेला असतो त्या वंशांतील पुरुष, त्यांच्या बायका व अविवाहित मुली असें सर्व मिळून एक बनलेलें कुटुंब. ०**कुटुंबपद्धति**–स्त्री. वांटणी वगैरे न करतां सर्वांनीं एकत्र राहण्याची पद्धति.

**एकथाट**—पु. सारखी, एक प्रकारची व्यवस्था, चाल, रीत, मांडणी. [ एक+थाट ]

**एकथोक-प**—क्रिवि १ एकदम एका वेळीं सर्व (घेणें, थोडें थोडें अनेक वार न घेतां); एक रास. २ घाऊक; सरसकट; उक्ता; एकठोक. [ एक+ठोक; एक+थाप–थोप ]

**एकदट**—क्रिवि. एकदम; एकमेकांस लागून; एका ओळीनें, एकत्र. 'तंव डौंडीची वीरघंटा। सनसनितीं जेंगटा। वाजितांती एकदटा। एके वेळें।' –शिशु ५२२. [ एक+दाटणें ]

**एकदंत**—पु. गणपति; गजानन; विनायक. 'नमन श्री एक-दंता। एकपणें तूंचि आतां।' –एभा १.२. 'प्रथम नमन तुज एक-दंता। रंगीं रसाळ वोढवीं कथा।'–तुगा ४१९३. [सं. एक+दन्त]

**एकदम**—क्रिवि. १ ताबडतोब; तत्क्षणीं; अकस्मात; थेटः विलंब न लावतां; न थांबतां; विसांवा न घेतां. २ एका पर्यायांत; एका दमांत; एका सपाट्यांत, खेपेंत. 'मला त्याणीं एकदम लाख रुपये दिले.' ३ एका वेळीं; एकसमयावच्छेदेंकरून.' एकदम हजार गोळा उडतो असें एक यंत्र करावयाचें आहे.' [ एक+दम; फा. यक्+दम्=क्षणैक; तुल० सं. एकपदम् ]

**एकंदर**—स्त्रीन. १ एकत्र करणें; एकवट करणें; एके ठिकाणीं आणणें; बेरीज; मिळवणी. २ स्नेह; सोबत; संगत; मैत्री. –वि. क्रिवि. १ एकत्र; जुटींत; सहवासांत; मिश्रणांत. 'तरी वैराग्याचेनि आधारें। जिहीं विषय दवडूनि बाहिरें। शरीरीं एकंदरें। केलें मन।'–ज्ञा ५.१५१. 'तांदूळ आणि डाळ एकंदर केली म्हणजे खिचडी होते.' २ एक रकमी सर्व; एकत्र करून; एकदम. जसें– एकंदर जमा - आकार– ताळा – पत्रक – पट्टी; एकंदरीचा हिशोब– बेरीज–वही. ३ सर्वांनीं मिळून; एका संधानें; एका ताफ्यांत; एक-वट. 'सारीं औषधें एकंदर कुटून मग बांधा.' ४ ठोक; एकूण; एक गट्टी; एक गोळा. ५ पुन्हां पुन्हां करण्याचें कारण न ठेवितां; एक-वार, एकदांच (ताकीद, इशारा वगैरे). 'याप्रमाणें वर्तावें म्हणून त्यास एकंदर ताकीद केली आहे.' ६ (नकारात्मक) कधींहि नाहीं; बिलकूल; केव्हांहि अशक्य या अर्थानें. 'तूं माझ्या घरीं एकंदर येऊं नको.' =कधींहि, केव्हांहि येऊं नको. –पया ४८५. –ख ११७६. [ सं. एकत्र ] ०**गट**–क्रिवि. सर्व मिळून एकत्र; एकरकमी; एकजिनसी सर्व; एक जुटीनें, मेळ्यानें, समूहानें. ०**चा सरासरी**–स्त्री. बेरजांची सरासरी (एखाद्या मोठ्या हिशो-बाच्या). ०**भाव**–पु सरासरी दर; किंमत. ०**विक्री**–स्त्री. घाऊक, ठोक, एकदम, एकजिनसी विक्री.

**एकंदर**—न प्रत्यक्ष न होतां परंपरेनें झालेला, अप्रत्यक्ष संबंध, स्पर्श, विटाळ. 'या मुतक्याचें मला एकंदर झालें म्हणून मी स्नान करतों.' [ सं. एक+अंतर, हिं. अंदर ]

**एकंदरी**—स्त्री. १ एकूण; बेरीज; सर्व मिळवणी; हांशील. २ (गो.) सारांश, तात्पर्य.

**एकंदरींत**—क्रिवि. शेवटीं, अखेरीस; थोडक्यांत; सारांश.

**एकदल**—वि. (विरू.) एकदळ. एकपानाचें; एक पाकळीचें (झाड, फूल इ०). [ सं. एक+दल ]

**एकदशांश मीटर**—पु. मीटरचा दहावा हिस्सा (मीटर= $\frac{39.37}{10}$ इंच); (इं.) डेसीमीटर. [ सं. एकदशांश+इं. मीटर ]

**एकदा-दां**—क्रिवि. १ एकेकाळीं; एकेवेळीं. २ एकदम; एकसमयावच्छेदेंकरून; युगपत. ३ एकवार; एकवेळ; पुन्हां नाहीं अशा रीतीनें. [सं.] **एकदांचा**–कसेंतरी, कसेंबसें, सायासानें; एकवार; फक्त एकवेळ (पुन्हां कधींहि नाहीं); (क्रि० होणें; करणें, इ०). 'एक-दांचें लग्न झालें म्हणजे सुटलों.' 'तो एकदांचा तेथें पावला म्हणजे झालें.' 'हें काम एकदांचें संपलें म्हणजे जन्माचें सार्थक झालें.' 'एकदांची टाळी वाजली.' [ सं. एकधा ]

**एकदाणा**—पु. (तंजावर) एक खड्याची नाकांतील चमकी; मुगबट्टु [ एक+दाणा ]

**एकदाणी**—वि. सर्व दाणे एकसारखे असलेलें (धान्य). 'कुणब्या-जवळील दाणा एकदाणी असतो.' –गांगा १४६. –स्त्री. सोन्याचे साधारणतः चाळीस मणी सोन्याच्या कड्यांनीं माळरूपानें गुंफून त्या माळेच्या दोन्ही टोंकांस गोफाचे तुकडे लावलेले असतात व त्यांच्या शेवटीं सोन्याचे फांसे असतात अशी माळ; एकेरी मण्यांची माळ. एक पोतीचा व एक सोन्याचा मणि ओवलेली माळ. [ एक+दाणा ]

**एकदाणें**—न एकदाणी माळ; एक प्रकारची माळ; यांत कांचेच्या पोतीमध्यें मधोमध एक सोन्याचा मणी असतो. 'एकदाण्याची खरबुजी तन्हा सादर।' –अफला ५५. [एक+दाणा]

**एकदिग्गत**—वि. एकाच दिशेनें गेलेला. [सं. एक+दिक्+गत] **०समांतर रेषा**–स्त्री. एका बाजूकडे जाणाऱ्या समांतर रेषा.

**एकदिग्गामी**—वि. एकाच दिशेनें जाणारा. [सं.] **०प्रेरणा**–स्त्री. (यंत्र.) एकाच दिशेकडे कार्य करणारी प्रेरणा, शक्ति; सरूप प्रेरणा. (इं) लाइकै फोर्सेस; याच्या उलट भिन्नदिग्गामी किंवा विरूप प्रेरणा. –यंस्थि ३४. [सं. एक+दिक्+गम्]

**एकदिन-दिवस**—क्रिवि. एके दिवशीं; कधीं तरी. 'एकदिन जानारे भाई। सबसे राम भजन करलेना ॥' [एक+दिन, दिवस]

**एकदिल-दील**—वि. एक मतांचा, एक विचारांचा (स्नेही); एकचित्त; एकनिष्ठ. 'श्रीमंत व नवाब एकदील, तेव्हां हैदरखानाचा मज्कूर किती आहे.' –ख ६.२८९८. 'नऊ लाख सैन्य एकदिल घोडा शिरा। तीस हजार अबदागिरी बरोबर चाले ढिगारा ॥' –ऐपो १११. –पु. स्नेह; ऐकमत्य; संतोष. 'फौजेचा एकदील करून ... पत्राचें उत्तर जरबेचें आलें असतां इकडूनहि सरन्जाम जावयास दिवसगत लागणार नाहीं.' –ख ११.२१०२. [फा. यक्+दिल्]

**एकदिली**—स्त्री. स्नेह; ऐकमत्य; एकदिल पहा. 'सलूख एकदिली आहे.' –दिमरा १.१२३. [फा. यक्+दिली]

**एकदीं**—क्रिवि. (व.) परवां; नुकतेंच; एक दिवस. [एक+दिन, दिवस अप.]

**एकदीस**—क्रिवि. (कुण. गो.) एके दिवशीं. 'एकदीस मेल्यार कोणतरी रडतलो, सदा मेल्यार कोण रडतां.'=कोणतीहि गोष्ट नेहमींचीच झाली म्हणजे कोणी काळजी करीत नाहीं. [एक+दिवस अप.]

**एकदुःखसुख**—वि. सुखदुःखांत वांटेकरी असणारे; समसुख दुःखी; ज्यांचें सुखदुःख एक आहे असे [सं. एक+दुःख+सुख]

**एकदुःखी**—वि. समदुःखी. [एक+दुःख]

**एकदेश**—पु. एक अंश; एक पक्ष; एक भाग. 'गळां पडति ज्यांचिया तवगुणैकदेश भ्रमें। तिहीं तुजचि दावितां भजति बा! तुला संभ्रमें।' –केका ३२. [एक+देश]

**एकदेशतः**—क्रिवि. एकपक्षीं. 'वरील निरूपण केवळ ऐकदेशतः झालें.' –नि ५२. [सं.]

**एकदेशित्व**—न. मर्यादित्व; संकुचितता. 'तो मी हृदयामाजीं असे। हेंही एकदेशित्व मज नसे। जगदाकारें मीचि भासें। जेवी कल्लोळें विलासे सागरू ॥' –एभा २१.२८६.

**एकदेशी**—वि. १ एकाच देशाचे; समदेशी. २ पूर्णपणें लागू न पडणारें; एकांगी; मर्यादित; एकपक्षी (दृष्टांत, उपमा, तर्क इ०). 'अगा एकदेशी दृष्टांत। दृष्टीत कीर असे वर्तत ॥' –विपू ७.३८. ३ एकाच बाजूचें; एकपक्षीय (विचार, विधान इ०). ४ आपल्या विरुद्ध बाजूचें मत खोडून टाकण्याकरितां प्रथम गृहीत धरून नंतर आपलें मत सिद्ध करणारा; किंवा तें त्याचें अवलंबिलेलें (मत). ५ एककल्ली; संकुचित विचाराचा; कोणाशीं न पटणारा. (माणूस, विचार, मत). 'ऐसा अहंकाराधिरूढ। एकदेशी मूढ ॥' –ज्ञा ३.१७९. 'एकदेशी होतों अहंकारें आथिला। त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥' –तुगा ४०४६. ६ सार्वत्रिक, सार्वदेशीय नव्हे असा; एकाच जागेला चिकटून असलेला; अल्पव्यापी. 'सर्वव्यापक अयोध्यावासी। किंवा आहे एकदेशी। सांगे मजपासी निश्चयें ॥' [सं.]

**एकदेशीय**—वि. एकदेशी असणारा.

**एकदोरी**—स्त्री. १ एकसूत्र; एकओळ. २ (ल.) एकराज्य; एकअम्मल; एकसत्ता. 'राज्यांत एकदोरी हलती' –वि सरळ; सारखें. [एक+दोरी]

**एकधा**—क्रिवि. एके वेळीं; एक प्रकारानें, मार्गानें. 'एकधा दशधा विभागता। ऐक नृपनाथा सांगेन ॥' –एभा ३ १०६. [सं.]

**एकधातुचलनपद्धति**—स्त्री. (अर्थशास्त्र) नाणीं पाडण्याच्या कामीं जींत एकाच धातूचा उपयोग होत असतो ती पद्धति. केवळ सोनें किंवा रुपें यांचें चलन असून सोनें व रुपें यांचें एकसमयावच्छेदें चलन नसणें. [सं. एक+धातु+चलन+पद्धति]

**एकधान्य**—न. ज्यामध्यें एकाच जातीचें धान्य खाऊन रहावयाचें असें चातुर्मासांत आचरावयाचें व्रत; एकाच प्रकारच्या धान्यावर निर्वाह. [सं. एक+धान्य]

**एकधारी**—वि. एका बाजूला धार असलेलें; एका बाजूनें चालणारें (हत्यार, तलवार वगैरे). **०रोखण**–न. (कु.) सुताराचें एक हत्यार; रंधा. [एक+धार]

**एकधान्या**—पु. (खा.) एक प्रकारचा रंधा. यांत पातें डाव्याकडेस खेंटून असतें. त्यामुळें एका बाजूस खांच पाडतां येते.

**एकधोतरी**—वि. एकच वस्त्र असलेला; वस्त्राचें दारिद्य असलेला. **म्ह०** एक धोत्री आणि महा क्षेत्री=गरीब पण फार लबाड. (उप.) गरीबाचा शिरकाव अनेक ठिकाणीं असतो, त्याला पुष्कळ गोष्टी साध्य असतात. [एक+धोतर]

**एकधोरणी**—वि. एकच हेतु, उद्देश, धोरण असलेला. [एक+धोरण]

**एकनळा**—क्रिवि. १ लागोपाठ; खंड न पडतां; एकामागून एक (मुलगे किंवा मुली होणें). लग्नाआधींच मी गर्भिण। एकनळ मुलगे झाले तीन।' –पला ४.१९. 'एकनळया तीन मुली झाल्या.' २ एक नाळ असलेलें जुळें (मूल) [एक+नाळ]

**एकनाड-डी**—स्त्री. मुलगा किंवा मुलगी यांच्या जन्मनक्षत्रावरून आद्य, मध्य व अंत्य अशा तीन नाडी ठरलेल्या असतात. ज्या मुलामुलींची वरीलप्रमाणें एकच नाडी असेल त्यांचा विवाह

त नाहीं; त्यास एकनाड म्हणतात. 'जुळत नाहीं, एकनाड ाली.' [एक+नाडी]

**एकनाळ**—वि. १ एकनाळ असलेलें जुळें (मूल). २ (ल.) काच आवडीनिवडीचे, मताचे, कलाचे. [एक+नाळ]

**एकनिक**—वि. एकट; एकटा. [एक+नि+एक; एक द्वि.]

**एकनिकी**—स्त्री. जूट; एकी.

**एकनिरवडी**—वि. एकाच वेळीं, एकाच कामांत, एकाच टक्यांत निरवलेलें; संपविलेलें; उरकलेलें. [एक+निरवणें]

**एकनिश्चय**—पु. दृढनिश्चय; निर्धार; दृढश्रद्धा; विश्वास. -वि ढनिश्चयी; करारी. [एक+निश्चय]

**एकनिष्ठ**—वि. १ एका वस्तूवर मन बसलेला; एकावरच दृढ ष्ठा ठेवून चालणारा; अढळ श्रध्दावान्. 'श्रीकृष्णा बोलावें तुवां ें। एकनिष्ठ ॥'—ज्ञा ३.१८. २ (उप) अट्टल; पक्का; पुरा. जसें कनिष्ठ लबाड-सोदा-शिनळ-लुच्चा-खोटा-मात्रागमनी इ० सं.] ०**काशीकर**-पुरा लबाड; मात्रागमनी; बेविश्वासू.

**एकनिष्ठता, एकनिष्ठा**—स्त्री. १ एकनिष्ठ असण्याचा गुण, ी श्रध्दा; मनःपूर्वकता. २ एकरिथति; अचांचल्य. 'जयां विष ंच्या ठायीं। एकनिष्ठता कहीं नाहीं॥'—ज्ञा २.११३. [सं.]

**एकपंगत**—स्त्री. एके ठिकाणीं, एका पंक्तीला बसून जेवणें. त्र भोजन. [सं. एक+पंक्ति]

**एकपट**—वि. एकदां घेतलेलें; एक या प्रमाणांत. [एक+प्रति] इ० एकपट रूप दुप्पट पोशाख.

**एकपणा**—पु. एकी.

**एकपत्नी**—वि. १ एकच बायको असणारा; दुसरें लग्न न कर ाचा बाणा बाळगणारा; एक बायको असतांना दुसरी न करणारा। विवाहित स्त्री (धर्मपत्नी) वांचून इतर स्त्रियांशीं संबंध न ठेवणारा; भिचारी नसणारा. [एक+पत्नी] ०**व्रत**-न. १ सर्व आयुष्यांत काच स्त्रीशीं विवाह करावयाचा असें व्रत, एकभार्याव्रत, एकविवाह . २ फक्त लग्नाच्या स्त्रीशींच संबंध ठेवावयाचा असा बाणा. 'तूं त्री एकपत्नीव्रती। दुसरी वरिली कां अपकीर्ति॥' 'एकबाण वचन। एकपत्नीव्रत पूर्ण। चौदा वर्षे भरल्याविण। कदापि आग घडेना॥'—रावि १२.११२.

**एकपंथी**—वि. एकमार्गी; एककल्ली; धोपटमार्गी; एका पद्ध- चा; एकच क्रम आचरणारा. [एक+पंथ]

**एकपद**—न. (बीजगणित) ज्या पदांत एकच रकम असते ते ; याच्या उलट संयुक्तपद. जसें- ३ अ, ५ अब, ६ अबक एकपदें होत. परंतु (अ+ब) हें संयुक्तपद होय. [एक+पद]

**एकपदरी**—वि. १ एका बाजूचा पदर चांगल्या प्रकारचा ून दुसऱ्या बाजूचा पदर साधा असणारें (लुगडें, पागोटें इ०). एकेरी; एका घडीचें (वस्त्र). ३ एकच सर, पदर असलेला (गोफ, माळ इ०). ४ एकेरी; अरे तुरे असें (बोलणें). [एक+पदर]

**एकपदरीवर येणें**-(एखाद्याशीं बोलतांना) एकेरीवर येणें; अरेतुरे करणें.

**एकपदीमार्ग**—पु. एकाच माणसास जातां येण्यासारखी वाट; पाऊलवाट; एका ओळीनें जाण्यासारखा मार्ग; एक कतार; (सैन्याचा रस्ता). [सं. एक+पद+मार्ग]

**एकपक्षी**—वि. विशिष्ट; एकजातीय; एका बाजूनें. -क्रिवि एका अर्थी; एका बाजूनें; एका दृष्टीनें; कोणा एका पक्षास अवलं- बून (बोलणें, असणें इ०). [एक+पक्ष]

**एकपांकळी-पाकळी**—वि. ज्या फुलाच्या पांकळया अगदीं जुळलेल्या, एकमेकांना चिकटलेल्या अशा असतात असे (फूल). उ० गोकर्णी. -मराठी ६ वें पुस्तक. (१८७५) पृ २४०. [एक+ पांकळी]

**एकपांक**—वि. एका जातीचा; ज्याच्याशीं सहभोजन होतें असा. एका पंक्तींत बसून भोजन करण्यास योग्य. [सं. एक+पंक्ति]

**एकपाखी**—वि. एकच पाखें असणारें; ज्याच्या छपरास एकच बाजू आहे असें (घर). ०**घर**-न. एकाच बाजूला पाखें असणारें पडवीसारखें घर. (इं.) पेंट हाऊस. [एक+पाखें]

**एकपाठी**—वि. १ एक वेळ वाचून किंवा ऐकून पाठ म्हण णारा. २ (ल) दृढ बुध्दिवान; मोठ्या स्मरणशक्तीचा. [सं एक+पठ्-पाठ=पठण]

**एकपाठी-ठ्या**—वि. १ लागोपाठ, एकामागून एक, पाठो- पाठ जन्मास येणारीं (भावंडें, एखाद्या कुटुंबांतील मुलें). [एक+ पृष्ठ-पाठ=शरीराचा मागचा भाग]

**एकपाणी**—न. पाण्याचें एकच साधन (विहीर, तलाव इ०) असणें. म्ह० एकपाणी नरकवाणी (एकपाणी पण ते सुन्दर नरका- प्रमाणें) एकुलता पण उनाड अशा मुलाबद्दल वापरतात.

**एकपात्र**—न. जेवणाचें पान आणि द्रोण एकाच जातीच्या पानाचें असण्याचें व्रत; याच्या उलट भिन्नपात्र. [एक+पात्र]

**एकपादशिरासन**—न. (योग) उजवी मांडी मोडून बसावें, नंतर डाव्या पायाच्या खालून डावा हात घालून तो पाय हळू हळू मानेवर चढवावा. -संयोग ३३०. [सं. एक+पाद+शिर+आसन]

**एकपावटीं**—क्रिवि. एक वेळां; एकदां. [एक+पावट=पाय]

**एकपावलीवाट**—एकपदी मार्ग पहा.

**एकपिकी**—वि. वर्षातून एक वेळ पीक, वहर येणारी (जमीन, झाड); एकप्रसू. [एक+पीक]

**एकपुट**—क्रिवि. (ना.) सबंध; एकदम; एक वेळ; एकठोक. [एक+पुट]

**एकपुटी**—वि. एकच पुट देऊन तयार केलेलें (रसायन इ०). [एक+पुट]

सुशिक्षित झाल्यामुळें इंग्लंडास आपला गाशा गुंडाळावा लागला तर ज्यांचा देश त्यांस परत झाल्यास इंग्लंडची कीर्तीच होणारी आहे.' –टि १.४४०. [ सं. एतत्+देशीय ]

**एतपर्यंत, एतपावेतों**—एथपर्यंत; एथपावेतों पहा.

**एतां**—क्रिवि. येतां; येतांना. 'तुमतें एतां देखिलें।' –शिशु १२५. [ येतें याचें एणें असें जुनें रूप ]

**एतां**—क्रिवि. ( राजा. ) आतां.

**एतादृश**—वि यासारखा; असा. [ सं. ]

**एतावत्**—वि. इतका; एवढा. उ० एतावत्काल; एतावत्प्रमाण. [ सं. ]

**एतावता**—क्रिवि. १ म्हणून; एकंदरींत; यामुळें; इतक्यानें; येवढ्यानें. 'एतावता निष्पन्न काय होतें कीं, औरस पुत्र नसल्यास स्वर्गप्राप्तीसाठीं दत्तकपुत्र घेण्याची जरूर नाहीं.' –टि ४.१५. २ तथापि; असें आहे तरी; अद्याप. 'त्यानें आदरातिथ्य केलें, गोड बोलला, एतावता त्याचे मनांतील द्वेष गेला असें म्हणूं नका.' [ सं. एतावत् ]

**एतावधि**—क्रिवि. एथपर्यंत; एथपावेतों; होताहोईतों; एवढा; इतका. [ सं. एतदवधि अप. ]

**एतुला**—वि. इतला; एवढा; इतका; असा. 'लाडका करिसि यास एतुला।' –आक्र २८. [ सं. इयत्, एतावत्+ल; प्रा. एतुल ]

**एथचा-ला, एथील**—वि. या जागेचा, भागाचा, प्रांताचा, दिशेचा वगैरे; येथील. [ सं. अत्र; प्रा. एत्थ; गो. एथ ]

**एथपर्यंत-पावेतों-वर-वरी, एथोर**—क्रिवि. हा पावेतों; या( वेळ किंवा जागे )पर्यंत; हा काळ पावेतों; एवढा वेळ; एढोळ. [ एथ यास प्रत्यय लागून ]

**एथून, एथोन**—क्रिवि. या पुढें; या स्थळापासून किंवा काळापासून पुढें; अशिष्ट रूप एथने. [ एथ+हून; प्रा. एत्तहि ]

**एथें**—क्रिवि. १ या ठिकाणीं; या जागीं. येथें पहा. 'महाराजांनीं आतां एथेंच बसून राहावें.' –कमं ४.१११. २ (एखाद्याच्या) घरीं, राहण्याच्या जागेंत. जसें–त्याच्या एथें, माझ्या एथें. वाक्प्रचार–( गो. ) एथनानी तेथना=इकडेहि नाहीं व तिकडेहि नाहीं [ सं. अत्र; प्रा. एत्थ; बं. एथा ]

**एदगिरी**—वि. एदगीर गांवचें ( शेला, धोतरजोडा इ० वस्त्र ). [ एदगीर=नागपुर जवळचें एक गांव. –मोल. उदगीर ? ]

**एदेन, आदाम(बाग)**—पु. (ख्रि.) पवित्र शास्त्रांत वर्णिल्याप्रमाणें मानवांचे मूळ पूर्वज आदाम व हव्वा यांस ज्या बागांत ठेविलें होतें त्या बागेचें नांव; आनंदोद्यान; नंदनवन. '...परमेश्वर देवानें त्यांस एदेन बागांतून काढून लाविलें.' –उत्प २.२३. [ हिब्रू एदेम=आनंद किंवा सुख; इं. ईडन ]

**एदो**—वि. (गो.) एवढा. ०वेळ-एदोळ-एदोव–क्रिवि. (गो.) एवढावेळ; मघां. एदां सकाळीं=एवढ्या सकाळीं. [ सं. इयत्+वेला; म. एवढा+वेळ ]

**एधवळा, एधोळ, एधोळां**—क्रिवि. (कुण. वऱ्हाडी रूपें एधाळा, एधाळून) एव्हांना; इतका वेळ; एवढा वेळपर्यंत, एढवळ एढोळ; यावेळीं; एवढ्यावेळीं. 'एधाळून त(तर) आमचा सैंपाकय ( स्वयंपाकही ) होत असते (असतो).' 'एधाळा काय काम आहे गा तुह ( तुझें ) ?' [ एवढा+वेळ ]

**एधवां**—क्रिवि. ( काव्य ) आतां; यावेळीं. [ सं. अद्य; प्रा. एत्थ; म. तेधवा–तदा ]

**एधष्ट**—क्रिवि. पाहिजे तितकें; यथेष्ट; भरपूर; पुरेपूर. [ सं. यथेष्ट अप ]

**एनकेनप्रकारें, एनतेनप्रकारें**—क्रिवि. कोणच्यातरी प्रकारानें; कशामुळें तरी; कसेंतरी; कसेंहि. [ सं. येनकेनप्रकारेण ]

**एनॅमल**—न. कांचमिना; धातूवर कांचेचा मुलामा देण्याची क्रिया; कांचवण; कांचमिन्याप्रमाणें चकाकणारा पृष्ठभाग. [ इं. ]

**एनातीमामूल**—स्त्री. ठराविक देणगी. इनायत पहा. [ फा. अर. इनायत+मामूल ]

**एनिमा**—पु. बस्ती; बस्तीचें औषध किंवा पिचकारी; शौचविधींचें एक साधन. [ इं. ]

**एन्ना**—क्रिवि. (गो.) एव्हां; इतक्यांत. [ एव्हांना ? सं. एना=नंतर, त्यावेळीं. ]

**एन्काबूचान**—पु. रत्नाला कांतून बहिर्वक्र आकार देतात तो. ( बहिर्वक्र रत्नांचा आकार हा शब्द काबूचामला प्रतिशब्द म्हणून वापरला आहे. –खांबेटे) [ इं. एन्+फ्रें. काबूचान=न कांतलेला हिरा ]

**एन्सायक्लोपीडिया**—पु. ज्ञानकोश; विश्वकोश; विश्वज्ञानसंग्रह. यांत जगांतील ज्ञानाच्या सर्व शाखांची माहिती अकारविल्हानें दिलेली असते. [ इं. ]

**एन्हा घेणें**—अक्रि. ( व. ) हिसका घेणें; व्यर्थ त्रास घेणें. [ सं. एनस्=दुःख ]

**एपिफनी**—स्त्री. (ख्रि.) १ ( विदेशी लोकांसमोर ) ख्रिस्ताचें प्रकट होणें; आविर्भवन. २ ख्रिस्त दर्शनोत्सव; हा जानेवारीच्या ६ व्या तारखेला करतात. 'वरील सार प्रार्थना, पत्र व शुभवर्तमान हीं एपिफनीपर्यंत प्रतिदिवशीं वाचावीं.'–साप्रा ४२. [इं. ग्री. एपि=वर+फायनो=मी प्रगट करतों. ]

**एप्रिल**—पु. इंग्रजी वर्षाचा चवथा महिना ( हा मराठी चैत्र–वैशाखाच्या सुमारास येतो. ) [ इं. ]

**एबनी**—न. आबनूस पहा. [ इं. ]

**एम्**—पु. छापील मजकुराची ओळ मोजण्याचें प्रमाण ( इंग्रजी एम् अक्षरास जी समचौरस जागा लागते त्या जागेचें माप कल्पून,

एम्नें ओळ मोजण्यांत येते ). एका इंचांत पायका टाइपाचे सहा एम् बसतात. मजकूर ( टाइप ) जुळण्याचा भावहि एम्खरच ठरलेला असतो. एका रुपयास १४००-२४०० एम् ( लहानमोठ्या टाईपा-प्रमाणें ) पर्यंत दर असतो. [ इं. ]

**एर**—वि. १ येर; बाकीचे; दुसरे; इतर ( विशिष्ट सांगितल्यानंतर राहिलेले ); अन्य; भिन्न. ' एर परिवारू अपारू। तो कवनु जाणे।' -शिशु ५२. २ (ल.) गौण; किरकोळ; सटरफटर. [ सं. अपर, अवर; प्रा. येर ]

**एर-री-रू**—सना. तो; ती; हा; ही. ' मग एरी कानिआं पर तली ' -शिशु १७५. ' सीता म्हणे लक्ष्मणा धांव। एरू म्हणे राक्षसी माव। ' [ सं. अपर; प्रा. येर ]

**एरक**—स्त्री. (खान.) तंबाखूची जुडी. -भाइसं ७.१.४. [ सं. एरका=तृणविशेष, मोथा ]

**एरका, एरिका**—स्त्री. एक प्रकारचें गवत; लव्हाळा; मोथा. ' ब्रह्मशापाची एरिका। तीरीं निघाली होती देखा। ते मुष्टी घेऊनि क्रोधतवका। एकमेकां हाणिती। ' -एभा ३०.१४६. [ सं. एरक-का ]

**एरकान**—पु. घोड्याचा एक रोग; यास पिळा असेंहि म्हणतात; हा रोग खोकल्यापासून होत असून यानें शरीर पिवळें होतें. -अश्वप २.३३०.

**एरजार-झार-धार**—स्त्री. येरझार पहा.

**एरंड**—पु. एक औषधी झाड; याच्या मोगली व सुरती (तांबडा व पांढरा) अशा दोन जाती आहेत. सुरती एरंडाच्या बियांचें (एरंड्यांचें) तेल काढितात. तें उत्तम रेचक असून बहुतेक रोगांवर आरंभीं रेचक म्हणून देतात. सर्पदंशावर पानांचा चार चमचे रस, चमचाभर पाणी घालून द्यावा व दंशावर पाला वाटून लावावा. -वगु १.७६. मोगली एरंड शेताच्या कुंपणास लावतात त्याच्या बियांतहि तेल असतें पण त्याचा फारसा उपयोग करीत नाहींत. म्ह० १ ओसाड गांवीं एरंड बळी. २ थोर ( उंच ) वाढला एरंड तर काय होईल इक्षुदंड. ३ एरंडाचें गुऱ्हाळ=निरर्थक, कंटाळवाणें भाषण, निष्फळ उद्योग. ( ऊंस चरकांत घातला तर गोड रस तरी मिळतो पण एरंडापासून न पिण्याजोगा निरुपयोगी पदार्थ निघेल, ऊंस आणि एरंड दिसण्यांत सारखे म्हणून ही तुलना ). ४ निरस्त पादपे देशे एरंडोऽपि द्रुमायते=( झाड नसणाऱ्या प्रदेशांत एरंडच श्रेष्ठ ). गांवढ्या गावांत गाढवी सवाष्ण याप्रमाणें अर्थ. [ सं. एरंड; गु. एरडो; हिं. अरंड; बं. भेरांडा; का. एरडु आंडलके ] ०मूळ-न. सुरती एरंडाचें मूळ, मुळी; ही औषधी असते. ०काकडी-स्त्री. ( माळवी ) पोपई. नागपुराकडे एरणपपई असें पपईला नांव आहे.

**एरडबेरड**—वि. (ना.) बेडौल; प्रमाणशीर नसणारा. [ बेरड द्वि. ]

**एरडां**—नअ. (कु.) एका जातीचे मासे.

**एरंडी**—स्त्री. १ सुरती एरंडाचें झाड; एरंडाची एक वेगळी जात. २ एरंडाची बी. हें एक गळिताच्या मुख्य धान्यापैकीं आहे. याच्या तेलाचा उपयोग दिव्याकडे व औषधाकडे आहेच पण त्यापेक्षा यंत्रांना ओंगण म्हणून विशेष होतो. [ सं. एरंड ]

**एरंडें**—न. एक हलकें रेशीम ( सोंवळयाच्या वस्त्रासाठीं ); टसर रेशीम. [ सं. एरंड ] ( रेशमाचे किडे एरंडाचीं पानें खातात यावरून ).

**एरंडेल**—न. एरंड्यांपासून काढलेलें तेल. [ एरंड+तेल ]

**एरंड्यासाप**—पु सापाची एक जात. एरंडीच्या बीवर जसे ठिपके असतात तसे ठिपके या सापावर असतात म्हणून यास हें नांव आहे.

**एरमीठ**—न. नेहमीचें खाण्याचें मीठ; समुद्रमीठ ( शेंदेलोण वगैरे खनिज नव्हे ). [ एर=इतर, एरवीचें+मीठ ]

**एरवण**—स्त्री. ( प्रभु लोकांत ) वरातींत लागणारी रोवळी; झाल. [ ऐरणी ]

**एरवां-व्हां**—क्रिवि. तेरवां किंवा तेरवांच्या पुढचा दिवस; चालू दिवसापासून मागें किंवा पुढें चवथ्या दिवशीं ( कोणी पांचवा दिवस समजतात ); कोणी तेरवां म्हणजेच एरवां मानतात ( परवां याप्रमाणेंच हें रूप बनलेलें आहे ). [ सं. अपरश्वस्; गो. एरवां=तेरवां ]

**एरवीं, एरव्हीं, एरीं, एऱ्हवीं, एऱ्हीं**—क्रिवि. १ उगीच; सहज; कारणाशिवाय. २ सहजासहजीं; अचानक; श्रमाविना. ३ नाहीतर; किंवा. ' ऐसें वदतां कोपाल । एऱ्हवीं पुढें पळाल. ' -शिशु ४८४. ' माझा पैका दे एरवीं मी तुझे घराहून जाणार नाही. ' ४ इतर बाबतींत; हें सोडून. ' त्या पंडितास वक्तृत्व मात्र नाहीं एरवीं बरा आहे. ' [ सं. एर+वा, वी, प्रत्यय ] म्ह० एरव्ही करिल्ये=' विनाकारण, व्यर्थ, फुकट केलेली ( खटपट, काम. )

**एरशेर**—वि. असातसा, फालतू; निरुपयोगी, सामान्य (माणुस; गोष्ट ). [ एर द्वि. ]

**एरांस**—पु. (गो.) दाय; रिक्थ; वारसा; जमीनजुमला. ' जाव्याक एरांस दिला '=जावयाला जमीन-जुमला दिला. [ गो. वरीस=वारसा; इं. इन्हेरिटन्स ]

**एरिंग**—स्त्री. कानातील एक लोलकासारखा दागिना, डूल; कर्णभूषण; ( अव. एरिंग्या ). [ इं. इअर=कान+रिंग=अंगठी, वेढें ]

**एरीकडे**—क्रिवि. इकडे; तिकडे; दुसरीकडे. ' एरीकडे श्रीचक्रपाणी। कांई करितें जालें. ' -शिशु ८५२. [ एरी+कडे=दुसरीकडे ]

**एरीमोहरें**—क्रिवि. उलट बाजूस; दुसऱ्या तोंडाकडे. ' जंसी ते शुकाचेनि आंगभारें। नळिका भोविन्नली एरी मोहरें। ' -ज्ञा ६. ७६. [ एरी+मोहरा=मुख ]

**एरू**—एर पहा. ' एरू भणे कांई तूं जालासी। मातें देखत खेओ पळतीं कैसी। ' -शिशु ८८९. ' सीता म्हणे लक्ष्मणा धांव। एरू म्हणे राक्षसी माव। '

**एरुणेर**—एकुनएर पहा. [ एकुणेर अप. ]

**एल**—पु. एक जातीचा मासा; याला वाम किंवा वांव असें आपल्या इकडील नांव आहे. पण एल हा वामप्रमाणें गोड्या पाण्यांत अंडी घालीत नाही. हा सर्पाकृति असतो. [ इं ईल ]

**एलकाक्रीडित(भौमिचारी)**—न. ( नृत्य.) पायाच्या अग्रतलावर नीट उभें राहून व उंच उडी मारून पुन्हां जसेंच्या तसें उभें राहणें; अशी क्रिया वारंवार करणें. [ सं एलका=एडका, मेंढा ]

**एलकाविणें**—उक्रि. शेंदणें; वर घेणें; ओढणें ( विहिरींतून किंवा खड्यांतून पाणी वगैरे ). [ हेलकावणें ]

**एलकी**—स्त्री. ( प्रा. ) चमक; उसण. ( क्रि० भरणें ).

**एलगार**—पु. निकराचा हल्ला; निश्चयपूर्वक जोराचा प्रयत्न; चढाई; दौड. ' दर्यांतून आरमार व खुष्कीनें लश्कर घालून चौतर्फा एलगार करून अवकाश घेऊं न देतां त्याणें आक्रमिली स्थळें ... ' –मराआ ६. [फा. येल्गार, एल्गार, इल्गार=मोहीम; तुर्की ईल्वार]

**एलची, एलाची**—स्त्री. वेलची; वेलदोड्याचे दाणे, वेलदोडा. [ सं. एला, एलीका; गु. एलची· ते. एलकि; का. यालक्कि; बं इलायच; हिं. इलायची ]

**एलची, येलची**—वि. ( व. ना. ) व्रात्य; खोडकर; फाजील; पाणचट. [ सं. एला–( एलायति )=विलास, क्रीडा करणें; खोडयाळ असणें; गु. एलफेल=शिवराळ, असभ्य ]

**एलटी, एलाटी**—स्त्री. (विणकाम) चाळयाच्या (वहीच्या) खालवरच्या दोन पट्या. ( या चाळयांतून ताण्याचे दोरे जातात ). [ वेळटी, वेळू–काठी ]

**एलणें, एलावणें**—अक्रि. (व.) १ चेष्टा करणें; नखरे करणें. ' तो एलायला लागला. ' २ स्वैर वागणें. ' कामून एलते '=कां म्हणून स्वैर वागतोस ? [ सं. एलायति ]

**एलदोडा**—पु. एलची पहा. [ एल+दोडा ]

**एलपाड्या**—वि. ( ना. ) नाना तऱ्हा करणारा; नकल्या; चेष्टा करणारा. [ एलणें ]

**एला**—स्त्री. वेलदोडा; वेलदोड्याचा दाणा किंवा झाड; वेलदोड्यांत एला आणि एलची असे दोन किरकोळ भेद आहेत. एला म्हणजे मोठ्या बीचा वेलदोडा. [ सं. एला; गो. एळ ]

**एला**—पु. एक झाड; लॅ. टर्मिनालिया निटिडा.

**एलापॉ, एलाफा**—पु. (गो.) एक तांदुळाचें पक्वान्न; घारगा.

**एलें**—न. (नांगर, फुळव किंवा पाभर यांची) दांडी व जोखड यांना एकत्र बांधावयाची कातड्याची वादी. ही कोंडकांतून ओंवलेली असते. [ सं. वल्ली; प्रा. वेली, वेल. ]

**एल्ची**—पु. वकील; हेजीब. ' शाहमज्कुरास तोफा–तायफ देऊन एल्चीची रुखसत करणार आहे. '–दिमरा २.५. [तुर्की ईल्ची]

**एवं**—उअ. याप्रमाणें; याप्रकारें; असें. ' एवं थितिया मातें चुकले । ' –ज्ञा ९.३३०. [सं.] ०**गुणविशिष्ट**–वि. अशा गुणांचा; अशा गुणांनी भरलेला ( निंदाव्यंजक ) ०**विध**–वि. या प्रकारचा ' जी एवंविधा तूंतें । मी देखतसें हें निरुतें । '–ज्ञा ११.३१२. [सं.]

**एवंच**—क्रिवि. सारांश; एकूण; तात्पर्य; मथितार्थ असा कीं; मिळून; एकंदरींत. [ सं. एवम्+च ]

**एवढा**—वि. १ इतका मोठा; इतक्या आकाराचा, परिमाणाचा. २ इतका पहा. ( एवढा, जेवढा, तेवढा, केवढा, वगैरे शब्दांचा वर्ग आणि इतका, जितका, तितका, कितका वगैरे शब्दांचा वर्ग यांत फरक असा कीं पहिला आकार, गुण, परिमाण दाखवितो, तर दुसरा संख्यापरिमाण दर्शवितो. तथापि बोलण्यांत इतर शब्दांप्रमाणें या संबंधांतहि शैथिल्यानें हा भेद पाळला जात नाही. ) ( वाप्र. ) एवढ्याचें एवढें करून सांगणें=फुगवून, तिखटमीठ लावून सांगणें. एवढ्यान्दां=इतक्या मोठ्यानें, जोरानें किंवा मोठा आवाज करून; दणदिशी. [ सं. इयत्; प्रा. एवड; सिं. उहडो ] ०**वळवेळ**–क्रिवि. हा वेळ पावेतों, हा सारा वेळ; इतक्या उशीरां. [ एवढा+वेळ ]

**एवाडी**—वि. एका पायास अधिक (पांचवा) पाय फुटला आहे असा ( घोडा ) हें घोड्याचें अशुभ लक्षण आहे. [ एक–एव ]

**एवाळें**—न. ( गो. ) पाणसाप; वयाळें; हेंवाळें. [ सं. व्याल; प्रा. वयाळें ]

**एविं–वीं**—क्रिवि असें; याप्रमाणें. ' मार्कंडराय ऋषि एविं बोलती । '–वसा ११. [ सं एवम ] ०**तेवीं**–क्रिवि. कोणत्याहि प्रकारें; कसेंहि झालें तरी; कांहीं असलें तरी (होऊं नये झालें, आतां जसें होईल तसें होऊं दे असा भाव ). ' एवींतेवी वाघ खातो मग पळून फळ काय, त्याचे अंगावर जावें. ' म्ह० एवींतेवी भर गो देवी= कसेंहिकरून हे देवी पुरी कर ( आस, इच्छा, काम, इ. ); याचना; प्रार्थना. [ सं. एव तु एव ]

**एवीच, एव्याच**—क्रिवि. ( कों. ) मुकाट्यानें; स्तब्धतेनें; उग्याच; उगीच ( पाहणें, लक्ष देणें. ) ' आपुलाले तुम्ही पुसा । सेवा एव्याच सरिसा । स्थिरावल्या कैसा । काय जाणों विचार ॥ ' –तुगा ३३६१. [ सं. एवम् ]

**एव्हडा**—एवढा पहा.

**एव्हां**—क्रिवि. आतांच्या आतांच; आतां; यावेळीं; तूर्त; यासमयीं ( आतां पेक्षां हा शब्द जोरदार आहे ). ०**एव्हां**–क्रिवि. ( राजा. ) सुमार हा वेळ; या घटकेला ( मागें ). 'काल आपण तेथून एव्हांएव्हां निघालों नाहीं बरें ? '

**एव्हांना**—क्रिवि. हा वेळ पावेतों; आतांपावेतों.

**एव्हांशीं**—क्रिवि.एव्हां;आतां; या घटकेला; आतांच; इतक्यांत. ' खबरदार मला एव्हांशींच आपली म्हणाल तर ! '–बाय ४.३.

**एशेल**—न. ( व. ना. ) खाण्याचें तेल; गोडें तेल. ( अळशी+तेल )

**एषादिक**—सना. विशिष्ट लोक दर्शविण्यासाठीं व्याजोक्तीनें हे सर्व लोक, हे मोठे लोक, शिष्ट, अस्मादिक प्रमाणें रूप. ( सं. एषः+आदि+क ]

**एष्य**—वि. १ आगामी; भावी. २ ( ज्यो. ) अनुपभुक्त, जींतून अद्यापि ग्रह गेला नाहीं अशी ( रास ). याच्या उलट गत [ सं. इ=जाणें ]

**एस, एसकर**—वेस, वेसकर पहा.

**एसणा-ना**—वि. असा; असला; इतका; एवढा. ' तंव बलिभद्रु बोलिला । एसना तुं जूंझारू भला ॥ ' –शिशु ९१९. ' आपुलेआं पाडांचें पातिजे । तेनेंसीं एसनें कीजे । ' –शिशु ६७३. ' एसणी आंगीं असतां प्रौढी । ' –गीता १.१४७२. [ सं. अदस्-एष ]

**एसवा**—वेसवा पहा.

**एसूर**—स्त्री. ( माण. ) मिरच्यांची कांदा घालून केलेली पूड; काळें तिखट. [ का. एसर=शिजणाऱ्या भाजी–आमटींतील पाणी, मिरच्यांचें पाणी ]

**एहंकी, एहेंकी**—क्रिवि. (भिल्ली) असें; याप्रमाणें. ' लोक मान आलस्यो साम्यो एहंकी आखताहा ! ' =लोक मला आळशी शाम्या असें म्हणतात ) –भिल्लीभाषा ३०. [ सं. एवं+कीं; किंवा एतत्–एष प्रा. एह+कीं तुल०– का. एहंगे=कसें, कोणत्या प्रकारें; ]

**एहसान**—स्त्री. १ कृपा, उपकार, इहसान पहा. ' इतके दिवस परभारें दौलतीवर एहसान होत गेली ' –रा ५.३१. ' लुगडें आणलें तर आपल्या बायकोला आणलें, त्याचें माझ्यावर काय एहसान केलें ? ' २ ( व. ) साऱ्याची माफी. [ फा.; अर. इहसान ] ०मंद–वि. कृतज्ञ; आभारी. ' पातशाहा आपला एहसान्मंद होऊन पात शाहीचा बंदोबस्त आपले हातून करून घेई ऐशी कारस्ती जी होईल ती करावीच करावी ' –ऐच ११५. [ फा. ]

**एहीं**—सना.–तृअव. यांनीं; ह्यांनीं. ' एहीं रंजऔं सकळैकु लोक । ' –दाव १४. [ 'ए' ला विभक्तिप्रत्यय लागून ]

**एहेंडें**—क्रिवि. (भिल्ली.) याप्रमाणें, अशी. एहंकी पहा. ' याय इं बोरें एहेंडें काहा ? ' =बाई, हीं बोरें अशी कां ? –भिल्ली भाषा २७.

**एहेंतेहें**—क्रिवि. ( भिल्ली ) इकडेतिकडे; येथें तेथें. ' आन एहेंतेहें फिरतलो ' आणि इकडे तिकडे भटकलो=भिल्ली भाषा ३६.

**एळ**—वेळ पहा.

**एळ**—स्त्री. ( गो. ) समुद्रकांठ. [ सं. वेला=समुद्रकिनारा ]

**एळ**—( गो. ) वेलदोडा एला, एला पहा.

**एळकोट, एळकोटभेद**—पु. १ ( खंडोबाचे भक्त देवापुढची तळी उचलतांना किंवा भिक्षा मागतांना एळकोट किंवा एळकोट-मल्हार असें ओरडतात, त्यावरून ) एक जुटीनें प्रयत्न; निकराचा प्रयत्न. ' आर्थी होता वाघ्या । दैवयोगें झाला पाग्या । त्याचा एळकोट राहीना मूळस्वभाव जाईना. ' २ ( निंदाव्यंजक ) गोंधळ; गडबड; अव्यवस्था ' दहा घरचीं दहा माणसें आलीं तेव्हां त्यांनीं साऱ्याच कामाचा एळकोट करून टाकला. ' [ का. एळु (=सात )+कोट (=कोट संख्या किंवा तट. खंडोबाचें सैन्य सात कोटी असेल किंवा त्याच्या किल्ल्याचे सात तट असतील. ]

**एळकोटमल्हार**—पु नाश; उचलबांगडी. ' मी इकडे जयवंतरावाचा एळकोट मल्हार करतो. ' –चंद्रग्रहण नाटक ६१.

**एळणी**—स्त्री. ( व. ) मातीचें भांडें ( थाळी, वाटीसारखें ) ' एळणींत तूप घ्यावें. ' [ वेळणी ]

**एळव**—उद्गा. ( तंजावरी ) कंटाळा, नापसंति दर्शविणारा उद्गार. –पु. अमंगळ काम. [ तामीळ एळवु ]

**एळवणी**—स्त्री. ( माण. ) आमटी. अळवणी पहा.

**एळा**—एला पहा.

**एळिया, एळया ( बोळ )**—पु. एक औषध, बोळाचा एक प्रकार; काळाबोळ. [ सं. एलीयक; हिं. एलवा, एलुआ. ]

---

# ऐ

**ऐ**—मराठी वर्णमालेंतील बारावा स्वर. अक्षरविकास– 'ए'च्या डोक्यावर आडवी रेघ प्रथम इ. सनाच्या २ ऱ्या शतकांतील लेखांत दिसून येते. 'ए'ला दिलेली मात्रा प्रथम बरीच मोठी असे. पुढें दहाव्या शतकानंतर हल्लींचा ऐ तयार झाला. –ओझा.

**ऐ**—उद्गा. अगआई ! दुःख, शोक याचा उद्गार. अइ पहा. ' मज हररिपु ऐ जहर कदर करी लहर आलि बाई धराधरा । ' –राला ? –नामजोशीकोश.

**ऐकणा**—वि. ऐकणारा; ज्यास चांगलें ऐकूं येते असा; कानाचा धड. ' कान वचन मीचि श्रोता । मीचि जाण शब्दार्थता । ऐकणाहि मज परता । नाहीं तत्त्वतां श्रवणाचा ॥ ' –एभा १३.३४५. [ ऐकणें ]

**ऐकणें**—उक्रि. १ कानांनीं शब्द, ध्वनि जाणणें, समजणें; कान देणें; श्रवण करणें. आइकणें पहा. २ लक्षपूर्वक ऐकणें; काळजीनें श्रवण करणें; अवधान ठेवणें. ३ लक्ष देणें; मान्य करणें ( एखादी सांगितलेली गोष्ट ); ध्यान ठेवणें; नीट चित्त देणें; बरहुकूम वागणें; आज्ञा पाळणें. [ सं. आकर्णन; म. आइकणें, आयकणें ] म्ह० ऐकावें जनाचें करावें मनाचें=कोणतीहि गोष्ट करण्यापूर्वी सर्वांचा विचार अवश्य घ्यावा, मग आपणांस योग्य वाटेल तें करावें.

**ऐकतखेंवो**—क्रिवि. ऐकण्याबरोबर; ऐकतांक्षणीं. ' जयाची गोठीचि ऐकतखेंवो । आघवा संसारु होय वावो ॥ ' –ज्ञा १०.१९७. [ ऐकत+खेंवो; सं. क्षण. ]

**ऐकभट्टी**—स्त्री. (विनोदानें) ऐकण्याचें काम; कर्णद्वारें ग्रहण करणें (याच्या उलट अभ्यासानें ग्रहण करणें); ऐकण्याचा अभ्यास; ऐकीव अभ्यास. 'कोण्ही उपजत गवई असतो कोण्ही सहस्रायासें शिकून असतो, कोणी अयत्नतः ऐकभट्टीचा गवई असतो' [ऐकणें+भट्टी]

**ऐकमत्य**—न. सर्वांचें एक मत असणें; मतांचें,विचारांचें,आवडीनावडीचें एकस्वरूप; एकीकरण; एकवाक्यता; एकी; एकोपा. 'राष्ट्रीय सभेंत ऐकमत्य होण्यापूर्वी प्रत्येक प्रांतांत, प्रत्येक जिल्ह्यांत, प्रत्येक खेडयांत तें झालें पाहिजे.' -टिसू ४०. [सं.]

**ऐकवणी**—स्त्री. १ ऐकायला लावणें; कबूल करावयास लावणें. २ विवरण; विवेचन; फोड (क्रि० करणें) [ऐकविणें]

**ऐकविणें**—उक्रि. (ऐकणें प्रयोजक) ऐकावयास लावणें.

**ऐकाह्निक**—वि. १ एका दिवसाचें; उरकण्यास एक दिवस लागणारें (काम). २ एकच दिवस पाळावयाचा (उपास वगैरे). ३ एकच दिवस टिकणारें; क्षणिक; क्षणभंगुर. ४ दररोज येणारा; रोज थोडाबहुत असणारा, सान्निपातिक (ज्वर, वगैरे) [सं. एक+आह्निक (अहन्)]

**ऐकीव**—वि. १ ऐकलेलें; ऐकून माहीत झालेलें; दुसऱ्याकडून समजलेलें. २ (ल.) प्रत्यक्ष पुरावा, साधन नसणारें; कमी विश्वासार्ह. [ऐकणें]

**ऐक्य**—न. १ एकरूपता; एकपणा; एकी; अद्वैत. २ एकदिल; एकचित्त; एकभाव; मिलाफ; जूट (उद्देश, स्वभाव, इच्छा वगैरेचा.) ऐकमत्य. ३ (तत्त्व.) ऐक्यमत; ऐक्यज्ञान; जीवात्मा व परमात्मा यांचें अद्वैत असतें असें मत; सृष्टि व परमेश्वर यांची एकरूपता; ईश्वरमयत्ववाद. ४ (वेदांत) ब्रह्म; अद्वैत. 'ऐक्य जीव तो ब्रह्मांश। जेथें पिंडब्रह्मांड निरास।' -दा ११.१.३५. ५ (गणित) बेरीज; जमा; रास. [सं.] **ऐक्यास येणें**-एकत्र होणें; संमीलन होणें; परस्पर जुळणें. 'कीं वेदांतशास्त्रींच्या श्रुती। ऐक्यास येती परस्परें॥' ०**भाव**-पु. एकरूपता; अद्वैतता; ब्रह्मस्वरूपता. 'अथवा ऐक्यभावाचेनि पैसें। दुजे मानूनि आत्मा ऐसें॥' -ज्ञा १६.७१.

**ऐक्यता**—स्त्री. ऐक्य अर्थ १,२. पहा. 'ऐक्यता नाहीं म्हणजे इंग्रजी राज्यास त्यापासून कांहीं भय नाही.' -टि २.१५.

**ऐक्याकार**—वि. एकाकार; एकंकार पहा. 'दुजे शिळेवरी रेखीं मकार दोहीस करी ऐक्याकार।' -रावि २३.१५६.?

**ऐगूबैगू**—पु. अव. अलबतेगलबते; ऐबतेगैबते; कोणी तरी माणसें.

**ऐचण, ऐंचण, ऐतण**—स्त्री. (व. ऐचण) १ पडझड; अडचण; २ खेंचाखेंच; गर्दी. ३ अडचणीची, गर्दीची अवस्था, जागा. ४ गवत, रान, झाडझुडुप माजलेली जागा. 'त्या पडक्या जागेवर ऐचण फार आहे' [अडचण-अइचण; आड+तृण-अइतण-ऐतण]

**ऐचेआ**—वि. (गो.) आजचा; विद्यमान; चालू. 'जें येती वरुसेंवेरी। यवेया आठविलें संसारी। ते ऐचेआ दिवसा भितुरी। दाविले तुवां' -ख्रिपु २.२.१५९. [आजच्या अप.]

**ऐच्छिक**—वि. १ इच्छिलेलें; इष्ट. 'ऐच्छिक पदार्थ मिळाला म्हणजे फार संतोष होतो.' २ मर्जीवर ठेवलेलें; पाहिजे तें; मर्जीनुसार. 'साधूची ऐच्छिक प्रवृत्ति ऐच्छिक निवृत्ति.' ३ स्वच्छंदी; अविचारी; बेलगाम; उच्छृंखल. 'ऐच्छिक व्यवहार करूं नये शास्त्रानुरूप वर्तावें.' ४ नियमबद्ध नसलेलें; मर्जीनुरूप; वाटेल तसें; काहीं तरी; लहरी; अशास्त्रीय. 'हा ऐच्छिक प्रयोग आहे यास शास्त्रप्रमाण कोठें.' ५ हेतुपुरःसर, बुद्धिपुरःसर केलेलें; पूर्वयोजनेनुसार, योजून केलेलें; जाणूनबुजून केलेलें. 'ऐच्छिक पापाचें प्रायश्चित मोठें.' [सं.] ०**विषय**-पु. परीक्षेकरितां नेमिलेल्या दोन किंवा अधिक विषयांपैकीं इच्छेनें घेतलेला विषय. 'एम. ए. च्या परीक्षेस देशी भाषा या विषयाची निदान ऐच्छिक म्हणून तरी गणना करण्यांत आली' -केले १.९२

**ऐट-टा-टी, ऐटबाज, ऐटबाजी**-अयट-टा-टी, अयटबाज-बाजी पहा. [हिं. ऐठ=अक्कड]

**ऐणी**—आयणी पहा. 'कामधेनु आणि चिंतामणी। हींही पुरवू न सकती ऐणी।' -विपू १.७८.

**ऐणुटें**—वि. (गो.) किंचित् अळणी [अळणट अप.]

**ऐतखाऊ, ऐतगब्बू-मारा, ऐता, ऐतोजी, ऐतोळा**—आयतोजी, आयतगब्बू, आयतमार, आयतोबा, आयतोळा पहा.

**ऐतरेय**—पु. एक वैदिक ऋषि; इतरा नांवाच्या स्त्रीचा मुलगा. ०**आरण्यक**-न. ऋग्वेदाच्या शाकल शाखेचें आरण्यक. याचे पांच भाग असून यांत कांहीं अध्यात्म व बराचसा हौत्रविषय आहे. ०**उपनिषद्**-न. ऐतरेय आरण्यकाच्या दुसऱ्या भागांतील काहीं भाग. यांत अध्यात्मविषयाचें विवेचन आहे. ०**ब्राह्मण**-न. ऋग्वेदाचा ब्राह्मण ग्रंथ. याचे ४० अध्याय असून पांच पांच अध्यायांची एक अशा आठ पंचिका आहेत. यज्ञांत होता नामक ऋत्विजानें करावयाच्या हौत्रकर्माविषयींचें विवेचन यांत आलें आहे. या ग्रंथाचें कर्तृत्व ऐतरेय ऋषीकडे आहे.

**ऐतवार**—पु. आदितवार; रविवार; सूर्याचा वार. [सं. आदित्य+वार]

**ऐता-ती-तें, ऐतोजी**—आयता पहा.

**ऐता**—सना. (कुण.) तो-ती-तें; हा-ही-हें; हा येथें! हा एक! इथें (तो-ती-तें) आहे! [आहे+तो; हा+तो; सं. आ+इतः?]

**ऐतिह्य**—न. लोकपरंपरेचा प्रवाह; परंपरा; परंपरागत गोष्ट; लोककथा; दंतकथा. 'या वडाच्या झाडावर ब्रह्मराक्षस आहे असें ऐतिह्य ऐकतों.' [सं.]

**ऐती, ऐतिका**—( गो. ) तयारी. आयती पहा. 'तेथें होमांची ऐती करिती।'–वसा २१. 'प्रधानेसी म्हणे इओसे। यांथे मंधिरी नेइजे। भोजनाची ऐतिका करविजे। तेयां कारणें'–खिपु १.१४. ११.

**ऐतुलें**—वि. इतुकें; एवढें. इतका, इतुला पहा. 'ऐतुलें आइकौनि नीगालें, –उषा ५७.४८. [ सं. एतावत् ]

**ऐदान, आयदान**—न. ( कर्ना. ) भांडें; आयदाण पहा.

**ऐदी**—वि. आळशी; जड; मंद; सुस्त; अजागळ; अव्यवस्थित; जडभरत; खुशालचेंडू. 'ऐदी होण्याची चटक मलाही थोडीशी लावशील तर बरें होईल.'–बाय २.१. [सं. अ+यत् =प्रयत्न करणें ]

**ऐंद्र**—पु. १ ( ज्यो. ) सत्तावीस योगांपैकीं सव्वीसावा योग. २ ( रासायनिक ) एक मूलद्रव्य ( इं. ) इरिडियम. –वि. इंद्रासंबंधीं ( आयुध, अस्त्र इ० ). [सं. ] ०**जाल**–न. इंद्रजाल; जादुगिरी. ०**जालिक**–पु. जादूचे खेळ करणारा; गारुडी.–वि. जादूसंबंधीं; इंद्रजालासंबंधीं. [ सं. ]

**ऐंद्रस्थान**—न. ( नृत्य ) दोन्ही पाय वांकडे करून आडवे ठेवणें, व यांत अंतर चार ताल ठेवणें, कंबर गुडघ्यांच्या रेषेंत येईल इतकी वाकविणें, हत्तीसारख्या प्राण्यावर चढणें वगैरे गोष्टींची सूचना या स्थानांत उभें राहण्यानें होते.

**ऐंद्राग्न**—वि. (इंद्र व अग्नि, इंद्राग्नी ) देवतांसंबंधीं ( हवि, पुरोडाश, ऋचा इ. ) [ सं. ]

**ऐंद्रीयक**—वि. इंद्रियग्राह्य; इंद्रियांनीं जाणण्याजोगा; इंद्रिय संवेद्य; इंद्रियांसंबंधीं. [ सं. ]

**ऐन**—१ एक वृक्ष, झाड. अइन पहा. २ चांगली वर्तणुक. अइन पहा.

**ऐन**—अ. ( दुसरें रूप ऐन ) १ जोर दाखविण्यासाठीं या उपपदाचा उपयोग करितात. अचुकपणा; पूर्णता; अतिशयितता वगैरे अर्थ हा शब्द लागल्यापासून होतात. जसें. ०**उन्हाळा-पावसाळा-हिंवाळा**–पु. उन्हाळ्या पावसाळयाचा अगदीं भर. ०**दोन प्रहर**–पु. अगदीं दुपार. ०**वेळ**–स्त्री. अगदीं बरोबर; योग्य वेळ. ०**सोदा**–अट्टल लुच्चा, लबाड, हरामी; ऐन अट्टल. ०**भर**–पु. मध्य; मध्यावस्था; अगदीं भरभराटीची अवस्था (ऐश्वर्य, आरोग्य, तारुण्य, कीर्ति इ० जसें –ऐन दौलत, ऐन जवानी, ऐन ऐश्वर्य, ऐन अमदानी, ऐग हंगाम). ०**घाई**–स्त्री. घाईचा, गडबडीचा कळस, परमावस्था. ०**मारामारी**–लढयाचा अतिशय जोर किंवा लढाईचा अतिशय भर.

**ऐन**—अ. प्रधान, मुख्य, मूळ, आरंभीचें-मूलभूत वगैरे अर्थ ऐन हें उपपद शब्दास लावल्यास होतात. जसें– ०**कर्ज**–न. 'ऐन कर्ज हजार रुपये व्याज शंभर रुपये मिळून अकराशें रुपये.' 'या शेतांत ऐन पीक दोन खंडी पिकतें, त्यांत खर्च जाऊन एक खंडी पदरीं पडतें.' ०**कारभारी**–पु. वरिष्ठ ( व्यवस्थापक, मंत्री, कोठारी, घटक इ० ). ०**किंमत**–स्त्री. मूळ किंमत. ०**खर्च**–पु. मुख्य खर्च, अवांतर सोडून ( जसें–घोडयाचा सामान वगैरे शिवाय खर्च; मेजवानीचा ऐन खर्च म्हणजे फक्त खाण्यापिण्याचा खर्च–रोषनाई वगैरे शिवाय ). ०**गल्ला**–पु. १ पाहणी करून ठरविलेला धान्याचा गल्ला; अंदाजी पीक. २ पाहणी करून ठरविलेला सारा. ०**जमा**–स्त्री. १ ठरलेला किंवा नेहमींचा वसूल, सारा; अवांतर सोडून मुख्य वसूल; याच्या उलट खेरीज जमा; शिवाय जमा; कमाविस जमा. २ मूळचा, नेहमींचा वसूल ( एखाद्या वर्षी कमजास्त झालेला नव्हे असा ). ०**दस्त**–मुख्य, नेहमींचा सारा ( शेतावरचा वगैरे ) याच्या उलट सवाई; वर्ताळा; बावती वगैरे. ०**नक्‍द** ( **नकद, नगद, नक्त** )–स्त्री. पैशाच्या रूपानें येणारा सारा किंवा ऐनजिन्नसी साऱ्याची पैशांत किंमत. ०**काळी**–स्त्री. जमिनीवरील सारा, कर. [ ऐन+काळी=शेत जमीन ] ०**जिन्नस**–पु. १ जमिनीचें धान्यादि उत्पन्न; याच्या उलट नक्त सारा, उत्पन्न विकून पैसा केलेला नव्हे तर जसाच्या तसाच सरकारांत भरावयाचा शेतांतील माल. सामासांत–ऐन जिन्नस धारा; ऐन जिन्नस वसूल. २ ( ल. ) खुद्द; जातीनें. 'तरी ऐन जिन्नस पदाजी यादवाचे दोघे बेटे एकोजी व कुसाजी गनिमाकडे आहेती'–रा १५.१. ०**जिन्नसी**–वि. १ प्रत्यक्ष मालाच्या रूपांत ऐन जिनसासंबंधीं ( धारा, वसुल, जकात वगैरे ). 'स्वराज्यांतील नेमणुकीचा बहुतेक भाग ऐनजिन्नसी मिळत असल्यामुळें ......' –गांगा १४३. २ त्याच जातीचें, प्रकारचें ( धान्य, कापड, दागिना वगैरे शब्दाबरोबर योजतात ). ३ खुद्द; ऐनजिन्नस अर्थ २ पहा. –क्रिवि. मुद्देमालासह; प्रत्यक्ष कृति करीत असतां. 'ऐनजिन्नसी चोर पकडला' ०**फाजील**–जमाबंदी हिशोबांतील एक सदर. यांत शेतकी किंवा बागाईत खेरीज येणारें जादा उत्पन्न येतें. जसें–आंबराई, टरबुज वाडी, पाणभरा जमीन, कुरण वगैरेंचें उत्पन्न. ०**मोकासा**–चौथाईतील सरदारांची नेमणूकबाब. चौथ पहा. ०**वसुली**–स्त्री. रोख वसुली; निव्वळ–ठाम–रोख उत्पन्न.

**ऐन**–न. (जुनें रूप ऐन) १ (कर्ना.कों.) मुद्दल; मूळरकम; भांडवल. म्ह० व्याजास सोकला, ऐनास मुकला. २ मूळचा ठरलेला शेतसारा 'साठ लाखांची वेरीज ऐन व इजाफा मिळोन सिद्ध केली.'–रा ७.५३. [ ऐन ]

**ऐनक**—पु. चष्मा; डोळ्यास लावावयाची आरशी [अर.ऐनक]

**ऐनपैन, ऐणपैण**—स्त्री. निर्वाळा देणें; खात्रीपूर्वक सांगणें. ( क्रि० करणें; घालणें; पडणें ) [ ऐन+पैन ]

**ऐनवाफ**—स्त्री. पेरणीचा हंगाम; ऐनवेळ; पेरणीचा नक्की हंगाम-भर.

**ऐनवेळ**—स्त्री. अगदीं आणीबाणीचा प्रसंग; मोक्याची वेळ. **ऐनवेळीं**–क्रिवि. अगदीं वेळेवर; अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं.

**ऐनसादडा**—पु. एक झाड. अइन पहा.

**ऐना**--पु. १ आयना; आरसा. 'ऐना निंदितसे निर्नासिक.' -दावि २६३. २ (ल.) शोभादायक वस्तु; अलंकरण; भूषण. 'कम्बरवस्ता करून निघे निज मंदिरचा ऐना.' -प्रला १२३. ३ विशेषतः अव.-ऐने; चष्मा; उपनेत्र; डोळ्याची आरशी. [फा.]

**ऐनाती**--स्त्री. मूळ ठरविलेल्या शेतसाऱ्याचा प्रकार; ऐन-यैन आकार. [फा.]

**ऐने(ना)महाल**--पु. आरसेमहाल; आंतून सर्व बाजूंनीं आरशांनीं मढविलेला दिवाणखाना. 'ऐनामाहल जो रत्नखचित.' -दावि ३५८. 'त्याचप्रमाणें ती सुभानजीबरोबर नागोजीच्या गर्दीत त्याच्या खास ऐनेमहालांत आली.' -स्वप ३९३. [फा.]

**ऐनेर-रें**--न. एक लहान मुलांचा रोग; यानें गर्भिणी आईचें स्तनपान करणाऱ्या मुलाला श्वास, अग्निमांद्य, ओकारी, ग्लानी, खोकला, अरुचि, घेरी येणें हीं लक्षणें होतात, पोट मोठें होतें. याला वैद्यकात पारिगर्भिक असें म्हणतात, यावर अग्निदीपकक्रिया करावी. आयनेरें पहा. [आई+न्यारें]

**ऐनेरणें, ऐनरणें**--आयनेरणें पहा.

**ऐनेराजमेहेल**--पु. (बडोदें) राजवाडादर्पण; या नांवाच्या पुस्तकांत बडोदें राजघराण्यांत होणाऱ्या सर्व प्रकारच्या नैमित्तिक कृत्यांची सविस्तर माहिती दिलेली आहे. [ऐने+राजमहाल]

**ऐपत**--स्त्री. संपन्नता; आर्थिक सामर्थ्य, शक्ति, योग्यता, साधन; मालमत्ता; पैसाअडका. [अर. आफियत्] ०**दार, ऐपती**-वि. ऐपत असणारा; सांपत्तिकदृष्ट्या समर्थ; पैसेवाला.

**ऐपत**--स्त्री. (गो.) टांक.

**ऐब**--पु. व्यंग; दोष; चूक; खोड; अपूर्णता. अयब पहा. 'नाक लागलें तर फारसा ऐब दिसणार नाहीं.' -ख ८.१५०५. 'त्याच्या चेहऱ्यांत कांहीं ऐब नव्हता.' -कोरकि ३१. [अर. अयब, आइब] ०**लागणें**-क्रि. कमीपणा येणें. ०**दार**-वि. चुकीचा; दोषी; उणीव असणारा; दोषसंबंधीं.

**ऐबतेगैबते, ऐबूगैबू, ऐबोगैबो**--वि. साळकोजी माळकोजी; सटरफटर; कोणीतरी; ज्यांचा कांहीं संबंध नाहीं असे. ऐगूबैगू पहा.

**ऐबी**--वि. १ (ना.) खोडकर; व्रात्य. २ (कु.) ओशाळा; मिंधा. [ऐब; हिं. ऐबी; अर. अयब, आइब्]

**ऐयट, ऐयटबाज, ऐटबाजी**--अयट पहा.

**ऐयाल-ळ**--अयाळ पहा.

**ऐय्या**--स्त्री. अया पहा. [तुल० हिं. अय्या=आजी, म्हातारी स्त्री]

**ऐरण**--स्त्री. सोनार, लोहार वगैरेंचें एक हत्यार; घडकाम करण्याचें साधन. यावर धातूचे जिन्नस ठोकून त्यांस पाहिजे तो आकार देतात. सामान्यतः आठ ते दहा शेर वजनाचा व पांच इंच लांबीरुंदीचा, वर रुंद व चौकोनी असून खालीं निमुळता असलेला लोखंडी ठोकळा एका लाकडी लांबट ठोकळ्यांत बसविलेला असतो. यास वरच्या बाजूस एक इंच जाडीचा पोलादी भाग असतो. 'जैसे ऐरणीवरी घण। तैसे हाणिती उसणपण॥' -कथा १.१३.९८. [सं. अरणि, अधरिणी; प्रा. अहिरिणी; सिं. अहरणी, तुल० सं. अधरारणी] ०**मारणें**-क्रि. (सोनारी) ऐरणीला ठोकून ठोकून गुळगुळीतपणा आलेला असतो तो घालविण्यासाठीं कुरुंदाचा चुरा हातोड्यानें ऐरणीवर घासणें.

**ऐरण**--स्त्री. (वांई) शेताच्या बांधावर असणारा, हद्द दाखविणारा मातीचा ढीग. अरणी पहा.

**ऐरण, ऐरोण**--स्त्री. १ इरण; नरवेल. २ आयरणी; सोनामुखीची एक जात. [सं. अरणि; हिं. अरणि; गु. अरणि]

**ऐरणमैरण**--स्त्री. एक वनस्पति; हिचीं पानें यकृताच्या आकाराचीं असून त्यांचा यकृतविकारावर उपयोग होतो.

**ऐरणी**--स्त्री. ऐरण पहा. 'सर्पाची जे वाकली फणी। तेचि पिटावया ऐरणी। कातरी केलिया जोडोनि। सर्पाच्याच॥' -कथा ३.१७.९२.

**ऐरणी, ऐरिणी**--स्त्री. लग्नांत वरातीच्या पूर्वी वेळूच्या परडींत (झालींत) कणकीचे दिवे लावून त्यांत उमामहेश्वराची पूजा करून तें पात्र वरमातेस दान करतात. 'भीमकें मांडिलें विंदान। भव ऐरणी संपादन। कृष्णासी वंशपात्रदान। विधिविधान वेदोक्त॥' -एरुस्व १६.१५८. २ अग्निपात्र. 'विरहा नलें तातली। चंद्रकळा होअे चुळचुळी। ते ऐरणी करतळी। घेईन मी॥' -शिशु १९६. [सं. अरणि] ०**दान**-न. लग्नांत वंशवृद्धीसाठीं वधूपक्षाकडून वरमातेस वंशपात्राचें (झालीचें) जें दान देतात तें. ०**पूजन**-न. ऐरणीदान करण्यापूर्वी वंशपात्राचें (झालीचें) करावयाचें पूजन.

**ऐरा**--अहिरा पहा.

**ऐराण**--हैराण पहा.

**ऐरावण**--पु. इंद्राचा हत्ती, ऐरावत. [सं.] -वि. (गो.) (ल.) अतिशय मोठा; अगडबंब.

**ऐरावत**--पु. (विरू.) ऐरावती; इंद्राचा हत्ती; समुद्रमंथपासुन काढलेल्या चौदा रत्नांपैकीं एक. 'अर्जुना मी गा ऐरावतु। पयोराशी सुरमथितु॥' -ज्ञा १०.२३८. [सं.] **म्ह०** कोठें इंद्राचा ऐरावत कोठें शामभटाची तट्टाणी=एक अतिशय थोर आणि दुसरी अतिशय क्षुद्र अशा दोन गोष्टींचा विरोध दाखवावयाचा असल्यास या म्हणीचा उपयोग करतात. **ऐरावतीलक्ष्मी**-**स्त्री.** गजांत लक्ष्मी; हत्ती बाळगण्याइतकी श्रीमंती. 'मदमत्त झालेल्या द्वीपेंद्रानें एखादे वेळीं क्वचित प्राणनाश केला म्हणून ... ऐरावती लक्ष्मीचा अनादर करणें योग्य नाहीं.' किरकोळ लेख संग्रह (विष्णु शास्त्री चिपळूणकर).

**ऐरीगैरी**--वि. १ अशक्त; मूर्ख; मंद; जड (माणूस); हलकी; क्षुद्र; (वस्तू). २ अलबत्यागलबत्या; क्षुल्लक; कोणीतरी. 'कीर्तीचे चौघडे पोवाडे ऐऱ्यागैऱ्याचें नाहीं केलें.' -गापो ७६. [गैरी-द्वि.]

**ऐरिणी, ऐरीण**—स्त्रल. ऐरणी पहा.

**ऐल, ऐला, ऐलाड, ऐलाडी, ऐली**—वि. अलीकडचा; अलीकडला. 'उतारांचिये सांगडी। ठाके ते ऐलीच थडी॥'–ज्ञा १८.२५५. 'पाहेचि ना तो नाहीं बुडाला। कोरडा आला ऐल तीरा।' -एभा २८.३२५. क्रिवि. १ या बाजूला; अलीकडे. 'प्रवृत्ति मार्गौति गोहरे। समाधि ऐलाडी उतरे।' –ज्ञा ६.१९१. २ आधीं; अगोदर; पूर्वी. 'तेवि तो उडुनाथ। केवल श्रीकृष्णप्रीत्यर्थ। सांडुनि काळ नेयत। ऐलाडचि उदैला॥' –रास १.१०७. [सं. आदिम; प्रा. आइल्ल] **ऐलकांठ, ऐलतीर, ऐलथड**—पु.न.स्त्री. अलीकडचा कांठ; जवळचा कांठ; पैलथडी याच्या उलट. 'शोभा समुद्र हेलावे पोटीं। वृक्ष पोहणार उठाउठी। ऐलकांठीं बुबकले॥' –मुसभा २.७७. 'असो आतां त्या अवसरीं। क्षीरसागरीच्या ऐलतीरीं। बध्दांजलि करूनि निर्धारी। सुरवर उभे ठाकले॥' –ह २.६०.

**ऐलपैल**—क्रिवि. या व त्या बाजूस; जवळच्या व दूरच्या दोन्ही कांठावर; अलीकडे पलीकडे. 'या नदीचे ऐलपैल वस्ती आहे.' [ऐल+पैल] –वि. (अलीकडचा व पलीकडचा) इतर; अवांतर; केरकोळ; मिश्र; सटरफटर; क्षुल्लक (वस्तु, काम, शब्द, मनुष्य इ०). 'आम्हास संसारखर्चापेक्षां ऐलपैल खर्च फार लागतो.'

**ऐलफैल**—स्त्री. १ बंड; उठाव; बेभानपणाचें, आज्ञा मोडण्याचें कृत्य. २ खोडया; उपद्याप; बेमुर्वत वर्तन; उद्दाम भाषण. (क्रि० करणें; बोलणें). [फैल द्वि; अर. फियल=कर्म]

**ऐलान**—पु. (माळवी) शासन; कायदा; वटहुकूम. (इं.) ऑर्डिनन्स. [हिं.]

**ऐलीकडचा, ऐलीकडला, ऐलीकडून, ऐलीकडे**—अलीकडचा, अलीकडील पहा. 'जेवीं वसंता ऐलीकडी। वृक्षासि होय पानझडी॥'–एभा ३.१५५. 'नाणावें पैलाड येतां हि जीव। ऐलिकडे उठतां न्यावें घरा।' –दावि १४८.

**ऐवज**—पु. १ मालमत्ता; संपत्ति; इस्टेट; रोकड किंवा माल. 'पांडुरंग आणितां ध्यानांत। तों ऐवज आठविला मनांत।' २ स्थिति; टिकाऊपणा; भक्कमपणा; दमदारपणा. ३ तत्त्वांश; सामर्थ्य; उत्साह; उमेद; पाणी. ४ किंमत; मूल्य (कोणत्याहि वस्तूची पैशाच्या रूपांत). ५ रोख वसुली; रोख उत्पन्न; जमा. [फा. इवझ्=बदला] ०दार-शीर–वि. समर्थ; उपयुक्त; चांगल्या स्थितींत असणारा; कार्योपयोगी (वस्तु, पदार्थ, पशु वगैरे). ०मोबदला–पु. १ एखाद्याच्या मालकीची वस्तु दुसऱ्याच्या ताब्यांत त्याच्या वस्तूबद्दल असणें; ऐवजाची अदलाबदल असणें. २ देवघेव; मोबदला देणें. (क्रि० करणें). ३ ठेवीवर पैसा उसनवार काढणें; गहाणकर्ज. (क्रि० करणें; देणें; ठेवणें; याच्या उलट हातार आणणें; काढणें; येणें). ०मोबदल्याचें लिहिणें–हिशेबाचें एक खातें; ठेवी ठेवल्याचें व पैसे उसने आणल्याचे हिशेब ठेवणें; निरनिराळया प्रकारच्या वसुलीपोटीं, ठेवपोटीं, कर्जपोटीं दिल्या-घेतल्या रकमांचा हिशेब ठेवणें; निरनिराळया प्रकारच्या सारावसुलीचा रीतसर हिशेब ठेवणें. 'ऐवजमोबदल्याचें लिहिणें महाकठीण यांत जो कारकून पार पडेल तो लेखणीचा धड.'

**ऐवजीं**—शअ. बदली; जागीं; मोबदला. 'हे रुपये मुद्दलांत धरूं कीं व्याजाऐवजीं धरूं?' [फा. इव; सिं. एवजी]

**ऐवट**—वि. १ भरींव, जड (दागिने वगैरे); अवजड; मोठा अवाढव्य; अजस्र (झाड, खांब, इमारत वगैरे); जाड; दणकट; ओबडधोबड (कापड वगैरे). हा शब्द पुष्कळ वेळां फार व्यापक अर्थानेंहि योजलेला दिसून येतो. जसें– अगडबंड, थोराड माणसांना; असभ्य, ग्राम्य, असंस्कृत भाषणाला; विविध प्रकारच्या व्यापक कामाला; दिखाऊ मोठ्या वस्तूंना हें विशेषण लावलेलें आढळतें. २ जड; मंद; मूर्ख; बेडौल; ओबडधोबड (माणूस). [अर. बेबट?]

**ऐश**—न. (गो.) आमिष. 'ऐंशाचेया आसा। मिनु झोंबिनला जैसा।' –ख्रिपु १.१७.३७. [सं. आमिष.]

**ऐशानी**—स्त्री. ईशान्य दिशा. [सं.]

**ऐशआराम-ऐशाराम-मी**—पुस्त्री. चैन; सुख आणि स्वास्थ्य; वैषयिक सुखोपभोग; कर्मणूक; विलास; मनोरंजन. [अर. ऐश्+फा. आराम्]

**ऐशी**—उद्गा. आनंदोद्गार. भले शाबास! वाहवा! छान! [अशी, असा.]

**ऐशी**—वि. १ अशी; यासारखी. २ (ल.) अतिशय; फार (निंदाव्यंजक). 'तो येऊं दे तर खरा, त्याची ऐशी पूजा करतों!' [अशी]

**ऐशीं**—वि. ८० संख्या. [सं. अशीति; प्रा. असीइ; सिं. असी] ०म्ह १ ऐशीं तेथें पंचायशी=थोडें आस्त झालें तरी हरकत नाहीं या अर्थी. २ ऐशीं तेथें पंच्यायशी, कर ग रांडे पुरणपोळया–उधळया माणसास लावतात.

**ऐश्वर**—वि. ईश्वरी; दैवी; ईश्वरासंबंधीं. 'ऐश्वरकळा साजती। पाहून शत्रु लाजती।' –ऐपो ३१८. [सं.]

**ऐश्वर्य**—न. वैभव; प्रतिष्ठा; सत्ता; इच्छित प्राप्तीचें सामर्थ्य. 'आइका यश श्री औदार्य। ज्ञान वैराग्य ऐश्वर्य।'–ज्ञा ६.३७. 'ऐश्वर्य म्हणजे जें जें इच्छील तें तें प्राप्त करून घेण्याचें योग-सामर्थ्य.' –गीर १६४. २ प्रभुपणा; प्रभुत्व; वर्चस्व. 'तुज ईश्वरेश्वराचिया ठायीं। ऐश्वर्य केलें।' –ज्ञा ११.५६९. ३ ईश्वरी अंश, गुण, सामर्थ्य. 'हा आमुचा ऐश्वर्य योगु। तुवां देखिला की चांगु।' –ज्ञा ९.८७. ४ (सामा.) समृद्धि; श्रीमंती. [सं.] ०पीठ–न. ऐश्वर्यस्थान; संपत्तीचें, वैभवाचें माहेरघर. 'की ऐश्वर्यपिठींची देवी सुंदर.' ०योग–पु. ईश्वरी सामर्थ्य; वैभव. ऐश्वर्य अर्थ ३ पहा.

०वान–वि. १ मोठा; विख्यात; प्रतिष्ठित. २ संपत्तिमान; भरभराटींत असणारा. ३ भाग्यशाली; सुदैवी. **ऐश्वर्याचा प्राणी**–पु. ज्याची सदोदित भरभराट असते अशास म्हणतात; नशीबवान; देवाची कृपा असणारा; भाग्याचा पुतळा; दैवाचा भोपळा.

**ऐषआराम**—ऐशआराम पहा.

**ऐषमहाल**—पु. करमणुकीच्या व चैनीच्या साधनांनीं सज्ज ठेविलेला महाल. [अर. ऐशमहाल]

**ऐष्टिक**—वि. यज्ञिय; हव्य; इष्टीसंबंधीं (कर्म वगैरे) [सं.]

**ऐस**—(कु.) आमिष, ऐश पहा.

**ऐसपैस**— क्रिवि. १ विस्तीर्ण; प्रशस्त; अमर्याद; मोकळा-धाकळा. २ आसमंतात्, आसपास, पहा [आसपास]

**ऐसा, ऐसें**—वि.क्रिवि. (काव्य) १ असा; असें. 'ऐसेआ आपदा अनिर्वाच्या। भोगितां तेआ सोच्या' –ऋ १०. २ सारखा. 'लोकबंधू जो होय रवीऐसा' –नल ७. [सं. ईदृश; प्रा. ईदिश; अपभ्रंश अइस.] **ऐसेनी**–अशा प्रकारें; याप्रमाणें. **ऐसीयासी**–अशाला. 'बोले तैसा चाले तो प्रिये देवासी। भीम ऐसियासी गाये सदां।'–रामदासी २.१६६. **ऐसैसें**–क्रिवि. असें असें. 'किंबहुना ऐसैसें। मुक्तकैवल्य सुदिवसें'।–ज्ञा १६.१३. [ऐसें+ऐसें]

**ऐसांत येणें**—क्रि. (कु.) कोणतीहि (अयोग्य) गोष्ट करण्याच्या भरांत, जोरांत, आवेशांत येणें. [आवेशांत अप. ?]

**ऐहिक, ऐहलौकिक**—वि. या लोकांतील; इहलोकसंबंधीं (सुख, भोग इ.) पारलौकिक याच्या उलट. 'तैसें ऐहिक तरी न नशे।'–ज्ञा २.२३३. [सं. इह–ऐहिक]

# महाराष्ट्र शब्दकोश

## ग्रंथसंक्षेप सूची

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक, इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| अकक | अनेककविकृत कवितासंग्रह | काव्येतिहाससंग्रह | भाग, कविता |
| अनु | अनुवाद | पवित्रशास्त्र—जुना करार. बायबल सोसायटी, इ. स. १९२४ | अध्याय, वचन |
| अफला | अनंतफंदीकृत कविता अथवा लावण्या | प्रका. चित्रशाळा, आवृत्ति ४, सन १९२१ | भाग, पृष्ठ |
| अभं | अभंगांजलि | संपा. ना. वा. टिळक, १९१९ | पृष्ठ |
| अमृ | श्रीअमृतानुभव | संपा. बाबा गर्दे, प्रकाशक के. भि. ढवळे, १९२९ | प्रकरण, ओंवी, |
| अमृत | अमृतरायकृत कवितासंग्रह | काव्यसंग्रह २६. संपा. वा. दा. ओक, निर्णय-सागर १८९६ | पृष्ठ |
| अमृतबाल | अमृतरायकृत बालक्रीडा | ,, ,, ,, | कविता |
| अमृतध्रुव | ,, ध्रुवचरित्र | ,, ,, ,, | ,, |
| अरु | अरुणोदय | संपा. बाबा पदमनजी. आवृत्ति २. सन १९०८ | पृष्ठ |
| अश्वप | अश्वपरीक्षा | संपा रा ग गुप्ते, ज्ञानचक्षु पुणें, १८८५ | भाग, पृष्ठ. |
| अस्तंभा | अस्तंगतभानु | संपा. द. त्रि. परांजपे, प्रका. मोदवृत्त, वांई, १९२६ | पृष्ठ |
| अज्ञाअ | अज्ञानदासकृत अफझलखानवध | ( ऐतिहासिक पोवाडे ) | चौक. |
| आकं | आनंदतनय—कंदुकाख्यान | आनंदतनयकृत कवितासंग्रह, संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक, निर्णयसागर १८९१ | कविता |
| आकृ | आनंदतनय—कृष्णचरित्र | आनंदतनयकृत कवितासंग्रह. संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक, निर्णयसागर १८९१ | कविता |
| आगर | आगरकर—निबंधसंग्रह | प्रका. सुधारक प्रिंटिंग ब्युरो, पुणें | भाग पृष्ठ |
| आगो | आनंदतनय—गोरसक्रीडा | आनंदतनयकृत कवितासंग्रह. संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक. निर्णयसागर १८९१ | कविता |
| आता | आनंदतनय—ताटकावध | ,, ,, ,, | ,, |
| आप, आपद | आनंदतनय—पदें | ,, ,, , | पद |
| आपू | आनंदतनय—पूतनावध | ,, ,, ,, | कविता |
| आमंस | आत्मनियंत्रण मंडळ्यांची समाजपद्धति | प्रका. अमेरिकन मिशन सोसायटी, मुंबई १८९६ | पृष्ठ |
| आमा | आनंदतनय—मार्कंडेयाख्यान | आनंदतनयकृत कवितासंग्रह. संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक, निर्णयसागर १८९१ | कविता |
| आय | आनंदतनय—यज्ञरक्षण | ,, ,, ,, | ,, |
| आरोशा | आरोग्यशास्त्र | संपा. बा. प्र. मोडक, निर्णयसागर सन १८९३ | भाग, पृष्ठ |
| आशिबि | आनंदतनय—शिबिचक्रवर्त्याख्यान | आनंदतनयकृत कवितासंग्रह. संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक, निर्णयसागर १८९१ | कविता |

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक, इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| आश्वगृसू | आश्वलायन गृह्यसूत्र | ... ... ... | अध्याय, खंड |
| आसी | आनंदतनय–सीतास्वयंवर | आनंदतनयकृत कवितासंग्रह. संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक, निर्णयसागर १८९१ | कविता |
| आसु | आनंदतनय–सुदामचरित्र | ,, ,, ,, | ,, |
| इऐ | इतिहास व ऐतिहासिक | नियतकालिक. प्रका. चिटणीस, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें | वर्ष (अंक), पृष्ठ |
| इति | इतिहास | प. शा. जु. क. बायबल सोसायटी, १९२४ | अध्याय, वचन |
| इनाम | मुंबई इलाख्यांतील इनामकमिशनखातें–यांतील गैर इनसाफ | ( शिळाप्रत ) ज्ञानप्रकाश सन १८५९ | पृष्ठ |
| इंप | इंग्रजांचा पराभव | संपा. अ. ब. कोल्हटकर, प्रका. भावे आणि मंडळी, मुंबई शके १८४८. | पृष्ठ |
| इपुस्त्रिपो | इतिहासप्रसिद्ध पुरुष व स्त्रिया यांचे पोवाडे | संपा. आक्वर्थ व शंकर तुकाराम शाळिग्राम, निर्णयसागर १८९१ | पृष्ठ |
| इफि | इफिसकरांस पत्र | प. शा. न. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| इब्री | इब्री यांस पत्र | ,, ,, ,, | ,, |
| इमं | इतिहासमंजरी | संपा. द. वि. आपटे, शके १८४५, चित्रशाळा पुणें | पृष्ठ |
| इंमू | इंग्लंडच्या राज्यकारभारव्यवस्थेच्या इतिहासाचीं मूलतत्त्वें | संपा. शि. गो. फाळके, विद्याखातें, बडोदें १९१४ | पृष्ठ |
| ईवि | ईश्वरी विद्या | संपा. सी. एस्. रिविंग्टन, १९२६ | पृष्ठ |
| उचिशु | उद्धवचिद्धनकृत शुकरंभासंवाद | काव्यसंग्रह, महाराष्ट्र कवि भाग ७ | कविता |
| उत्प | उत्पत्ति | प. शा. जु. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| उदा | उघडलेलें दार | संपा. दि. शं. सावरकर, १९२४ | पृष्ठ |
| उपा | उपासनापद्धति | संपा. ना. वा. टिळक, १९२९ | पृष्ठ |
| उमं | उपोषणमंडळ | ,, ,, १९१४ | ,, |
| उषा | उषाहरण | चोभाकृत, प्रका. भा. इ. सं. मं. अहवाल, शके १८३३ | पोथीपृष्ठ, ओंवी |
| उसं | उपासनासंगित | ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, सन १९२३ | पृष्ठ |
| ऋ | ऋद्धिपूरवर्णन | नारायणव्यास बहालियेकृत ( महानुभाव ), प्रका. य. खु. देशपांडे, यवतमाळ, सन १९२९ | पृष्ठ |
| ऋग् | ऋग्वेदसंहिता | ... ... ... | मंडळ, सूक्त, ऋचा |
| ए | एज्रा | प. शा. जु. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| एभा | एकनाथी भागवत | ( विष्णुबोवा जोग संप्रदायी ) संपा. मा. कृ. देशमुख, आवृ. २. शके १८४९ | अध्याय, ओंवी |
| एरुस्व | एकनाथ–रुक्मिणीस्वयंवर | प्रका. मा. कृ. देशमुख, चित्रशाळा, शके १८४७ | ,, |
| ऐकिप्र | ऐतिहासिक किरकोळ प्रकरणें | इतिहाससंग्रह विविध १. संपा. द. ब. पारसनीस | पृष्ठ |
| ऐच | ऐतिहासिक चर्चा | ,, ,, ,, | ,, |
| ऐटि | ऐतिहासिक टिपणें | ,, ,, ,, | भाग, पृष्ठ |
| ऐपो, ऐतिपो | ऐतिहासिक पोवाडे | संपा. य. न. केळकर, १९२८ | पृष्ठ |
| ऐरा | ऐनेराजमेहेल, अथवा राजवाडादर्पण | आवृ. २, इंदुप्रकाश मुंबई, सन १९१२ | ,, |
| ऐरापु | ऐनेराजमेहेल–पुरवणी | बडोदें १९२२ | पृष्ठ |
| ऐरापुप्र | पुरवणी–ऐनेराजमेहेल प्रकरण | बडोदें | प्रकरण, पृष्ठ |

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक, इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| ऐरापुविवि | ऐनेराजमेहेल–पुरवणी, विवाहविधि | बडोदें १९२८ | पृष्ठ |
| ऐस्फुले, ऐस्फु | ऐतिहासिक स्फुटलेख | इतिहाससंग्रह विविध १, संपा. द. ब. पारसनीस | भाग, पृष्ठ |
| ओझा | प्राचीन भारतीय लिपिमाला | संपा. गौरीशंकर ओझा, अजमेर | |
| कचेसुच | कचेश्वरकविकृत सुदामचरित्र | (शिळाप्रत) प्रका. कृ. ब. ठाकूर, मुंबई शके १८०९ | पृष्ठ |
| कथा | कथाकल्पतरु | कृष्णयाज्ञवल्किकृत | स्तबक, अध्याय, ओंवी |
| कफा | करंजांचा मनोरंजक फार्स (प्रहसन) | संपा. का. म. थत्ते, दत्तप्रसारक छापखाना, पुणें १८८८ | पृष्ठ |
| कमं | कर्पूरमंजरी–सट्टक (मराठी भाषांतर) | संपा. स. प. पंडित, मुंबई, इंदुप्रकाश १८७७ | जवनिका, पृष्ठ |
| करिं | करिंथकरांस पत्र | प. शा. न. क. बा. सो. १९२४ | पत्र, अध्याय, वचन |
| कलस्सै | कलस्सैकरांस पत्र | ,, ,, ,, | अध्याय, वचन |
| काप्र | काकडे प्रश्नमाला | शिवणकला त्रैमासिक, मॅनेजर, टेलरिंग अँड कटिंग कॉलेज, कोल्हापूर | पृष्ठ |
| काप्रइसा | कायस्थप्रभूंच्या इतिहासाचीं साधनें | व्यवस्थापक, कायस्थ प्रभु ऐतिहासिकमंडळ, निर्णयसागर प्रेस | पृष्ठ |
| किंगवि | किंकरकृत गरुडगर्वविमोचन | अनेककवि भाग २ | कविता |
| किंद्रौपदी | किंकरकृत द्रौपदीचरित्र | ,, ,, ,, | ,, |
| किंसुदा, किंसुदाम | किंकरकृत सुदामचरित्र | ,, ,, ,, | ,, |
| कुअक | कुरुंदवाडकर कविता | अर्वाचीनकविता (पूर्वार्ध) संपा. चं. शि. गोऱ्हे प्रका. दामोदर सांवळाराम मंडळी, मुंबई १९०३ | पृष्ठ |
| के | केसरी वर्तमानपत्र | ... ... ... | तारीख, माहे, सन |
| केक | केशवसुत यांची कविता | प्रका. हरि नारायण आपटे, आर्यभूषण प्रेस, पुणें | पृष्ठ |
| केका | मोरोपंतकृत केकावली | केकादर्श, संपा. परशुरामतात्या गोडबोले, आवृ. ४, सन १९१७. प्रका. गजानन चिंतामण देव | श्लोक |
| केले, केळ | केळकरांचे लेख | प्रका. शि. वा. आवटी, विजय प्रेस, १९२५ | खंड, पृष्ठ |
| कोको | ए कॉपेंडियम ऑफ मराठी–मराठी अँड इंग्लिश डिक्शनरी | अंबाजी कोन्हेरेकृत मराठी–मराठी व इंग्रजी कोश, सन १८९६ | |
| कोरकि | कोरलईचा किल्लेदार | संपा. वि. वा. भिडे, प्रका. भारतगौरवग्रंथ-माला, मुंबई १९२५ | पृष्ठ |
| कौंघनि | कौन्सिल घटना व नियम | प्रका. युनायटेड चर्च ऑफ नॉर्दर्न इंडिया | पृष्ठ |
| कृमुरा | कृष्णदासमुद्गल रामायण | प्रका. महाराष्ट्रकवि | प्रसंग, ओंवी |
| कृषि, कृषिवि | कृषिकर्मविद्या | संपा. रा. आ. राजे, व रा. स. गुप्ते आवृ. १ | पृष्ठ |
| ख | ऐतिहासिक लेखसंग्रह | संपा. वा. वा. खरे, सन १८९७–१९२६. | भाग, पृष्ठ; पृष्ठ |
| खपो | खर्ड्यांच्या लढाईचा पोवाडा | ... ... ... | चौक |
| खरादे | खरा देशभक्त | संपा. वा. कृ. भावे, भारतगौरवग्रंथमाला | पृष्ठ |

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| खलप | खड्यांच्या लढाईचा पत्रव्यवहार | राजवाडेसंपादित मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ७ | भाग, पृष्ठ |
| खस्वाब | खड्यांच्या स्वारीची बखर | संपा. का. ना. साने | पृष्ठ |
| खिधमू | खिस्तीधर्माचें मूलतत्त्वज्ञान | संपा. पंडिता रमाबाई, सन १९१५ | पृष्ठ |
| खि, खिपु | खिस्तिपुराण | फादर स्टीफन्सकृत, संपा. जोसेफ साल्ढाणा मंगळूर १९०७ | पुराण, अवस्वरु,ओंवी |
| खिस्ता | खिस्तायन | संपा. ना. वा. टिळक १९२१ | अध्याय, ओंवी |
| गगवि | गरुडगर्वविमोचन | किंकर, अनेककवि भाग २ | कविता |
| गण | गणना | प. शा. जु. क. बा. सो. सन १९२४ | अध्याय, वचन |
| गल | गलतीकरांस पत्र | प. शा. न. क. बा. सो. १९२४ | ,, |
| गांगा, गांव | गांवगाडा | संपा. त्रि. ना. अत्रे. १९१५ | पृष्ठ |
| गापो | गायकवाड घराण्याचे व इतर पोवाडे | संपा. गो. स. सरदेसाई, बडोदावत्सल छापखाना, १९२४ | पृष्ठ |
| गीता | गीतार्णव | दासोपंतकृत | अध्याय, ओंवी |
| गीर, गी | गीतारहस्य | संपा. बा. गं. टिळक, चित्रशाळा, १९१५ | पृष्ठ |
| गीस | गीता–समश्लोकी | वामनकृत | अध्याय, ओंवी |
| गुच | गुरुचरित्र | सरस्वतीगंगाधरकृत. यशवंत प्रेस, पुणें | ,, ,, |
| गोइसा | गोमंतकाच्या इतिहासाचीं साधनें | संपा. विनायक रामचंद्र सरज्योतिषी, १९१८ | पृष्ठ |
| गोखंचिशाब | शाहूमहाराजांची बखर | गो. खं. चिटणीसकृत | पृष्ठ |
| गृशि | गृहिणीशिक्षक | संपा. सौ. सावित्रीबाई जोशी व ल. ना. जोशी, मुंबई १९२९ | भाग, पृष्ठ |
| घका | घरचा कायदा | संपा. सी. के. दामले, प्रका. लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें, १९२७ | पृष्ठ |
| घाको | घाशीराम कोतवाल | मोरोबा कान्होबाकृत, सन १८६३ | पृष्ठ |
| चं, चंद्र | चंद्रगुप्त | संपा. ह. ना. आपटे, आर्यभूषण प्रेस, पुणें. | पृष्ठ |
| चंद्रचूड | चंद्रचूड दफ्तर, कला १ | संपा. द. वि. आपटे, प्रका. भा. इ. सं. मंडळ, पुणें | पृष्ठ |
| चसवृ | चतुर्थसंमेलनवृत्त | भा. इ. सं. मंडळ, शके १८३८ | ,, |
| चिज | चित्रमयजगत | नियतकालिक, चित्रशाळा प्रेस, पुणें | वर्ष. अं. पृष्ठ |
| चित्रगुप्त | शिवाजीमहाराजांची बखर | चित्रगुप्तविरचित | पृष्ठ |
| चिमा | चित्त्यासंबंधीं सामान्य माहिती | बडोदें १९२६ | ,, |
| चिरा | चिनापट्टण येथील राजकारणें | इतिहाससंग्रह. संपा. द. ब. पारसनीस | ,, |
| छअं | छत्रेकृत अंकगणित | संपा. के. ल. छत्रे, आवृ. १०, मुंबई, सन १८७९ | पृष्ठ |
| छंर | छंदोरचना | संपा. प्रो. मा. त्रि. पटवर्धन आर्यसंस्कृति-मुद्रणालय, पुणें सन १९२७. | पृष्ठ |
| जनि | जव्हेरखान्याच्या अंतर्व्यवस्थेचे नियम | बडोदें १९१९ | पृष्ठ |
| जुऐगो | जुन्या ऐतिहासिक गोष्टी | इतिहाससंग्रह. संपा. द. ब. पारसनीस | पृष्ठ |
| जुक | जुना करार | प. शा. बा. सो. १९२४ | विषय,अध्याय, |
| जुले | जुने लेख | इतिहाससंग्रह. संपा. द. ब. पारसनीस, १९१५ | पृष्ठ |
| जै, जैअ | जैमिनि अश्वमेध | श्रीधरस्वामीकृत चित्रशाळा प्रत | अध्याय, ओंवी |
| जोरा | जोधपूर येथील राजकारणें | इतिहाससंग्रह, संपा. द. ब. पारसनीस, १९१५ | पृष्ठ |
| झांमू | झांकली मूठ | संपा. वि. वा. हडप | पृष्ठ |
| टि, टिले | लो. टिळकांचे केसरींतील लेख भाग १–४ | प्रका. केसरी-मराठा, संस्था, पुणें १९२२–३० | भाग, पृष्ठ |

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| टिक | टिळकांची कविता | रे. ना. वा. टिळक यांच्या कवितांचा संग्रह, प्रका. भा. कृ. उजगरे, १९१४ | पृष्ठ |
| टिव्या | लो. टिळक यांचीं व्याख्यानें | संपा. स. हृ. भावे, १९०८ | पृष्ठ |
| टिसू | टिळकसूक्तिसंग्रह | संपा. स. वा बापट, विजय प्रेस, १९२६ | ,, |
| तंरा | तंजावरचें राजघराणें | इतिहाससंग्रह, संपा. द. ब. पारसनीस १९०२ | ,, |
| तृसंवृ | तृतीयसंमेलनवृत्त | भा. इ. सं. मंडळ, शके १८३७ | ,, |
| तीता | तीताला पत्र | प. शा. न. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| तीम | तीमथ्याला पहिलें पत्र | ,, ,, ,, | ,, ,, |
| तुगा | तुकाराममहाराजांची गाथा | संपा. मा. कृ. देशमुख, शं. वा. दांडेकर, चित्रशाळा १९२५ | अभंग |
| तैसं | तैत्तिरीय संहिता | ... ... ... | कांड, प्रपा. अनु. |
| तोबं, तोबंड | तोतयाचें बंड | संपा. न. चिं. केळकर, प्रका. भट आणि मंडळी, पुणें १९१३ | पृष्ठ |
| थेस्स | थेस्सलनीकेकरांस पत्र | प. शा. न. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| थोमारो | थोरले माधवराव रोजनिशी | संपा. ग. चि. वाड | भाग, पृष्ठ |
| दयाळ | दयाळनाथांची कविता | अ. सी. साठे, पांडे, अग्निहोत्री यांची प्रत | |
| दा, दास | श्रीमत्दासबोध | रामदासस्वामीकृत, प्रका. सत्कार्योत्तेजक सभा, धुळें, आवृ. ५, शके १८४४ | दशक, समास, ओंवी |
| दानी | दानीएल | प. शा. जु. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| दाव | वच्छहरण | दामोदरकविविरचित (महानुभावपंथीय), प्रका. द. सी. पंगु, १९२७ | ओंवी |
| दावि | दासविश्रामधाम | आत्मारामस्वामीकृत, प्रका. सत्का. सभा, धुळें, रामदास आणि रामदासीग्रंथमाला, भाग ७ वा | पृष्ठ |
| दिमरा | दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें | संपा. द. ब. पारसनीस १९१३ | भाग, पृष्ठ |
| द्विसंवृ | द्वितीयसंमेलनवृत्त | भा. इ. सं. मंडळ, शके १८३६ | पृष्ठ |
| देप | देवनाथमहाराजकृत पदसंग्रह | संपा. वा. दा. ओक, निर्णयसागर, १८९६ | कविता |
| देवसंत | देवदासकृत संतमालिका | संपा. द. वा, पोतदार, वैद्यकपत्रिका छापखाना, पुणें | ओंवी |
| धर्माजी | धर्माजीरावाचें कुटुंब | संपा. बळवंत मनोहर पंडित, जगद्धितेच्छु १८९६ | पृष्ठ |
| धसिं | धर्मसिंधु | ... ... ... | परिच्छेद |
| ध्यानमा | ध्यानमाला | वामनपंडितकृत | कविता |
| नक | नवा करार | प. शा. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| नकआ | नवा करार | संपा. बा. ना. आठवले, १९२९ | अध्याय, वचन |
| नकपं | नवा करार | संपा. पंडिता रमाबाई, १९१२ | ,, |
| नकपुप्र | नव्या करारांतील पुस्तकांची प्रवेशिका | लिटरेचर कमेटी, १९२५ | पृष्ठ |
| नदा | नरहरीकृत दानव्रत | महाराष्ट्र कवि, अनेककविकृत कवितासंग्रह भाग २ | कविता |
| नपुक | नवपुष्पकरंडक | संपा. वा. म. जोशी, मनोरंजन, मुंबई. | पृष्ठ |
| नल, नळ | नलदमयंतीस्वयंवराख्यान | रघुनाथपंडिताचे काव्यग्रंथ प्रका. ह. त्रिं. बापट, १९०९ | कविता |
| नव | नवनाथ भक्तिसार | धुंडिराजसुतमालोकृत, प्रका. बा. ल. पाठक, जगदीश्वर प्रेस, १८९६ | अध्याय, ओंवी |

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| नहे | नहेम्या | प. शा. जु क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| नाकु | नाट्यकलारुक्कुठार मात्रा | संपा. स. ना. ठोसर, १९२६ | वळसा, पृष्ठ |
| नागा | नामदेवगाथा | इंदिराप्रेस. | अभंग |
| नाना, नाम, नामना | नामदेवनाटक | संपा. वा. रं. शिरवळकर, आर्यभूषण, १९०४ | पृष्ठ |
| नि | निबंधमाला | संपा. विष्णुशास्त्री चिपळुणकर, चित्रशाळा १९१७ | पृष्ठ |
| निचं | निरभ्रचंद्र | संपा. वि. वा. हडप १९२० | पृष्ठ |
| निगा | श्रीनिळोबामहाराज यांच्या अभंगांची गाथा | नानामहाराज साखरे संप्रदायी, प्रका. त्रिं. ह. आवटे, शके १८३० | पृष्ठ |
| निमा | निरंजनमाधवाची कविता | प्रका. ल. रा. पांगारकर, शके १८४१-४७ | भाग, पृष्ठ |
| निर्ग | निर्गम | प. शा. जु. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| नीति | नीतिशास्त्रप्रवेश | संपा. वा. म. जोशी, मनोरंजन, १९०९ | पृष्ठ |
| नीतिसू | नीतिसूत्रें | प. शा. जु. क. बा. सो. १९२४ | अध्याय, वचन |
| न्यायप | न्यायपद्धति | न्यायशास्त्र-मोरो केशव दामले | पृष्ठ |
| न्यासे | न्यायाब्धिसेतु | (शिळाप्रत) मो. श्री. चितळेकृत, रत्नागिरी, १८५६ | ,, |
| पकोघे | पण लक्षांत कोण घेतो ? | संपा. ह. ना. आपटे, | पृष्ठ |
| पंच | पंचतंत्र (मराठी भाषांतर) | प्रका. महाराष्ट्रकवि, शके १८२९ | पृष्ठ |
| पदमव | परकीय दरबारीं मराठ्यांचे वकील | इतिहाससंग्रह संपा. द. ब. पारसनीस | ,, |
| पदाव | पदार्थवर्णन | संपा. बा. प्र. मोडक, निर्णयसागर | भाग, पृष्ठ |
| पपप्रे, पप्रे | पतिपत्नीप्रेम | संपा. बा. रा. कोठारी, प्रका. सुरस ग्रंथमाला आवृ. २ री. | पृष्ठ |
| पया | पत्रेयादी वगैरे | काव्येतिहास संग्रह. | पृष्ठ |
| परमा | परमामृत | मुकुंदराजकृत | प्रकरण, ओंवी |
| पला | परशुरामकृत लावण्या | प्रका. चित्रशाळा, १९२० | पृष्ठ; प्रकरण, पृष्ठ |
| पवि, पलोवि | परलोकविद्या | प्रका. रा. ना. कार्लेकर, आवृ. ३, सन १९१८ | पृष्ठ |
| पशागी | पवित्रशास्त्रांतील गीतें | संपा. पंडिता रमाबाई, १९१९ | ,, |
| पाइ | पाइअसद्दमहाण्णव | प्राकृत-हिंदीकोश. संपा. पंडित हरिगोविंददास त्रिकमचंद शेठ, कलकत्ता १९२८ | पृष्ठ |
| पाट | पाट नांवाचा पत्त्यांचा खेळ | बडोदावत्सल छापखाना, सन १८८९ . | पृष्ठ |
| पांप्र | पांडवप्रताप | श्रीधरस्वामीकृत | अध्याय, ओंवी |
| पाब | पानपत बखर | रघुनाथ यादवकृत, संपा. का. ना. साने | पृष्ठ |
| पारिभौ | पारिजातभौमासुर नाटक | संपा. नारायण आनंदराव पै, प्रका. नारायण भिकशेट खातू, शके १८१३ (शिळाप्रत) | पृष्ठ |
| पार्ले | पार्लमेंट | संपा. दा. ना. आपटे, सयाजीसाहित्यमाला ८३, बडोदें, १९२४ | पृष्ठ |
| पाव्ह | पाल व व्हर्जिनिया | संपा. गो. शं. बापट, प्रका. गव्ह. सें. बुकडेपो १८७५ | पृष्ठ |
| पृच | पृथ्वीराज चव्हाण | (खरा रजपूत वीर) लोकहितवादी | पृष्ठ |
| पेअ | पेशवाईची अखेर | संपा. गो. का. चांदोरकर, इतिहास-ऐतिहासिक मासिक, प्रका. सत्कार्योत्तेजक सभा धुळें | पृष्ठ |
| पेद | पेशवे दप्तरांतील निवडक पत्रें, | संपा. गो. स. सरदेसाई | भाग, पत्र |

